# प्रस्तावना

अर्थशास्त्राच्या चलन-व्यवहार विषयक शाखेच्या अभ्यासकाना विदेशविनिमयाचें शास्त्र, व्यवहार व इतिहास हे अत्यंत जिव्हाळ्याचे वाटतात. वस्तुतः समाजातील अनेकांचा या विषयाशीं अत्यंत महत्त्वाचा संबंध येतो. पण सर्वसामान्य मनुष्य 'विदेशविनिमय' या शब्दानींच काहींसा बिचकून जातो. हे काहींतरी गहनगूढ आहे व ते त्या शास्त्राच्या विशेष अभ्यासकाखेरीज कोणाला उकलणार नाहीं अशी त्याची समजूत असते. ही समजूत बरोबर नाहीं. गणित विषय चांगला असल्यास या विषयात प्रावीण्य मिळविणें कोणालाहि सहज शक्य आहे हें श्री. वसंत पटवर्धन यांनी या ग्रंथात दाखवून दिले आहे.

विदेश विनिमयाच्या दरातील बदल हे त्या त्या देशातील पैशाच्या अंतर्गत क्रयशक्तींतील बदल दर्शवितात. पैशाच्या देशांतर्गत क्रयशक्तींतील चढउतारामुळे इतर देशाबरोबरच्या त्या देशाच्या विदेशविनिमयाच्या दरात बदल होऊ शकतो असा एक समज पूर्वी रूढ होता. पण घाऊक किंमती याच विदेश विनिमयाच्या दराच्या निर्देशांक असतात असें म्हणता येणार नाहीं. आयातनिर्यात, मालाच्या किंमती, रहाणीमानाचा निर्देशांक या घटकावरच विदेश विनिमयाचे दर निश्चित होण्यासाठीं अधिक भर दिला पाहिजे असें अलीकडील घडामोडींनीं सिद्ध केले आहे. प्रत्यक्षात पाहू गेल्यास भाडवलाची होणारी आंतरराष्ट्रीय हालचाल, अदृश्य बाबींपासून ( Services ) होणारें उत्पन्न व खर्च, आयात व विदेश विनिमय यावरील अंतर्गत निर्बंध, विदेश–विनिमय–समतोल निधीचे व्यवहार, क्लिअरिंग आणि भरपाईबाबतचे करार यासारखे अनेक दृश्य व अदृश्य घटक या संबंधात विचारात घेतल्याचे दिसून येतें. या घटकाचें कार्य व त्याच्या क्रिया प्रक्रिया लक्षात घेतल्यानेंच विदेश विनिमयाच्या व्यवहाराच्या इतिहासात नित्य नवी स्थिति व अस्थिरता ही विशेष प्रकर्षानें का दिसून येतात याचा उलगडा होतो. विदेश विनिमयाच्या सर्व व्यवहारात, व आंतरराष्ट्रीय आर्थिक व्यवहारात विनिमयपरिमाणाचे दर समतोल स्थितींत रहाणें हे आवश्यक आहे हे मूलतत्त्व गृहीत धरूनसुद्धा वरील परिस्थिति निर्माण होत असते.

१९३० च्या पूर्वी आंतरराष्ट्रीय व्यवहारातील देणीं व पैशाचे व्यवहार हे त्रिविध अथवा अनेकविध व्यवहार साखळीनें पुरे केले जात. त्यावेळीं बहुतेक राष्ट्रांचीं चलनें सुवर्णाधिष्ठित होती आणि आंतरराष्ट्रीय व्यापारातील देणीं त्या त्या देशाना सोनें निर्यात करून भागविलीं जात. पण पुढे सोन्याच्याच किंमतींत स्थिरता न राहिल्यानें, अंतर्गत आर्थिक व चलनविषयक धोरणें सुवर्ण गंगाजळीच्या प्रमाणाशीं सुसंगत ठेवण्याचे प्रयत्न करूनसुद्धा विदेश विनिमयाच्या दरातील स्थिरता नष्ट पावली

व त्याच्या कमाल-किमान दरात कमालीची तफावत पडू लागली. त्यानंतर सुवर्णाधिष्ठित चलनव्यवस्था मागे पडून तिची जागा सुवर्णपरिवर्तन चलन सरथेने घेतली त्यामुळें विदेश विनिमय समतोलनिधीकडे जमा होणारा अगर नावें पडणारा विदेशविनिमय हेंच आंतरराष्ट्रीय व्यवहारातील हक्कपूर्तीचें साधन होऊन बसलें.

गेल्या जागतिक मंदीनंतर विदेशविनिमयाच्या दरात स्थैर्य आणण्यासाठी केलेले प्रयत्न हे चलनाचें अवमूल्यन व राष्ट्राराष्ट्रांतील परस्पर सहकार्य यावरच केवळ आधारलेले होते. *निर्यात व्यापारात ज्या प्रमाणात घट होते त्याच प्रमाणात आयात* व्यापारात ती होत नाहीं. परिणामीं ज्या राष्ट्राचा आंतरराष्ट्रीय व्यापार तुटीचा आहे त्याच्या चलनाच्या बाह्य किंमतीवर प्रतिकूल परिणाम होणें अपरिहार्य आहे. या थैर्य राखण्याच्या प्रयत्नात हें स्पष्ट दिसून आलें, पण काहीं झालें तरी देणी हीं अखेर वस्तूंच्या अगर दृश्य अदृश्य ( Services ) स्वरूपातच दिलीं जातात. म्हणून निर्यात व्यापाराच्या आयात व्यापारावरील आधिक्यावरच राष्ट्राची ऐपत अखेर अवलंबून असते हा मूलभूत सिद्धांत या संशोधनानंतरहि अबाधितच राहिला. १९३० मध्ये बँक *ऑफ इंटरनॅशनल सेटलमेंट या बँकेची स्थापना करण्यात आली. युद्ध कर्जाच्या वसुलीच्या* कामातील अडचणींचा परिहार करून यूरोपच्या अर्थव्यवस्थेच्या गाड्यातील खीळ काढण्याचा यामागील मुख्य उद्देश होता. परंतु मध्यवर्ती बँकांची मध्यवर्ती बँक या नात्यानें निरनिराळ्या राष्ट्रांच्या मध्यवर्ती बँकांमध्ये सहकार्य घडवून आणणें व त्या योगें आंतरराष्ट्रीय अर्थव्यवहारास आवश्यक सवलती उपलब्ध करून देणें हें कार्य तिच्याकडून होऊ शकलें नाहीं. निरनिराळ्या बाजारपेठेतील चलन विषयक परिस्थितीत एकसूत्रता आणून समतोल साधणें आणि भांडवलाच्या आंतरराष्ट्रीय हालचालीमुळें निर्माण होणाऱ्या अडचणींचा निरास करणें या बाबतींत आवश्यक अशी यंत्रणा निर्माण करण्यात या बँकेला फारसे यश लाभलें नाहीं. या सब व्यवहारात विनिमयातील दराचें स्थैर्य हें मृगजळच ठरलें. राष्ट्राराष्ट्रांमधील निरनिराळ्या चलन व्यवस्थेवर आधारलेले गट निर्माण झाले. आणि भांडवलाचा व मालाचा एका राष्ट्राकडून दुसऱ्या राष्ट्राकडे जाणारा ओघ हा देशाबाहेरील चलनाची किंमत स्थिर राखण्याच्या दृष्टीनेच होऊ लागला. *याचा अपरिहार्य परिणाम म्हणून विदेशविनिमयाच्या व्यवहारावर नियंत्रण ठेवणें आणि सुवर्णपरिवर्तन चलनव्यवस्था अबाधित राखणें यासाठीं सुसघटित अशी* विनिमयनियंत्रण पद्धति अमलात आणणं आवश्यक झालें.

दुसरें महायुद्ध संपलें. सर्वत्र शांतता प्रस्थापित आली. निरनिराळ्या राष्ट्रांच्या चलनाच्या क्रयशक्तीवर युद्धामुळें झालेले परिणाम लक्षात घेऊन विनिमयाचे समतोल असे दर निश्चित करणें व त्याच बरोबर राष्ट्राराष्ट्रांतील व्यवहारात आर्थिक सुसूत्रता निर्माण करून विनिमयाच्या दरात स्थैर्य आणणें, तसेंच जागतिक व्यापारास चालना देऊन त्यास भरभराटीस आणणें हे महत्त्वाचे प्रश्न उपस्थित झाले. म्हणून १९४४ मध्यें आंतरराष्ट्रीय चलननिधीची स्थापना करण्यात आली. जगातील स्वतंत्र अशा

निरनिराळ्या चलन व्यवस्थात स्थिर दराची यंत्रणा निश्चित करणें हे या निधीचें प्रमुख उद्दिष्ट होतें. अर्थातच सदस्य राष्ट्रांना व्यापारी पुनर्वसनास मदत करणें हा महत्त्वाचा व तातडीचा उद्देश बाजूला टाकला गेला नव्हताच. आपल्या सभासदाचा एकंदर व्यापार त्याच्या चलनव्यवस्थेची मजबुती व त्याचें आंतरराष्ट्रीय व्यापारातील महत्त्व या गोष्टी लक्षात घेऊन या निधीने त्याचे 'कोटे' निश्चित केले व सदस्यांनीं आपल्या कोट्यापैकी ¼ रक्कम सोन्याच्या स्वरूपात व बाकीची रक्कम ठरलेल्या दरानें स्वत च्या चलनात भरणा करावी अशी अट घातली आपापल्या चलनाच निधीच्या संमती खेरीज अवमूल्यन न करण्याचें सदस्यांनी मान्य केलं तसेच परदेश विनिमयाबाबतेचे निर्बंध दूर करून दुसऱ्या राष्ट्राच्या चलनाचें सुलभतेनें परिवर्तन होण्यासाठीं आपल्या चलनाचें सहाय्य देण्याचे कबूल केले चलन निधीनें निरनिराळ्या राष्ट्राचें चलन मर्यादित प्रमाणात विकत घेऊन, त्याच्या बदल्यात त्याना विदेशविनिमय देण्याचे व त्याच्या तात्पुरत्या व कायदेशीर व्यापारी व्यवहारातील तुटीचा परिहार करण्याचे ठरविलें.

मात्र या संस्थेच्या जागतिक व्यापार व विदेशविनिमय या क्षेत्रातील कार्याचें मूल्यमापन करताना मानवी योजकतेवर पडणाऱ्या मर्यादांची नोंद घेणें आवश्यक आहे ही संस्था जन्मास आली त्यावेळीं जगातील सर्व चलनात अमेरिकन डॉलर हा अत्यंत मजबूत होता. त्यामुळें ही संस्था यशस्वी व्हावयाची तर तीस अमेरिकेचें भरपूर सहाय्य मिळणें आवश्यक होतें तसेच पौंडी चलनातील व्यापारी देवघेव ही सर्वांत अधिक असल्यानें स्टर्लिंगलाहि निधीवर मानाचें स्थान द्यावें लागले. याचा परिणाम असा झाला कीं निधीला अत्यंत आवश्यक असलेल्या डॉलरचा साठा करणें शक्य झालें व स्टर्लिंग आणि डॉलर याना 'राखीव चलन' म्हणून मान्यता देण्यात आली. साहजिकच त्याना मतदानाचे जास्त हक्क मिळाले. इतर सभासद राष्ट्रांना त्याच्या चलनाचे व विनिमय परिमाणाचे दर निश्चित करताना सोन्याच्या एका औंसास ३५ अमेरिकन डॉलर या असलेल्या दरानेच करणें भाग पडलें सोन्याचा हा भाव अमेरिकेनें त्यापूर्वी सुमारे १५ वर्षे निश्चित केला होता आणि दरम्यानच्या काळात सोन्याचा बाजारभाव पूर्वी पेक्षा जवळजवळ १०० टक्यानी वाढला होता.

गेल्या १२ वर्षांतील अनुभव या दृष्टीनें फारच उद्बोधक आहे. एकदर जागतिक व्यापार ७ टक्के चक्रवाढ दराचे गतीनें वाढला पण अधिकृत सुवर्ण साठ्यात मात्र दीड टक्का इतकीच वाढ झाली १९६० मध्यें खाणींतून निघालेलं सोनें व रशियानें विक्रीस काढलेले सव्वीस कोटी डॉलर किंमतीचे सोनें जमेस धरून सोन्याचा एकूण पुरवठा जवळ जवळ १३७.५ कोटी डॉलर किंमतीचा होता पण यापैकीं फक्त एकचतुर्थांश सोनेंच अधिकृत तिजोऱ्यातून जमा झाले राष्ट्रीय चलनाच्या किंमती सोन्यात निश्चित करण्याच्या प्रयोगामुळें सोन्यास अनधिकृत जागतिक चलनाचे स्थान प्राप्त झाले. या घटनेचें आश्चर्य वाटण्याचे काहीच कारण नाहीं. सोन्याचा अधिकृत दर व त्याचा बाजारातील दर यात आज सर्व राष्ट्रात तफावत आहे. याचे दोन परिणाम झाले. एकचा

वाटल्या. अखेर निधीच्या वार्षिक सर्वसाधारण बैठकीत श्री. जेकबसन याची योजना मान्य करण्यांत आली. तसें पाहिले असता ही योजना श्री. बर्नस्टीन यांच्या योजनेचीच वेगळ्या स्वरूपातली आवृत्ति आहे असे म्हणता येईल. या योजनेप्रमाणें सध्यांच्या समासद् राष्ट्रांनी ५० ते ६० कोटी डॉलर इतक्या रकमेचें क्रेडिट अभग अशा स्वरूपाचें द्यावयाचें आहे. यापैकीं जवळ जवळ निम्यापेक्षा अधिक रक्कम अमेरिका व ब्रिटन यांनी द्यावयाची आहे,

या बाबतची तपशीलवार योजना सभासद राष्ट्रांच्या समतीसाठीं तयार आहे. पण त्यामध्यें दोन गोष्टी स्पष्ट आहेत. फंडाच्या पुढील कार्याची दिशा ठरविण्यासंबंधीचा गुरुत्वमध्य वॉशिंग्टनकडून ब्रुसेल्सकडे वळला आहे ही पहिली गोष्ट. दुसरें असे की राखीव चलन म्हणून ज्याच्या चलनाना मान्यता मिळाली आहे अशा राष्ट्रांनीं आपले आर्थिक व्यवहार नीट चालवून सर्व जगाचा विश्वास संपादन केल्याखेरीज हा प्रश्न कायमचा सुटणार नाहीं. अर्थातच कोठले तरी एखादें राष्ट्र तुटीचें झाल्याखेरीज दुसऱ्या राष्ट्राची बाह्य व्यापाराची शिल्लक वाढणार नाही हें स्पष्ट आहे. तरीही अविकसित राष्ट्रांना आर्थिक मदत देऊन तरतेपणा वाढविण्याच्या स्टॅपच्या योजनेस मुळातच नख लावण्यात आले आहे. पर्यायी म्हणून जी योजना पुढे आलेली आहे त्यामध्ये आतरराष्ट्रीय देणीं देण्याची अशी योग्य व्यवस्थापद्धति चालू विकास दशकाची गरज पुरी करणारी नाही.

आतरराष्ट्रीय स्थैर्य वाढविणे व चलनाच्या सभाव्य दुबळेपणापासून सरक्षण करण्यासाठीं सुवर्ण परिवर्तित चलनव्यवस्था कशी सुधारता येईल हा महत्त्वाचा प्रश्न आहे. या बाबतींत अमेरिका पश्चिम युरोपच्या सहकार्यानें निरनिराळ्या देशाच्या मध्यवर्ती बँकामध्यें सहकार्य घडवून आणून भाडवलाच्या तात्पुरत्या हालचालींमुळें त्या त्या राष्ट्रावर होणाऱ्या तात्पुरत्या प्रतिकूल परिणामास तोंड देण्यास समर्थ करण्याचा प्रयत्न करीत आहे. त्या बरोबरच अडचणींच्या वेळीं प्रमुख चलनाना सरक्षण फळी म्हणून उपयोगी पडतील अशा परिवर्तनीय चलनाचा साठा निर्माण करण्याचा राखीव चलनाची राष्ट्रे प्रयत्न करीत आहेत. या उपाययोजनेमुळें राखीव रोकडीची आवश्यकता थोडी कमी होईल.

सध्याची योजना गेलीं १२ वर्षें जरी चागल्या तऱ्हेनें चाललेली आहे व सट्टेबाजीच्या उद्देशानें केली जाणारी भाडवलाची हालचाल आणि प्रदानाचा जाणारा तोल यामुळें पडणारा ताण यावर तिनें बरीच मात केलेली आहे तरीपण जागतिक व्यापाराची भविष्यकाळात वाढ करण्याच्या दृष्टीनें तिच्या असलेल्या उणीवाबरोबरच विदेशविनिमयामध्यें समतोल राखण्यातहि ती अयशस्वी ठरलेली आहे. अगदीं अलीकडील घटना पाहिल्या असता सध्याच्या नियमान्वयें देशांत विदेशविनिमयाच्या ठरविल्या जाणाऱ्या दरामध्ये काहीं शुचिता राहिली आहे असे वाटत नाहीं. १९६१ मध्ये एकूण सहा चलनाचे विनिमयाचे मूळ परिमाणदर बदलण्यात आले. या सहापैकीं

पश्चिम जर्मनी व नेदरलँड याच्याच चलनाचें पुनर्मूल्यन करण्यात आलें. गेल्या सहा महिन्यात फिलिपाइन्स, अर्जेंटिना, इस्त्राइल व कॅनडा याच्या चलनाचे अवमूल्यन झालें आहे व अधिकृत दरात बदल करणें हें पाप आहे हा निधीचा मूळ नियमच पायदळीं तुडवला गेला आहे.

स्टर्लिंगच्या क्षेत्रात विनिमयाचे दर बरेच लवचिक राहिले आहेत भारतीय रुपयाची अधिकृत किमत १९२४ पासून १ शिलिंग ६ पेन्सावर स्थिर राहिली आहे. पण गेल्या जवळजवळ ४० वर्षांत दोन्हीं देशात झालेले आर्थिक बदल लक्षात घेता दराच्या युक्ततेबद्दल मतभेदच आहेत. १८९२ ते १९१९ या दरम्यान हाच दर १ शिलिंग ३ पेन्स व २ शिलिंग २ पेन्स याच्या दरम्यान हेलकावे खात होता याचें स्मरण करून देणें येथे अस्थानीं ठरणार नाहीं. स्वत.चें स्वतत्र धोरण आखणाऱ्या अशा मध्यवर्ती बॅकाच्या स्थापनेमुळें जरा त्या सर्वांना समान बाह्य परिस्थितीवर आधारलेले असे एकच प्रकारचें विनिमय नियत्रण आणता येत असले तरी सबध स्टर्लिंग विभागासाठी सर्वांना समान असे निश्चित आर्थिक धोरण ठरविण्याच्या बाबतींत अडचणी निर्माण होऊ लागल्या आहेत. स्टर्लिंग विभागातील वैयक्तिक सभासद आपापल्या गरजेनुसार विदेश-विनिमयाच्या बाबतींत स्वत ला सोयीस्कर असे फेरफार करीत आहेत. बाहेरून एकात्म असणाऱ्या या स्टर्लिंग विभागातील सभासदामध्यें अनेकात्मता दृष्टीस पडत आहे. इग्लडनें १९४९ साली डॉलरचा पौंडाशीं असलेला परिमाणदर ४०३ पासून २८० वर आणला तेव्हा भारताचा सल्ला घेतला नाहीं. स्टर्लिंग विभागातील इतर सर्वच्या सर्व राष्ट्रांनींहि इग्लडच्या पावलावर पाउल टाकले नाही.

वरील विवेचनावरुन विदेशविनिमय हा विषय कसा गुतागुतीचा आहे हें ध्यानात येईल. आतरराष्ट्रीय चलननिधीला विनिमयाचे दर ठरविण्याचा अधिकार असताना व तिच्या सल्ल्याखेरीज परिमाणें बदलावयाची नसताना विनिमय बाजारात आढळून येणारी अनिश्चितता कशी असते यावर प्रकाश पडेल. याच कारणामुळें इग्रजी भाषेत सुध्दा या विषयावर फारच थोडीं पुस्तकें आहेत. मराठी भाषेत तर या विषयावर पुस्तक लिहिणें हें योग्य अशा तात्त्विक भाषेच्या अडचणीमुळे जास्तच अवघड आहे. म्हणून श्री. वसत पटवर्धन यानी महाराष्ट्रीयाना या विषयाची मराठींतून माहिती करुन देण्याचा केलेला उपक्रम स्तुत्य आहे.

विदेशविनिमय या पुस्तकात या विषयाच्या तीन अगाचा स्थूलमानानें विचार केला आहे. पहिल्या भागात विदेशविनिमयाचे दर व तात्त्विक भाषा याचें विवेचन केलें आहे. दुसऱ्या भागात विदेश विनिमयाच्या व्यवहारात लागणाऱ्या कागदपत्राची माहिती दिली आहे. तिसऱ्या भागात फॉरिन एक्स्चेंज रेग्युलेशन ॲक्ट या कायद्याच्या अगोपागाची माहिती दिली आहे. हा कायदा सन १९४७ मध्यें डिफेन्स ऑफ इडिया रूल्सच्या युध्दकालीन नियमाखाली माडवलाच्या हालचालीवर

नियन्त्रण घालण्यासाठी करण्यात आला व त्यात अनेक सुधारणा करुन तो अलीकडेच परिपूर्ण करण्यात आला आहे. विदेशविनिमय नियन्त्रण आता कायम रहाणार आहे असाच त्याचा अर्थ होय व ज्या कोणास या ना त्या रूपाने विदेश विनिमयात व्यवहार करावयाचा आहे त्याला आपली कृति नियमग्राह्य नाही ना याची खात्री करुन घेण्यासाठीं या कायद्याचा अभ्यास करणें आवश्यक आहे.

अगदीं परवापरवापर्यंत महाराष्ट्रीयाचा विदेश विनिमयाशीं जो काय संबंध येई तो केवळ अर्थशास्त्राचा अभ्यासक म्हणून किंवा भारताच्या बाहेर जाणारा प्रवासी म्हणूनच येई. आता मात्र त्यानीं स्वतन्त्र व्यापार उद्योग करण्यास सुरुवात केली आहे म्हणून त्याना विदेश विनिमयाचा विषय व प्रश्न विशेष महत्त्वाचा आहे. ' विदेश विनिमय ' हें पुस्तक वाचून त्यास उपयुक्त माहिती मिळेल. अनेकविध माहितीचीं परिशिष्टे व रिझर्व बॅंकेने एक्सचेंज कंट्रोल ॲक्टखाली प्रसिद्ध केलेले तक्ते यामुळे पुस्तक अद्ययावत झाले आहे. मात्र वाचकानें विदेश विनिमयावरील निर्बंधात वेळीं-वेळीं बदल होतात हे लक्षात ठेवलें पाहिजे. हे होणारे बदल सोडले तर हें पुस्तक आपल्याकडे व विशेषतः महाराष्ट्रात विशेष माहिती नसलेल्या अशा एका विषयावर उपयुक्त माहिती देणारे आहे. विशेष अभिनंदनीय गोष्ट म्हणजे साधी व ओघवती भाषाशैली आणि समर्पक अशी मराठी शब्दरचना वापरण्याचा कटाक्ष. उदा. प्रास्ताविकाच्या सुरवातीच्या परिच्छेदातच लेखकानें ' फॉरेन एक्सचेंज ' या इंग्रजी शब्दास आजपर्यंत पर्यायी म्हणून रुढ झालेल्या मराठी शब्दातून व्यक्त होणाऱ्या पुराणप्रियतेचा समाचार घेतला आहे तो युक्त वाटतो. फॉरेन एक्सचेंजला मराठी भाषेत परदेशी हुंडणावळ हा शब्द वापरावयाचें आपल्या अंगवळणीं पडलें आहे पण ' विदेश विनिमय ' हाच अधिक योग्य शब्द आहे. हे लेखकानें आपणास पटवून दिले आहे. व तेंच नाव पुस्तकास दिले आहे. या पुस्तकानें मराठी वाङ्मय व शास्त्र या विषयाच्या वाचकाना एक नवें क्षेत्र उपलब्ध करुन दिलें आहे. चोखंदळ मराठी वाचक त्याचें मोठ्या उत्सुकतेनें व आस्थेनें स्वागत करतील असा मला विश्वास वाटतो.

फायनॅनशल एक्सप्रेस मुंबई गो म. लाड

२५ जून १९६२

## प्रकाशकाचे हृद्गत

सप्रेम नमस्कार वि. वि.

अर्थशास्त्र, बँकिंग वगैरे विषयावर मराठीत जरी ग्रंथनिष्पत्ति अलीकडे होऊ लागली असली तरी अशा ग्रंथाचें स्वरूप विश्वविद्यालयीन पाठ्यक्रमांस अनुसरून असतें. सामान्य वाचकाना तात्त्विक विषयाचें मूलग्राही ज्ञान आवश्यक आहे असें वाटल्यानें, बँक ऑफ महाराष्ट्र लि. पुणेंचे जनरल मॅनेजर श्री. चिं. वि. जोग यांचा 'बँका व त्यांचे कारभार' हा ग्रंथ आम्हीं १९६० साली प्रसिद्ध केला. त्याचे चांगलें स्वागत झाल्यानें 'विदेशविनिमय' हा ग्रंथ आम्हीं आज प्रसिद्ध करीत आहों. बँक ऑफ महाराष्ट्र मधील विदेशविनिमय खात्याचे प्रमुख श्री. एम्. व्ही. उर्फ वसंतराव पटवर्धन यांनी आमचेसाठीं हा ग्रंथ लिहून दिला याबद्दल आम्हीं त्यांचे आभारी आहों. अध्ययन व परदेशपर्यटनाच्या वेळेचें निरीक्षण यांच्या साहाय्यानें त्यांनीं हा ग्रंथ उपयुक्त व उद्बोधक तर केला आहेच पण सोपी भाषा वापरल्यानें विदेशविनिमय त्यांनीं सुबोधहि केला आहे.

या ग्रंथाच्या शेवटीं विदेशविनिमय व्यवहारास उपयुक्त असलेले सुमारें ४२ नमुने मूळ स्वरूपात ठशाच्या स्वरूपात आम्हीं दिलेले आहेत. ते वापरण्यास दिल्या-बद्दल बँक ऑफ महाराष्ट्र व संबंधित संस्था यांचे आम्हीं ऋणी आहों.

माझे मित्र व फॅनॅनशिअल एक्स्प्रेसचे संपादक श्री. गो. मं. लाड यांनीं अत्यंत थोड्या अवधींत व परदेशपर्यटनाच्या गर्दीत या ग्रंथाला माहितीपर व सविस्तर प्रस्तावना लिहून दिली याबद्दल मीं त्यांचा ऋणी आहे.

*मुंबईच्या निर्णयसागर मुद्रणालयानें ग्रंथाची सुबक छपाई करून दिली*, मे. व्ही. जोशी आणि कं. नें ठसे केले. श्री. सुधाकर खाजगीवाले यांनीं मुखपृष्ठ सजविलें. या सर्वांचे मनःपूर्वक आभार.

कळावें लोभ असावा ही विनंति.

व्हीनस बुकस्टॉल : पुणे २ — आपला,

१५ जुलै १९६२ — *अ. ह. लिमये*

# या ग्रंथासंबंधी

दैनंदिन व्यवहारात हल्ली अनेकजणांना या ना त्या कारणाने विदेशविनिमयाचा लहानसा तरी व्यवहार करावा लागतो. कुणाला शिक्षणासाठी परदेशी जावे लागते, कुणाला वर्गण्या भरावयाच्या असतात, कुणाला काही वैयक्तिक आयात करावयाची असते. औद्योगीकरणाची वाढ जसजशी झपाट्याने होत आहे तसतशी व्यापारी क्षेत्रातही आयातनिर्यात व्यवहार करणाऱ्यांची संख्या वाढतच जात आहे. या सर्वांना योग्य त्या माहितीच्या अभावी अनेकदा त्रास सहन करावा लागतो किंवा त्यामुळें व्यवहारांत अडचणी निर्माण होतात तसेच भारतात सन १९३९ पासून विनिमयनियंत्रण जारी झालें आहे व आज बावीस वर्षे ते अस्तित्वात असून ते लौकर उठण्याची शक्यता नाहीं त्यामुळें विदेशविनिमयाचा व्यवहार करताना प्रत्येकाला त्या बाबतची बंधने व नियम माहीत असणे जरूरीचे आहे तेव्हा सर्वसामान्य व्यक्तीला विदेशविनिमय म्हणजे काय हे समजावें असा उद्देश धरून हे पुस्तक लिहिण्याचा मी प्रयत्न केला आहे. मराठीतच काय पण प्रादेशिक भाषांतून या विषयावर हे पहिलेच पुस्तक आहे. विदेशव्यापाराच्या दृष्टीने महत्वाचा असा भाग तसेच भारतीय विनिमयनियंत्रणाचे नियम देताना पूर्वपीठिका म्हणून विदेशविनिमयाचे शास्त्रही थोड्याफार प्रमाणात सुरवातीस दिले आहे, व विनिमयनियंत्रणाच्या इतिहासाचीही थोडी माहिती घातली आहे प्रस्तुत विषयावर मराठीत लेखन झालेले नसल्याने व विषय संपूर्णपणे तांत्रिक असल्याने बऱ्याच इंग्रजी शब्दांना नवीन मराठी शब्द योजावे लागले आहेत. पण ते एकदम रुळणार नसल्याने व लक्षात न आल्याने वाचकाचा घोटाळा होऊ नये म्हणून बऱ्याच ठिकाणी इंग्रजी शब्दांचाही वापर केलेला आहे मराठी शब्द रुळल्यानंतर इंग्रजी शब्द आपोआपच मागे पडावेत अशी अपेक्षा आहे

*Outline of Exchange Control in India* या रिझर्व बँकने प्रकाशित केलेल्या पुस्तिकेचा भारतीय नियंत्रणाबाबत लिहिताना उपयोग करण्याची रिझर्व बँकने अनुमति दिली आहे त्याबद्दल रिझर्व बँकेचा मी ऋणी आहे. पुस्तकाचे श्रेय प्रामुख्याने महाराष्ट्र बँकेचे मुख्य व्यवस्थापक श्री. जोग व अध्यक्ष श्री वा पु वर्दे यांजकडे आहे, कारण त्यांच्या सततच्या प्रोत्साहनानेच मी हे काम पार पाडू शकलो आहे. महाराष्ट्र बँकेतर्फे मला इंग्लंड व युरोपमध्ये दौरा करण्याची व विदेशविनिमयाचा व्यवहार अनेक बँकांतून बघण्याची जी संधी मला मिळाली त्याचा बराच उपयोग या लेखनाचे कामात झालेला आहे.

सदर पुस्तकाचे हस्तलिखित बघताच माझे स्नेही श्री अनंतराव लिमये यांनी ते

लगेच प्रकाशित करण्याचे ठरवले त्याबद्दल त्याचाही मी आभारी आहे. विशेषतः नव्या तऱ्हेचे लेखन मराठींत प्रकाशित करण्याबद्दल ते नेहमीच अुत्सुक असतात याची खात्री त्यांच्या या धाडसामुळें नक्कीच होअील.

तसेच प्रस्तावनेबद्दल श्री. गो. म. लाड याचे आभार मानणें अस्थानी ठरणार नाहीं. माझे एक सहकारी श्री. जोशी यानीं पुस्तकाचें मुद्रण चालू असता मुद्रिनें पाहिलीं त्याबद्दल त्यांचा मीं आभारी आहे. तसेच मुद्रणप्रत तयार करण्याचे कामी श्री. कानिटकर बन्धू व माझे धाकटे बन्धु भागिनी यानी मदत केली आहे. या घरच्यामंडळीचे आभार मानणें अप्रस्तुत ठरेल.

विदेशविनिमय हा विषय बराच मोठा असल्यानें या पुस्तकांत सर्व बाबींची सपूर्ण माहिती देणे शक्य झालेले नाहीं. तरीपण सर्वसामान्य व्यक्तीची व या विषयाच्या विद्यार्थ्यांची गरज तरी त्याने भागेल अशी आशा आहे. त्यासाठीं काही मुद्याची पुस्तकात मुद्दाम पुनरुक्ति केलेली आहे. तसेच हल्ली सर्वत्र विनिमयव्यवहारातील आकडेमोडीसाठीं यंत्राचाच उपयोग केला जात असल्याने विनिमयाचे गणित म्हणून जे असते (Exchange Areithmetic) त्याचाही पुस्तकात समावेश केलेला नाही. तरीपण त्यास आवश्यक असणारी अनेक कोष्टके व परिशिष्टें मात्र देण्याचा प्रयत्न केला आहे. तसेंच विनिमयनियत्रणाबाबत शक्यतो अद्यावत माहिती देण्याचा प्रयत्न केला असला तरी कालमानाप्रमाणें असे नियम रिझर्व बॅंक वा अन्य नियत्रणाधिकारी बदलत असतात तरी प्रत्येकवेळीं सर्वसामान्यपणें आपल्या आधिकृत बॅंकेला नियत्रणाचे चालू नियम व्यवहार करण्यापूर्वी सबधितानी विचारणे इष्ट ठरेल. या पुस्तकानें विदेशविनिमयाबाबत लोकाची उत्सुकता जागृत होऊन विदेशी चलनाचा योग्य तोच उपयोग करण्याचे व ते सवर्धित करण्याचे वाचकानी ठरवले तर पुस्तकाचा हेतु साध्य झाला अशी आशा बाळगण्यास हरक्त नाही.

" श्रीशोभा "

१३१८ शुक्रवार पुर्णे २. वसन्त पटवर्धन

२५ जुलै १९६२.

# अनुक्रमणिका

## भाग पहिला

### प्रकरण पहिलें-विदेशविनिमय



### प्रकरण दुसरें-दृश्य व अदृश्य व्यापार



### प्रकरण तिसरें-तांत्रिकशब्द व त्यांचे अर्थ



### प्रकरण चौथें-विनिमयव्यवहार



### प्रकरण पांचवें-इतिहास व पूर्वपीठिका



## भाग दुसरा

### प्रकरण सहावें-विदेशविनिमय खातें

एकूण पृष्ठें ४३२

# विदेशविनिमय

१

**परदेशी हुंडणावळ चुकीचा शब्द :** सध्या विदेशविनिमयव्यवहाराला परदेशी हुडणावळ हा शब्द फारच रूढ झाला आहे, पण तो कुठल्याच अर्थाने बरोबर नाही. परदेशी हुडणावळ असे भाषांतर करताना Exchange या शब्दाचा इथे चुकीचा अर्थ घेतला गेला आहे. हुडणावळ म्हणजे कसर होय, पण Foreign Exchange या शब्दातील Exchange चा बरोबर अर्थ करावयाचा असल्यास त्याचे भाषांतर 'विनिमय' असेच होऊ शकेल. 'विनिमय' या शब्दाने परस्पर देवाण-घेवाण सुचविली जाते, जसे विचारविनिमय वगैरे. त्यामुळेच हुडणावळ म्हणजे कसर हा चुकीचा शब्द सोडून खऱ्या अर्थाने परदेशी विनिमय किंवा 'विदेशविनिमय' हा खरा शब्दच निदान यापुढे तरी रूढ केला गेला पाहिजे.

**विदेशविनिमयाचे अर्थ :**

इंग्रजीत फॉरेन एक्स्चेज (Foreign Exchange) या शब्दाने पुष्कळदा वेगवेगळे अर्थ ध्वनित केले जातात. सर्वसाधारणपणे दुसऱ्या देशाच्या चलनाबद्दल, नाण्याबद्दल, पैशाबद्दल बोलताना या शब्दाचा उपयोग केला जातो उदाहरणार्थ, परदेशी जाताना विदेशी चलन (Foreign Exchange) लागते, तसेच विदेशविनिमयाच्या खरेदी विक्रीचा व्यवहार बँका करतात असे म्हटले जाते, तेव्हा याच विदेशी चलनाची किंवा त्या चलनावरील हक्काची अशी खरेदी विक्री होते असेही समजले जाते म्हणजे हा दुसरा अर्थही त्याच शब्दप्रयोगाने इंग्रजीत ध्वनित केला जातो काही वेळा वर्तमानपत्रातून वगैरे याच शब्दाचा उपयोग दोन देशातील चलनपद्धतीचे एकमेकाशी असलेले सापेक्ष प्रमाण दाखविण्यासाठी करतात (Foreign Exchange Rates) म्हणजेच विदेशातील पैसे अगर त्याबद्दलचे हक्क यांच्या व्यवहाराच्या पद्धती

प्रकार, कारणें, परस्परसंबंध या सर्वांचा उलगडा करताना हे शब्द वापरले जातात. बऱ्याच वेळां त्यातील 'विदेश' हा शब्दही काढून टाकला जाऊन फक्त Exchange ऊर्फ विनिमय हाच शब्द वापरला जातो, व विनिमय-नियंत्रण (Exchange Control) भारतीय विनिमय (Indian Exchange), असे शब्दप्रयोग केले जातात. या शब्दप्रयोगांतून नुसत्या परदेशी चलनाबद्दलच बोलले जातें असे नव्हे तर कित्येकदां आपल्या नाण्यावर—म्हणजे रुपयांवर—जर विदेशी नागरिकांचा, देशांचा हक्क आला, तर भारतीय रुपयांचे असे व्यवहारसुद्धां विदेशविनिमयाच्या प्रकारांतच गणले जातात.

## विनिमयाची कल्पना :

विदेशविनिमय या शब्दानें, व्यापाराची जी मूळ कल्पना विनिमयाची म्हणजे देवघेवीची आहे तिचा स्पष्ट बोध होतो. पूर्वी मानवाला जेव्हां पैसा माहीत नव्हता आणि त्याच्या गरजाही थोड्या होत्या त्यावेळीं तो आपल्याला पाहिजे असलेल्या वस्तूच्या बदल्यांत आपल्याजवळची वस्तू देऊन आपली गरज भागवत होता. पण पुढें आपल्याजवळची वस्तू, दुसऱ्या गरजू मनुष्याला देऊन त्याच्याजवळ जास्त असलेली वस्तू तो बदली देईल याची शक्यता, जसजशा गरजा वाढत्या होऊं लागल्या तसतशी कमी होऊं लागली. कारण या प्रकारांत दुसऱ्या माणसालाही त्याच वस्तूची गरज असली तरच ती शक्यता होती. 'अ' जवळ गहू असले आणि त्याला 'ब' जवळचे कातडे हवे असले तरी 'ब' ला गव्हाची जर गरज नसेल तर तो 'अ' जवळ अदलाबदलीला तयार होणार नाही. तसेच मनुष्यवस्तींतील अंतर वाढू लागले तस तसे असा गरजू मनुष्य हुडकून काढणें सोपे राहिले नाही. यातून पैशाची जरुरी निर्माण झाली व तो अस्तित्वातही आला. प्रथमप्रथम गुरांच्या, मग कवड्यांसारख्या वस्तूंच्या प्रकारांत व सरते शेवटीं नाण्यांच्या प्रकारात "पैसा' दृश्य झाला व तो देवघेवीत स्वीकारला जाऊ लागला. 'किंमती मोजण्याचे साधन' म्हणून टिकाऊ स्वरूपाचा पैसा अशा तऱ्हेनें वापरला जात असता, त्याच्या किंमतीबद्दलचा व तो दिला असता अन्य माणसांकडून आपल्याला पाहिजे तेव्हां दुसऱ्या वस्तू मिळतील

व तो पैसा नाकारला जाणार नाही हा घेणारा व देणारा यामधला त्या साधनाबद्दलचा विश्वास हे त्यांतील महत्त्वाचे अंग होते. अशा रीतीने व्यापार आणि विनिमय ( Exchange ) यांची सांगड बसल्यानंतर व मनुष्यसमाज पुढे चलनाचा विनिमयासाठीं माध्यम म्हणून उपयोग करूं लागल्यानंतर अशा माध्यमाबद्दलची जी शास्त्रें पुढे आली त्यांत विदेशविनिमयाचे स्वतंत्र शास्त्र होणें अपरिहार्य ठरले.

## व्यापार व विदेशविनिमयाचा संबंधः

विदेशविनिमयाचे हे व्यवहार कसे निर्माण होतात हे बघण्यासाठी कांही वेगळी माहिती आधीं असणे जरूर आहे. कुठल्याही देशाला हल्लींच्या जगांत दुसऱ्या देशाशीं व्यापारविनिमय हा करावाच लागतो. हा व्यापार दोन वेगवेगळ्या प्रकारचा असूं शकतो. पहिला म्हणजे त्या देशांत होणाऱ्या पण तिथे न लागणाऱ्या किंवा बाहेर विकल्यास जास्त पैसा देणाऱ्या वस्तूंची निर्यात व दुसरा म्हणजे त्या देशांत न होणाऱ्या किंवा बाहेर स्वस्त मिळणाऱ्या पण तिथल्या नागरिकाना लागणाऱ्या वस्तूंची आयात. एखादा देश फक्त निर्यातव्यवहारच कदाचित् करणे शक्य आहे तर दुसरा फक्त आयातव्यवहार करणे शक्य आहे. पण बहुतेक देश मात्र थोड्याफार फरकाने आयात व निर्यात ह्या दोन्ही प्रकारचा व्यवहार करतात. फारच थोडया देशांतून त्यांच्या नागरिकांना लागणाऱ्या सर्व वस्तू तिथे उपलब्ध होऊं शकतात आणि आपल्याला वाटलेली गरज पुरविण्यासाठीं साहजिकच ती वस्तू जो देश उत्पादन करीत असेल व विकूं इच्छीत असेल तिथून ती घेणे म्हणजेच आयात करणे हे त्या नागरिकाना क्रमप्राप्त आहे. अशी आयात कांही कारणांनी ( जी पुढें नियंत्रणाचा विचार करताना बघितली जातील ) करावयाची नसेल तर त्याचा अर्थ ती गरज एक तर मारली तरी पाहिजे किंवा त्या वस्तूचे उत्पादन स्वतःच्या देशांतच ( कदाचित् कांही अन्य उत्पादन थांबवूनही ) केले पाहिजे. खुल्या व्यापारांत युद्धोत्तर कालानंतरची सध्यांची कांही वर्षे सोडली तर हे दोन्ही प्रकार अवलंबिले जात नव्हते. मनुष्याचे राहणीचे मान जसजसे वाढूं लागते तसतसे असलेल्या

गरजा मारण्याऐवजी किंवा न पुरविण्याऐवजी त्या वाढवण्याचीच प्रवृत्ती होऊ लागते. आजची चैनीची वस्तू वाढत्या राहणीमानात उद्या सुखसोयीची वस्तू ठरते आणि परवा ती गरजेची, आवश्यक किंवा निकडीची वस्तू ठरते. त्याचप्रमाणे दुसऱ्या पर्यायाचाही विचार केला तर असे दिसून येईल की प्रत्येक राष्ट्राला सर्व वस्तू स्वत च निर्माण करणें शक्य होणार नाही. काहीं बाबतींत निसर्गाच्या परिस्थितीमुळें तें जमणार नाहीं. समुद्रसपाटीवर असलेल्या जमिनींत चहाची लागवड होऊं शकणार नाही तर डोंगराळ राष्ट्रांत गहू, कापूस यासारखे पदार्थ मिळू शकणार नाहींत, काहीं बाबतींत काहीं देशांना निसर्गाचेंच वरदान असतें. उदाहरणार्थ–इराण इराकला तेलाची देणगी मिळाली आहे तर मलायाला टिनच्या खाणीची, भारताला अभ्रकाच्या खाणीची देणगी आहे तर आफ्रिकेला सोन्याच्या खाणीचें वरदान आहे. उद्या इंग्लंडला वाटलें तरीही तिथे त्याची गरज भागण्याइतकें तेल, टिन, अभ्रक वा सोने मिळणार नाहीं हें उघड आहे. त्याचप्रमाणें काहीं वेळेला असें उत्पादन समजा शक्य असलें तरी इष्ट ठरत नसतें. हवामान, मजूर, यंत्रें याची आवश्यकता विचारात घेता काहीं वेळा अशा वस्तु परदेशांतून आयात करणेंच समजसपणाचें ठरत असतें. त्यातून अन्य एखाद्या राष्ट्रानें एकाच ठराविक वस्तूचें उत्पादन मोठ्या प्रमाणावर केलें तर त्यात ते "तज्ञ" होऊन त्या तज्ञतेचा, किंमती कमी होण्यात व पर्यायानें आयात करणाऱ्याच्या फायद्यातच शेवट होत असतो तसेच कित्येकदा औद्योगिकरीत्या प्रगत न झालेल्या राष्ट्राला प्रगतीसाठींही अशा वस्तूंची व भांडवली आयात प्रथम करावी लागते.

तसेंच कित्येकदा लोकसंख्येचा वाढता ताणही काहीं वेळा आयात अपरिहार्य करतो. गेल्या काहीं वर्षांतील भारताची अन्नधान्याची आयात हें याचे उत्कृष्ट उदाहरण ठरेल. त्याचे उलट लोकसंख्या कमी असल्यानें ऑस्ट्रेलिया न्यूझीलंडसारखे देश, लोणी व मास याची बाहेर निर्यात करू शकतात.

तात्पर्य ज्याप्रमाणें दोन व्यक्तींत कुठलीही देवघेव होऊन पूर्वी जशा गरजा भागत होत्या त्याचप्रमाणें दोन व अनेक राष्ट्रांतही अशीच देवघेव म्हणजे व्यापार होऊन जगाची प्रगती चालू राहिली आहे व गरजा भागत राहिल्या आहेत.

अशी देवघेव फक्त वस्तूंचीच (Goods) होते असें नाहीं तर कामाचीही (Services) होते. या वेगवेगळ्या गरजा व त्यासाठीं अशी अदलाबदली होत असतां आणखी एका गोष्टीची गुतागुंत होणे स्वाभाविक होते. मनुष्यजात पृथ्वीच्या खंडावर वेगवेगळ्या ठिकाणीं वस्ती करूं लागल्यानंतर ठिकठिकाणीं एकसंघ असे त्यांचे गट, कळप बनले व अशा समुदायांतून वेगवेगळीं राष्ट्रें निर्माण झालीं. या राष्ट्रांच्या शासनसंस्था अस्तित्वांत आल्या व प्रत्येकानें माध्यमासाठीं स्वतःच्या परिस्थितनुरूप असें "चलन" निर्माण केलें, व त्या त्या राष्ट्राच्या सरकारनें निर्मिलेलें चलन त्या त्या देशांत वापरण्यांत येऊं लागलें. "सुवर्ण" मात्र सगळ्यांनाच मान्य होणारी वस्तू असल्यानें ती व कांहीं प्रमाणांत "चांदी" ही मात्र सर्वत्र देवघेवीसाठीं वापरली जाऊं लागली. (व आंतरराष्ट्रीय व्यवहारात अजूनही त्यांचें, विशेषतः सोन्याचें स्थान कायम आहे.) पण या प्रगतीबरोबरच गुंतागुत वाढून कुठलाही व्यापार त्या त्या राष्ट्रांतील व्यक्तीपुरताच मर्यादित न राहतां इतर राष्ट्राबरोबरही सुरू झाला. भारतांतील व्यक्तीला इंग्लंडमधील व्यक्तीशीं व्यापार करण्याची आवश्यकता वाटूं लागली तर न्यूझीलंडमधील शेतकऱ्याला इंग्लंडमधल्या लोकांना लोणी विकून जपानमधून आपल्या धंद्यासाठीं मशिनरी मागविण्याची जरूरी वाटूं लागली. पण या सर्व प्रकारांतच त्यामुळें एक अडचण निर्माण झाली.

न्यूझीलंड मधल्या शेतकऱ्याला इंग्लंडमधल्या व्यापाऱ्याकडून लोण्याऐवजीं इग्लीश पौंडाची नोट घेणें पसंत नव्हतें कारण त्या नोटेनें त्याच्या देशांत त्याला दुसरी वस्तू मिळण्याची शक्यता नव्हती, किंवा ती नोट अथवा स्वत चें चलन जपानमधल्या कारखान्याला तो मशिनरी पोटीं देऊं शकत नव्हता कारण जपानी मनुष्य "येन" म्हणजे त्याच्या राष्ट्राचेंच नाणें मागणार हें स्वाभाविक होतें. विदेशविनिमयाच्या शास्त्राचा उगम नेमका याच ठिकाणीं झाला, आणि अंतर्गत व्यवहारातील हुंडीची पद्धत सुरवातीसुरवातीस इथेंही लागूं होऊं लागली.

समजा 'अ' या भारतीय इसमानें 'ब' या इंग्रजी इसमाला कांहीं माल विकल्यानें 'ब'कडून ५०० रुपयांची रक्कम येणें झाली पण ब हा फक्त त्याला पौंडांतच रक्कम देऊं इच्छितो, ती 'अ' घ्यायला तयार नाहीं. त्याच वेळीं समजा 'क' या इंग्लिश व्यक्तीनें 'ड' या भारतीय व्यक्तीला कांहीं माल विकल्यानें 'ड' कडून त्याला ५०० रुपयांइतक्या पौंडांचें येणें असलें तर या चौघांचा एकमेकांतील व्यवहार सगळ्यांच्या संमतीनें दोन हुंड्यानींच भागूं शकेल. आपल्या मालापोटीं येणें असलेल्या रकमेसाठीं 'अ' हा 'ड' वर हुंडी काढील व त्याचेकडून पैसे घेईल व त्याच तऱ्हेनें 'क' हा 'ब' वर पौंडांत हुंडी काढील व इंग्लंडमध्यें आपले पैसे वसूल करून घेईल. दुसरा प्रकार म्हणजे 'अ' नें 'ब' वर 'क' ला पैसे द्यावेत अशी हुंडी काढावयाची. याउलट 'क' नें 'ड' वर 'अ' ला पैसे द्यावीत अशी हुंडी काढायची. 'अ', नें ब वर काढलेली हुंडी, तो क-कडे पाठवील व 'क' नें ब-कडून पैसे घ्यावेत व 'अ' नें ड-कडून त्याला आलेल्या हुंडीचे पैसे घ्यावेत अशी सोय होऊन, आपल्या मालाचे ज्याचे त्याला म्हणजे 'अ' ला व 'क' ला आपापल्या चलनांत पैसे मिळतील.

अर्थात् अदलाबदलीच्या (Barter) पद्धतीप्रमाणेंच दर वेळेला अशा चारीही व्यक्ति एकत्र येऊं शकतील व त्यांच्यांतील देवघेवीच्या रकमाही सारख्या असतील हें शक्य होणार नाहीं. तेव्हां "पैशा" प्रमाणेंच प्रत्येकाचा व्यवहार बघण्यासाठीं सगळ्यांचा विश्वास असणारी व चलनांतले हे व्यवहार संभाळणारी संस्था असणें जरुरीचें झालें आणि असा विदेश-विनिमयाचा व्यवहार करणाऱ्या किंवा करूं शकणाऱ्या बँका, हुंडेकरी यांच्या-वर हें काम पडलें. अशा रीतीनें अशा अधिकृत संस्था, व्यापाऱ्यांना, सरकारला, संस्थांना व व्यक्तींना विदेशी चलन विकूं लागल्या किंवा त्यांच्या-कडून असें विदेशी चलन विकत घेऊं लागल्या व चलन देणाराला किंवा घेणाराला वर उल्लेखिल्याप्रमाणें हुंड्यांचे प्रत्यक्ष व्यवहार करण्याची जरूरी राहिली नाहीं.

## विदेशविनिमयाशीं संबंधित सिद्धान्त :

असा व्यवहार करतांना अशा रीतीनें विक्रेता, खरेदीदार व ही संस्था अशा तीन घटकांचा जरी समावेश होऊं लागला तरी विदेशविनिमयाच्या व्यवहारांतील गुंतागुंत टळणें शक्य नव्हतें. कारण या व्यवहारांत दुसऱ्या देशांतील पैशांबद्दल सर्वजण गुंतलेले असतात. शंभर रुपयांची वस्तू एकाद्या भारतीय व्यक्तीनें विकली तर त्यानें किती पौंड, शिलिंग घेतले असतां त्याची रक्कम बरोबर अदा झाली हें ठरवायला मोजमाप हवेंच आणि एका चलनाच्या कांहीं परिमाणांना दुसऱ्या चलनाच्या कांहीं परिमाणाचें गणित ठरवतांना अनेक अन्य गोष्टींचा या व्यवहारांत अंतर्भाव होणें क्रमप्राप्त झालें. अशा किती पौंडांचे किती रुपये, किती फ्रँकचे किती मार्क्स हें कोष्टक त्या व्यवहारांत गुंतलेल्या दोन्ही पक्षाना कळणें आवश्यक असतें व मान्यही असावें लागतें. या अडचणींतून तोड काढण्यासाठीं अनेक सिद्धान्तांचा जन्म झाला. त्याचें मूलस्थान अर्थात् दैनंदिन व्यवहारांतच होतें व अर्थशास्त्राच्या मागणीपुरवठा वगैरे तत्वांशीं निगडितही होतें. अशा प्रकारें दोन देशांतील चलनांचीं प्रमाणें ठरवितांना वेगवेगळे जे सिद्धान्त मांडले गेले त्यातील महत्त्वाचा सिद्धान्त म्हणजे "समानक्रयशक्ति परिमाण" हा होय. अर्थात् या विषयाचा अर्थशास्त्राशीं जास्त निगडित संबंध असल्यानें त्याचा इथें फारसा उहापोह न करतां फक्त त्यातील मध्यवर्ति कल्पनाच दिली आहे.

## 'समान क्रयशक्ति सिद्धांत' :

या सिद्धान्तानुसार, जर दहा रुपयांला मिळणारे फाउंटन पेन ब्रिटनमध्यें १५ शिलिंगाला विकलें जात असलें तर दहा रुपयाची सर्वसामान्यपणें १५ शिलिंग ही बरोबरीची किंमत समजली जावी अशा प्रकारचा त्याचा निष्कर्ष आहे. कुणीही व्यक्ति ज्या वेळेला आपल्याजवळच्या वस्तूंचें पैशांत रूपांतर करते त्या वेळेला तिला त्या पैशाच्या द्वारें दुसरी काहीं वस्तू घेणें अभिप्रेत असतें असें सर्वसामान्यपणें समजावयाला हरकत नाहीं. अशा पैशाचा उपयोग, वस्तू विकत घेण्याऐवजीं भावी कालासाठीं शिल्लक टाकणें असेल किंवा ती वस्तु भविष्य काळात घ्यायची त्याची इच्छा असेल वगैरे बारकावे इथें आपण लक्षांत घेत नाहीं. म्हणजे ज्या माणसाजवळ आज

दहा रुपये आहेत त्याचे तो फाउंटन पेन घेऊं इच्छितो एवढेंच आपण इथें लक्षांत घेत आहोंत. भारतांत जें फाउंटन पेन दहा रुपयांना मिळेल तें त्याला ब्रिटनमध्यें खरेदी करावयाची असलें तर पंधरा शिलिंग खर्च *करावयाला हवेत असें आपण मानूंया. अर्थात् सरकारी कर, बंधनें, मालाची* गुणवत्ता, आणण्यानेण्याचा खर्च अशा गोष्टीही या सिद्धान्ताचा विचार करतांना सध्या आपण लक्षांत घेत नाहीं हें विसरून चालणार नाहीं. अियेंही क्रयशक्ति व चलनपरिमाण यांत मागणी व पुरवठा यांच्या मूळ सिद्धान्तानें गुंतागुंत होणें अपरिहार्य आहे; पण हें जर वगळलें तर दहा रुपयांची पर्यायी किंमत पंधरा शिलिंग ठरेल हें उघड झालें. दहा रुपयांला पंधरा शिलिंग हा दर इतर कांहीं कारणानें बदलला (कारण फक्त फाउंटनपेनच्या एकाच वस्तूवर हा दर ठरणार नाहीं, किंवा त्या दरांवर इतरही परिणाम होतील) व वीस शिलिंग झाला तरी पण इंग्लंडमध्यें फाऊंटन पेनची किंमत मात्र पंधराच शिलिंग राहिली तर भारतीय व्यक्तीला *इंग्लंडमध्यें पेन घेणें परवडेल व पेनसाठीं मागणी वाढावयाला लागून* इंग्लंडमध्यें पेनच्या किंमती वर जावूं लागतील. मालाची मागणी वाढण्याचा परिणाम म्हणजे रुपयाचें पौंडांत रूपांतर करून घेण्याबद्दलच्या मागणींत होणारी वाढ होय. कारण परकीय वस्तू विकत घ्यावयाच्या म्हणजेच पर्यायानें परकीय चलन विकत घ्यावें लागतें. या पौंडाबद्दलच्या वाढत्या मागणीमुळेंही पौंडाच्या अदलाबदलीचा दर, दहा रुपयाला वीस शिलिंग न राहतां तो महाग होवून एकोणीस, *अठरा असा वाटचाल करूं लागेल* व लौकरच दहा रुपयाला पंधरा शिलिंग अशा दरापर्यंत तो परत येईल किंवा फाउंटन–पेनची किंमत सोळा शिलिंगावर येऊन दहा रुपयाला सोळा शिलिंगापर्यंत बदली भाव पडेल, तेव्हां भारतीयांना इंग्लंडमध्यें पेनें खरेदी करण्यांत स्वारस्य राहणार नाहीं. अशा रीतीनें जसे दोन चलनांतील अदलाबदलीच्या दराचे परिमाण त्या त्या देशांतील वस्तूच्या किंमतीच्या प्रमाणावर अवलंबून राहील तसेच व्यवहारांत वस्तूंच्या किंमतीही अशा चलनपरिमाणावर अवलंबून राहतील. यांत अर्थात् दुसरेही पर्याय होऊं

शकतात. ते म्हणजे इंग्लंडमध्यें मागणींतील वाढीमुळें जशा पेनच्या किंमती वाढूं शकतील तशा भारतांत मागणी कमी झाल्यामुळे पुरवठा उठवण्यासाठीं भारतीय कारखानदाराला कदाचित् किंमती कमीही कराव्या लागतील, व कदाचित् रुपया-शिलिंगाच्या परिमाणांतच बदल होण्याऐवजीं कांहीं बदल वस्तूंच्या अशा नव्या किमतीमुळें होऊन परत दोन्हीं देशांतील वस्तूंच्या किंमती व चलनाच्या अदलाबदलीचें प्रमाण यात पूर्वीचाच समतोल ( Equilibrium ) निर्माण होईल. अशा समतोलनाची परिस्थिति मात्र तत्त्वशःच असते व व्यवहारांत त्यांत लवकाच्या झोक्याप्रमाणेंच बदल होतात व आयातनिर्यात वगैरे व्यवहार शक्य ठरतात.

पहिल्या महायुद्धानंतर मांडल्या गेलेल्या चलनप्रमाणाबद्दलच्या या सिद्धान्ताला त्यावेळीं खूपच प्राधान्य मिळालें होतें पण या सिद्धान्तांत अनेक बाबींचा समावेश झाला नव्हता. दरवेळीं राष्ट्रांतील वस्तूंच्या किंमतीवरच असे चलनविनिमयाचे प्रमाण अवलंबून राहणार नाहीं कारण त्या त्या देशांतील लोकांच्या आवडीनिवडी, सवयी वगैरेंचा वस्तूंच्या किंमती ठरण्यावर जो परिणाम होत असतो तो इथें विचारांतच घेतला गेलेला नाहीं. दुसरें म्हणजे एखादा देश एखादी वस्तू निर्माण करूंच शकत नसला तर त्याला वाटेल ती किंमत देऊन ती वस्तू दुसऱ्या राष्ट्रांकडून विकत घ्यावयास लागेलच लागेल. एखाद्या देशाकडे निसर्गनिर्मित अशीच मक्तेदारी असते. उदा. कुवेत ( तेल ), आफ्रिका ( सोने, हिरे ) वगैरे. अशा परिस्थितींतही हा सिद्धान्त निरुपयोगी ठरतो. या सिद्धान्ताचा अर्थशास्त्रांतील किंमतीबद्दलच्या सापेक्षसिद्धान्ताशीही थोडासा संबंध आहे. एखाद्या देशांत कुठल्या प्रकारचें उत्पादन करणें हितावह ठरेल याबद्दल पूर्वींच्या अर्थशास्त्रज्ञांनीं जे वेगवेगळे सिद्धान्त मांडले त्यांत सापेक्ष किंमतीचा सिद्धान्त महत्त्वाचा होता. किंबहुना एखादी वस्तू स्वदेशांत निर्माण करण्याऐवजीं ती आयात करतांना उत्पादन-खर्चापेक्षां कमी किंमत द्यावी लागल्यानें, आयात केली गेली तर असा संभाव्य उत्पादन खर्च व प्रत्यक्ष पडलेली किंमत यांतील फरक हा आंतरराष्ट्रीय व्यापारामुळें झालेला त्या राष्ट्राचा नफा असें धरतां येईल. याहीपुढें

जाऊन हा नफा त्यापेक्षांही जास्त आहे हें दाखवितांना कांहीं अर्थशास्त्रज्ञांनीं ती वस्तू निर्माण करण्यासाठीं लागलेलें भांडवल व श्रम यांनीं जी जास्त किंमतीची वस्तू उत्पन्न केली जाईल व निर्यात केली जाईल तिच्या निर्यात किंमतींतून आयात केलेल्या वस्तूची किंमत वजा केली असतां राहणारा फरक हाच खरा आंतरराष्ट्रीय व्यापारामुळें होणारा नफा म्हणून मोजला पाहिजे असें मांडलें आहे. या सिद्धान्तांत तथ्य असल्यानेंच वेगवेगळ्या राष्ट्रांनीं वेगवेगळ्या उत्पादनावर भर दिला व आंतरराष्ट्रीय व्यापाराला अशा विशिष्टतज्ञतेमुळेंच (specialization) जास्त चालना मिळाली. मात्र पहिल्या व दुसऱ्या महायुद्धकालांत अशा किंवा अन्य अडचणींच्या प्रसंगीं मात्र परावलंबी व पर्यायानें हताश जीवन जगण्याची पाळी येऊं नये या निर्माण झालेल्या विचारसरणींतून स्वयंपूर्णतेची कल्पना कांहीं वेळां जोरानें पुढें आली व हल्लीं या दोन्हींचा समन्वय साधण्याचे प्रत्येक राष्ट्राचे आपापल्या परीनें प्रयत्न चालू आहेत.

## टांकसाळ परिमाणाचा सिद्धान्त :

दोन देशांतील चलनांची परिवर्तनीय किंमत काय असेल हा वर सांगितलेला सिद्धान्त एका दृष्टिकोनांतून बघितला गेला आहे. दोन देशांतील चलनांचे एकमेकांतील अदलाबदलीचें प्रमाण काय असेल याचा विचार करतांना आणखी एक दृष्टिकोनही मांडला जातो. कुठल्याही देशांत चलन कशाही तऱ्हेचें असलें तरी सोन्याला अजूनही जास्तींत जास्त महत्त्व दिलें जातें. सोनें ही जगाच्या कुठल्याही व्यापारांत सर्वमान्य होणारी अशीच वस्तू आहे. पूर्वी प्रत्येक राष्ट्रांत चलन काढण्यासाठीं तितक्या किंमतीचें सोनें किंवा जास्तींत जास्त सोनें तिजोरींत ठेवावें लागे. हल्लीं चलनपुरवठा करतांना प्रत्येक सरकार पूर्वीइतकें सोनें आपल्या तिजोरींत ठेवत नसले तरी अगदीं प्रथम ज्याप्रमाणें नाणीं, नोटा काढतांना प्रत्येक नाण्याच्या, नोटेच्या बदली किती सुवर्ण मिळेल किंवा सुवर्ण दिल्यावर किती नाणीं पाहून मिळतील याचें प्रत्येक सरकारनें एक कोष्टक जाहीर केलेलें असे, त्याचप्रमाणें आजही प्रत्यक्षांत जरी सुवर्णनाणीं दिसत नसलीं तरी तत्त्वतः

प्रत्येक चलनाची सोन्यांतील परिवर्तनीय किंमत किती असेल हें जाहीर ठरवून देऊनच सर्व व्यवहार केले जातात. हिंदुस्थानांतील रुपयाची अशी किंमत सांगतांना त्यांत २·८८० ग्रेन इतकें सोन्याचें प्रमाण आहे असें सांगितलें जातें (१९४९ मधील अवमूल्यनापूर्वी हें प्रमाण ४·१४५ ग्रेन इतकें होतें) तर युनायटेड स्टेट्समधील डॉलरमध्यें १५·२३८१ इतकें ग्रेन सोनें आहे असें सांगितलें जातें. ह्या सोन्याचा कस वेगवेगळा असूं शकतो. आपल्या रुपयांतील सोनें ११/१२ इतकें शुद्ध आहे तर डॉलरमधील सोनें तत्त्वतः नऊदशांश (९/१०) इतकें शुद्ध गणलें जातें. म्हणजे या परिमाणावरून रुपया डॉलरचा सापेक्ष भाव आपल्याला सहज काढतां येईल. कारण सरतेशेवटीं सोनें हेंच आंतरराष्ट्रीय सर्व मान्य चलन गणलें गेलें आहे. व एक रुपया दिल्यानंतर जितकें सोनें तत्त्वतः मिळेल तितकेंच सोनें मिळूं शकण्याइतकें सेंट्सच आपण अमेरिकन लोकां कडून मागूं. १ रुपयाची डॉलरमधील किंमत २१ सेंट्स किंवा पौंडांतील किंमत १॥ शिलिंग इतकी ठरते. चलनांतील असा सोन्याचा भाग किती असावा हें त्या त्या देशांतील कायद्यानें ठरविलें जातें व सन १९४७ मध्यें आंतरराष्ट्रीय चलननिधी निर्माण झाल्यापासून निधेंही हें परिमाण नोंदलें जात असून या वेगवेगळ्या परिमाणांवरूनच दोन देशांतील बदली परिमाण ठरविलें जातें.

ज्या वेळेला दोन्ही देश एकाच धातूंची—त्यांतही विशेषतः सोन्याची—नाणीं वापरीत असतील त्या वेळेला समान वजनाचें किंवा कसाचें परिमाण मिळण्यासाठी एका चलनाचे बदली दुसऱ्या चलनाचें जितकें परिमाण द्यावें लागेल त्या वेळेला हे तत्त्व लागूं पडतें. आतां अशी नाणीं प्रत्यक्षांत दिसत नसलीं तरी तो सिद्धान्त राहिला आहेच व त्याला टांकसाळ परिमाणाचा सिद्धान्त (Mint Par of Exchange) या नांवानें संबोधिलें जातें. त्यासाठीं साखळीचा नियम (Chain Rule) वापरून गणितपद्धतीनें असें अदलाबदलीचें प्रमाण काढतां येतें.

## ऊर्ध्वमूल्यन, अवमूल्यन, पुनर्मूल्यन :

वरील सिद्धान्तांत अर्थातच नाण्यांतील होणारी झीज, टांकसाळींत ती पाडण्यासाठीं येणारा खर्च, किंवा दोन्ही देशांतील सुवर्ण निर्यात व आयात यांवर असलेलीं बंधनें यांचा विचार केलेला नाहीं. तसेंच प्रत्यक्षांत हल्लीं अनेक देशांतून, त्याच्या चलनाचे दुसऱ्या चलनाशीं अदलाबदलीचें प्रमाण कायद्यानें अधिकृत रीत्या सरकारकडून ठरविलें जातें व त्यामुळें वस्तूंच्या किंमतीच्या प्रमाणांत तें प्रमाण असावें, किंवा सोन्याच्या प्रमाणांत किंवा कसावर तें असावें या दोन्ही सिद्धान्तांचा तिथें अमल दिसत नाहीं. या सरकारी अधिकृत प्रमाणाबरहुकूमच सगळ्यांना व्यापार व आयातनिर्यात व अन्य व्यवहार करावे लागतात. त्यामुळें प्रत्यक्षांत एकादे चलनाचें अवमूल्यन (Undervaluation) झालेलें किंवा ऊर्ध्वमूल्यन (Overvaluation) झालेलेंही आढळतें, व कधीं कधीं त्यामुळें सरकारी व खासगी अनधिकृत असे दोन प्रकारचे दरही अशा चलनाचे बाबतींत आढळून येतात. खासगी दर हा त्या चलनांत व्यवहार करणारे त्या चलनाला खरी किंमत किती देऊं इच्छितात त्यावरच ठरतो. मात्र अशा दोन्ही दरांत फारच तफावत पडूं लागली तर सरकारला त्याबाबत विचार करावा लागून अधिकृत दरांत योग्य तो फेरबदल करणें भाग पडतें. कित्येकदां त्याकडे सरकारनें दुर्लक्ष केलें व तें राष्ट्र जर आतरराष्ट्रीयनिधीचें सदस्य असलें तर ही निधिसंस्थाही त्यांना तसा परखड सल्ला देते.

वस्तुतः योग्य दिसणाऱ्या प्रमाणाऐवजीं एकाद्या राष्ट्राचें चलन जास्त 'ऊर्ध्वमूल्य' असें असलें तर त्या देशाला बाहेरून आणावयाच्या वस्तूंत म्हणजे आयातींत फायदा होतो; कारण आयातीसाठीं द्यावें लागणारें चलन त्याला कमी प्रमाणांत द्यावें लागतें. पण उलट विचार केला तर त्याचमुळें अन्य देश त्या देशांतून आयात करावयाला तयार होत नसल्यानें, त्याचा निर्यातीवर परिणाम होतो. निर्यातीपेक्षां अशा देशाची आयातच जास्त असेल तर त्याला अशा रीतीनें कृत्रिम रीत्या आपले चलनाचा दर चढा ठेवणें परवडेल व फायदा करून घेतां येईल, नाहींतर निर्यातदारांना

कांही तरी मदत (Subsidies) देऊं करावी लागेल. चलनाचा दर जर कमी असेल तर याच्या उलट परिणाम दिसेल. या कृत्रिम प्रमाणाचे परिणाम, अर्थातच वस्तूंच्या आयात निर्यातीच्या द्वारा पुरवठ्यावर व मागणीवर होऊन वस्तूंच्या देशांतील अंतर्गत किंमती व मजूरीचे दर यांतही दृश्य स्वरूपांत दिसतील. आणि त्यामुळेंच चांगल्या सरकारला अंतर्गत व बाह्य या दोन्ही किंमती स्थिर ठेवण्याचें धोरण साध्य करावयाचे असल्याने सरकारचा कांहीं विशिष्ट हेतू असल्याशिवाय अशा कृत्रिम किंमती ठेवल्या जात नाहीत.

कित्येकदां या गोष्टी अर्थात सरकारच्याही शक्तीबाहेर जातात. ज्या वेळेला वस्तूंचे उत्पादनच थोडें असतें व त्यांचा तुटवडा पडतो किंवा लोकांच्या हातातील चलनाचा पुरवठा त्या दृष्टीनें जास्त असतो तेव्हा किंमती वाढूं लागतात. म्हणजेच पर्यायानें चलनाची किंमत घसरूं लागते. पैसे देऊन त्याबदली काय मिळूं शकतें यावर, म्हणजे पैशाच्या क्रयशक्तीवर त्याची किंमत अवलंबून असते. अशा क्रयशक्तीवरचा किंवा त्याला आधार देणाऱ्या सरकारवरचा लोकाचा विश्वास जेव्हां कमी होऊं लागतो त्यावेळेलाही चलनाची किंमत कमी होऊं लागते. पहिल्या महायुद्धानंतर जर्मनींतील मार्कची झालेली घसरगुंडी हें घसरत्या किंमतीचें एकमेवाद्वितीय उदाहरण ठरेल. कुठल्याही चलनाचा बदली परिमाणाचा दर योग्य नसेल व तें चलन 'ऊर्ध्वमूल्य' किंवा 'अवमूल्य' परिस्थितींत असेल व त्याचा गंभीर परिणाम होत असेल त्या वेळीं चलनाचें पुनर्मूल्यन हा एकच मार्ग श्रेयस्कर ठरत असतो व अंमलात आणला जातो. १९३१ सालीं व त्यानंतर, किंवा १९४९ सालीं झालेलें ठिकठिकाणचें अवमूल्यन किंवा नुकतेच १९६१ सालीं झालेलें जर्मनी व नेदर्लंड्स याचें चलनाचें झालेलें ऊर्ध्वमूल्यन पुनर्मूल्यनाची उदाहरणें म्हणून दाखवता येईल.

---

## दृश्य व अदृश्य व्यापार
(Visible & Invisible Trade).

२

मनुष्याच्या गरजाप्रमाणे आवश्यक वस्तूंची अदलाबदल, आयातनिर्यात होते हें आपण बघितलेच आहे. पण मनुष्याला आवश्यक असणाऱ्या वस्तूंची जशी आयात–निर्यात होते, त्याचप्रमाणें कांहीं प्रकारच्या कामाची सेवाची (services) ही आयात–निर्यात होऊं शकते. भारताला जर अमेरिकेहून धान्याची आयात करावयाची असली व तें धान्य आणण्यासाठीं जर भारताजवळ स्वत:च्या बोटी नसल्या तर अमेरिकेच्या किंवा दुसऱ्या देशाच्या जहाजांतून ती वाहतूक करवावी लागते म्हणजे पर्यायानें धान्याप्रमाणेंच या सेवेचीही (services) आयात करून त्याची किंमत द्यावी लागते. अशा प्रकारच्या व्यापाराला अदृश्य व्यापार (Invisible Trade) म्हणतात. कांहीं राष्ट्रें अशा अदृश्य व्यापारानींही आपले चलनाचें स्थैर्यांत भर घालूं शकतात. एखाद्या राष्ट्राचें निसर्गसौंदर्य जर चांगलें असलें तर तिथें अन्य देशातील प्रवासी आल्यानेंही अदृश्य प्रकारचा व्यापार होऊ शकतो. या अदृश्य प्रकारच्या व्यापारातही निर्यातीपेक्षा आयात जास्त झाली म्हणजेच दुसऱ्या राष्ट्रांना दिलेल्या सेवेपेक्षा त्याचेकडून अशा सेवांची जर जास्त मागणी केली गेली तर त्यातील फरकाबद्दलही त्या त्या राष्ट्राला योग्य त्या प्रकारानें किंमत द्यावी लागेल. असा फरक जर नेहमी व्यस्तच रहात गेला तर त्या राष्ट्राचें पर्यायानें दिवाळेंच निघेल; त्याच्या चलनास फारशी मागणी रहाणार नाहीं. पण असा फरक जर त्या राष्ट्राच्या बाजूचा असेल तर दृश्यव्यापारातील व्यस्त फरक त्यास परवडूं शकतो.

**व्यापार तुला व प्रदान तुला** ( Balance of Trade & Balance of Payments ):

विदेशविनिमयाच्या व्यवहाराचा विचार करतांना आपणाला या सर्व बाबींचा विचार करावा लागतो. राष्ट्राच्या विदेशविनिमयाची बाजू मांडतांना, एक प्रदान तुला ( Balance of Payment ) मांडली जाते, त्यांत खालील गोष्टींचा समावेश होतो ( १ ) दिसणारा दृश्य व्यापार ( Visible Trade ) व ( २ ) अदृश्य व्यापार ( Invisible Trade ). ( ३ ) भांडवली व्यवहार. दिसणाऱ्या व्यापारांत वस्तूंची खरेदी-विक्री होते तर अदृश्य व्यापारांत सेवेची, हक्कांची या कामाची ( services ) खरेदी विक्री होत असते. फक्त व्यापारांतल्या वस्तूंचा हिशेब मांडतात त्याला व्यापार तुला ( Balance of Trade ) म्हणतात. देशांत येणाऱ्या आयातीचा जो पैसा विदेशी चलनांत द्यावा लागतो तो व देशांतून बाहेर जाणाऱ्या निर्यात वस्तूंचा जो पैसा आंत येतो त्याचा मांडलेला व्यवहार म्हणजेच व्यापार तुला होय. वस्तूंची निर्यात म्हणजे विदेशी चलनाची आयात व वस्तूंची आयात म्हणजे विदेशी चलनांची निर्यात. मात्र चलनाची अशी आयात-निर्यात प्रत्येक व्यवहारांत व प्रत्यक्षच होऊं शकेल असे नाहीं. कित्येकदां त्याची वजावट होऊन फक्त फरकाचाच हिशेब केला जातो.

दृश्य व्यापाराखेरीज अन्य अनेक बाबींत विदेशी चलनाचा व्यवहार होतो, त्यांत विमा, बोटींचें भाडें, वेगवेगळ्या प्रकारचे कमिशन किंवा बँकांचे आकार, विदेशीयांचे पगार, प्रवाशांचे खर्च, सरकारी कर्जरोख्यांवरील व्याज अशा प्रकारच्या बाबी व भांडवली गुंतवणूक, कर्जे, कर्जफेड वगैरे बाबी यांचा समावेश होतो. या सर्व दृश्य व अदृश्य बाबींचा विदेशविनिमयावर व दोन चलनांतील प्रमाणावर परिणाम होतो. कारण या सर्व व्यवहाराचा त्या त्या चलनाच्या मागणीवर परिणाम होतोच. अशी मागणी जर वाढली तर त्या वस्तूंची किंमतही वाढते, हा सर्वसामान्य अर्थशास्त्रीय सिद्धान्त आहे. म्हणूनच हल्लीं अनेक देशांतून वेगवेगळ्या प्रकारचे निर्बंधद्वारा,

विशेषतः भांडवली गुंतवणुकीवर नियंत्रण आणून सरकार चलनाची किंमत अस्थिर होऊं देत नाहीं. विदेशविनिमयांतील व्यापाराची माहिती पूर्वी आलेली आहे. भांडवली व्यवहारांची माहितीही सर्वसामान्य व्यक्तींना फारशी लागत नसते पण अदृश्य व्यापारांतील कांहीं बाबींची माहिती असणे जरूर आहे.

## अदृश्य व्यापार :

**विमा** (Insurance):

व्यापारी जेव्हां आपल्या मालाची परदेशांतून आयात करतो त्यावेळीं त्या मालाचा विमा उतरला जातो. असा माल जर भारतीय व्यापाऱ्याला ब्रिटनमधून इंग्लीश कारखानदारानें पाठवला तर तो कारखानदार त्या मालाचा विमा ब्रिटिश विमा कंपनींत उतरवील व त्या विमा कंपनीला जे पौंडाच्या चलनांत पैसे दिले जातील ते त्या मालाच्या किंमतींत तो अंतर्भूत करील किंवा खरेदीपावतींत वेगळे दाखवील. हे पैसे पौंडांत दिले गेल्यानें भारताच्या तिजोरींतून तितकें विदेशी चलन कमी होतें. म्हणूनच भारतीय व्यापाऱ्यांनीं आपला माल आनौक (F. O. B.) पद्धतीवर मागितला व विमा जर भारतीय विमा कंपनींत उतरविला तर आपल्या परदेशी चलनाची बचत होऊं शकते व भारतीय विमा कंपन्यांना धंदाही मिळतो.

**जहाजभाडें** (Freight):

जी गोष्ट विम्याची तीच गोष्ट जहाजाच्या भाड्याची असते. वेगवेगळा माल ज्या वेगवेगळ्या बोटी वाहून नेतात त्यांना त्याबद्दल जो आकार द्यावा लागतो तोही, अशा बोटी विदेशी असल्या तर आपल्या राष्ट्राखेरीज दुसऱ्या चलनांत द्यावा लागतो. अशी मालवहातूक हा एक मोठा व्यापार आहे. विमा व वहातूक या दोन्हां प्रकारात वस्तूऐवजीं सेवेची विक्री (Sale of Service) होत असते.

## कमिशन व हुंडणावळ वगैरे आकार :

वेगवेगळ्या धंद्यांत गिऱ्हाईक मिळण्यासाठीं व्यापाऱ्याला कांहीं प्रतिनिधी नेमावे लागतात व मालाची जाहिरात करावी लागते. अशा प्रतिनिधींची जर परदेशांत नेमणूक केलेली असेल तर त्यांना मालाचे प्रचारासाठीं द्यावें लागणारें कमिशन, तसेंच त्या मालाचा उठाव होण्यासाठीं विदेशी नियतकालिकांतून केलेली जाहिरात वगैरेंचा पैसा विदेशी चलनांतच जाईल. त्याचप्रमाणें आपल्या देशांत असलेल्या विदेशी नोकर लोकांचे पगारांतील त्यांना घरखर्चासाठीं आपल्या कुटुंबियांना पाठवावी लागणारी रकम व कांहीं राहिलेली शिल्लकही त्यांच्या देशांत पाठविली जातांना ती विदेशी चलनांतच जाईल. तसेच कांहीं विदेशी कंपन्यांनीं दुसऱ्या देशांत ज्या शाखा काढलेल्या असतात, त्यांचे द्वारा विदेशी कंपन्यांचा होणारा फायदाही अन्य चलनांतच पाठविला जातो. पुस्तके, सिनेमा यांच्या प्रकाशनाबाबत द्याव्या लागणाऱ्या वेगवेगळ्या रॉयल्टीज् ही पाठवाव्या लागणाऱ्या विदेशी चलनांत समाविष्ट करतां येतील.

## प्रवासी उत्पन्न :

वरील अन्य गोष्टींत जसें परकीय चलन वापरलें जातें तसेंच हिंदुस्थानांतील नागरिक जर बाहेर प्रवासाला गेले तर त्यांच्याकडून बाहेर जे पैसे खर्च होतात त्याद्वारें आपली विदेशी चलनांतील शिल्लक खर्च होते. त्याउलट हिंदुस्थानांत अन्य देशांतून जे प्रवासी सफरीसाठीं येतात त्यांच्याकडून इथे जे पैसे खर्च होतील त्यायोगें आपल्याला परकीय चलन उपलब्ध होऊं शकते. अशा प्रवासी लोकाकडून विदेशी चलन मोठ्या प्रमाणांवर मिळूं शकत असल्यानें परकीय चलनात वाढ करण्यासाठीं म्हणून, प्रवासी लोक आकृष्ट होतील अशा योजना विविध देशांतून आखल्या जातात. स्विझर्लंडसारख्या देशांत तर या बाबीचें खूपच मोठें उत्पन्न येऊं शकतें. काश्मीर, गोवा, दक्षिण भारत यांचा उपयोग त्या दृष्टीनें भारताला बराच करतां येणें शक्य आहे.

## भांडवली गुंतवणूक:

विदेशी फर्म्सना कित्येकदा दुसऱ्या देशात पैसे गुतवणें फायद्याचें पडतें, त्यावेळीं त्या आपलें भांडवल असें गुतवतात तर काहीं वेळा विनिमय-नियंत्रणामुळें त्याना दुसऱ्या देशातील कंपन्यामधून भाग भांडवलाचे रूपानें पैसे घालावे लागतात. अशा भांडवलावरील व्याज मात्र विदेशी चलनांतूनच जाते. जिथें नियंत्रणें नसतील तिथें वेळ पडली तर किंवा त्या त्या सरकारनें परवानगी दिल्यानंतर असे परदेशात गुतवलेलें पहिलें भांडवलही काहीं दिव-सानीं परत जातें, अशा भांडवलीव्यवहारातील गुंतवणुकीचा, त्यावरील व्याजाचा वगैरे समावेश प्रदानतुलेंत करावा लागतो

## कर्ज:

वरील भांडवलाच्या बाबीप्रमाणेंच खासगी व सरकारी कर्जाची बाबही प्रदान तुलेंत समाविष्ट होते. मोठ्या प्रमाणावर अशाप्रकारें चालणाऱ्या कर्जांची आवक व फेड यामुळेंही अदृश्य व्यापारात चलनाची आवक जावक कमीजास्त होऊं शकते.

उपरनिर्दिष्ट अशा सर्व बाबींचा दोन देशातील चलनाचें एकमेकाशीं असणारें प्रमाण ठरवण्यावर प्रभाव पडतो आणि परकीय चलनाचा व्यापार करणारे या सर्वांचा विचार करून व पुढें होणाऱ्या संभाव्य मागणीपुरवठ्याचा अदाज घेऊनच खरेदी–विक्रीचा व्यवहार करतात. या व्यवहारात किल्येकदा सट्टयाचाही अंतर्भाव होतो हल्ली बहुतेक देशातून विदेशविनिमयाच्या व्यव-हारावर सरकारी नियंत्रण असतें त्यामुळें अशा सट्टेबाजीला फारसा वाव राहिला नाहीं. पण ज्या ठिकाणीं असें नियंत्रण नाहीं तिथें अजूनही असे व्यवहार चालतात व नियंत्रणापूर्वी इतरत्रही असें चालत होतेंच. शेअर्समध्ये ज्याप्रमाणें साध्या बातम्यावरूनही भावात चढ उतार होतो त्याचप्रमाणे विदेशी चलनातील प्रमाणातही अनेक कारणामुळें फरक पडू शकतो विदेश-विनिमयाच्या व्यवहारात चलन दोन पद्धतीनें वापरलें जातें. एक नित्यनैमि-त्तिक कारणासाठीं व दुसरें म्हणजे दीर्घ मुदतीच्या भांडवली गुतवणुकीसाठीं.

दुसऱ्या प्रकारांत पैसे गुंतवणारा गुंतवणुकीच्या देशांतील भावी दीर्घकालीन परिस्थिति व परिणाम यांची आधी जाणीव घेत असतो. याखेरीज दोन ठिकाणच्या तत्कालीन व्याजांतील फरकामुळेंही अल्पल्प मुदतीसाठीं होणारी भांडवलाची गुंतवणूकही विदेशविनिमयाच्या दरावर परिणाम करते.

## विनिमय दरांत फरक केव्हां होतो ?

नित्यनैमित्तिक कारणांतील व्यापारी व्यवहारांत जेव्हां खरेदीचा हंगाम सुरू होतो त्यावेळीं विदेशी मालाची खरेदी म्हणजे विदेशी चलनाचीही खरेदी होते. म्हणजे त्यावेळीं त्या चलनाची मागणी एकदम वाढते व वाढत्या मागणीला पुरवठा जर अपुरा पडला तर चलनाचीही किंमत वाढते. वाढत्या दरामुळें जास्त विक्रेते पुढें होतात आणि मागणीइतकाच पुरवठा होईपर्यंत किंमत थोडी थोडी कमी होऊन स्थिरावते. हें चक्र सारखें चालूच असते. निर्यातीच्या वेळीं याउलट परिस्थिति होते. भारताचा चहा, ज्यूट वगैरे ज्या महिन्यांत निर्यात होतो व त्यापोटीं व्यापारी बिलें निघतात त्यावेळीं लंडन व अन्यत्र आपल्या खातीं विदेशी चलनाची शिल्लक वाढते. साहजिकच पुरवठा जास्त झाल्यानें खरेदीदार कमी किंमतींत आपले सौदे मागूं लागतो व वरीलप्रमाणेंच भावाचा चढउतार होऊन किंमत ठरते. अर्थात हा चढउतार अगदीं नगण्य प्रमाणांत असतो ही गोष्ट वेगळी.

दीर्घ गुंतवणूक करणारांना त्या चलनांतील दरांत राजकीय, सामाजिक आर्थिक कारणामुळें कांहीं बरा वाईट परिणाम गुंतवणूक असे-पर्यंत होणार नाहीं ना याचा विचार करावा लागतो. एकादा देश हुकुमशाहीकडे वाटचाल करीत आहे असें दिसूं लागलें, युद्धाचे ढग जमूं लागले आहेत असें वाटलें किंवा अंतर्गत बंडाळीची शक्यता आढळली तर भांडवल गुंतवायला कुणीही कचरतो. या उलट देशांत सुबत्ता दिसली, सुस्थिर सरकार असलें, योग्य व्याजाची खात्री असली, व राष्ट्रीयीकरणाची वा नुकसानभरपाई न मिळण्याची काळजी नसली तर विदेशी भांडवल

गुतवणूकीसाठीं पुढें येते. तसेंच वेळोवेळीं त्या त्या देशाची व्यापार तुला व प्रदानतुला कुठें झुकते आहे याचाही गुतवणारे विचार करतातच.

वरील दोन्हीप्रमाणेंच व्याजातील फरकामुळेंही अल्पमुदतीसाठीं भाडवल पुढें येतें. भारतातील बँकरेट चार टक्के असला व लंडनमधील दर सात टक्के झाला तर इथल्या ट्रेझरी बिलाऐवजीं ब्रिटनमधील ट्रेझरी बिलात रक्कम गुतवणें श्रेयस्कर ठरेल. (इथें दोन्ही देशात विनिमयनियंत्रण नाही असें सद्य.परिस्थितींत गृहीत धरावें लागेल.) अर्थात दोन देशातील व्याजाचे दरातील फरक लक्षात घेत असताना पैसे पाठविण्यासाठीं लागणारा खर्च व पैसे परत आणताना विदेशविनिमयाचा असणारे दराचा विचार करूनच गुतवणारा आपला निर्णय घेत असतो. विदेशविनिमयातील व्यवहार करणारा नेहमीं आपली परिस्थिति समतोल ठेवीत असतो. म्हणजे आज जो पौंड विकत घेतो तो तीन महिन्यानीं ट्रेझरी बिलाचे पौंड खातीं जमा होणार असल्यानें, जवळपास तितकेच पौंड वायद्यात विकून टाकीत असतो. व्याजाच्या दरातील फरकामुळें, प्रत्येक गुतवणारा हाच विचार करीत असल्यानें चालू भावात तेजी होऊ लागते व हेच लोक सर्व पौंड तीन महिन्यानीं विकणार असल्यानें त्यावेळीं पुरवठा जास्त होतो म्हणून वायद्याच्या भावात मंदी दिसते या दोन्हींतील फरकाची वजावट ही व्याजाच्या फरकातून गुतवणाऱ्याला करावी लगते. तसेंच दोन्ही वेळेला रक्कम जाईपर्यंत व येईपर्यंत जाणाऱ्या कालातील व्याजाचें नुकसान किंवा असा सौदा तारेनें केला तर तारखर्च याचाही त्याला विचार करावा लागतो. त्याचप्रमाणें हा व्यवहार कुठल्या तरी बँकेमार्फत करावा लागतो त्या बँकेचा व तिच्या प्रतिनिधीच्या आकाराचाही खर्च त्यात वाढतो.

मात्र या सर्व बाबींचा विचार, केवळ अल्पमुदतीच्या गुतवणूक करणारानाच करावा लागतो असं नाहीं, तर विदेशी चलनाच्या प्रत्येक ग्राहकाला तो करावा लागतो. परदेशातील मनुष्य आपले पैसे त्याला मान्य असलेल्या चलनात मागेल पण ते जर तेजींतच असेल तर, ऋणको त्या चलनाऐवजीं, ती रक्कम खूप मोठी असेल व कुठलेंही नियंत्रण नसेल तर

सोनें पाठवूनही त्याची रक्कम अदा करूं शकेल. कारण सोनें हें आंतरराष्ट्रीय चलन आहे. असें सोनें पाठवतांना आपण मोठमोठ्या उलाढालींचाच विचार करीत आहोंत. असें सोनें पाठवितांना मध्यवर्ति बँकेकडून खरेदीसाठीं द्यावी लागणारी किंमत, सोने दलालाचें कमिशन, पॅकिंगचा खर्च, जितके दिवस रक्कम सोनेखरेदीमुळे गुंतली गेली त्या त्या दिवसांचें व्याज व जहाजाचें भाडें व विमा येवढ्या बाबींची बेरीज करून तो हा दर बाजारातल्या विदेशी चलनाच्या दरापेक्षां परवडणारा आहे कीं नाहीं हें बघेल; त्यामुळेंच या सुवर्णनिर्यातीच्या दरापेक्षां विदेशविनिमय करणारे प्रतिनिधी आपला दर जास्त ठेवूं शकणार नाहींत, कारण मग त्यांचा धंदा होऊ शकणार नाहीं. जी गोष्ट सोनें पाठविण्याची तीच मागवण्याची. या दोन्ही दरांमुळें विदेशी चलनाचे दराची पातळी दोन्ही दिशांना ठरते व म्हणून या बिंदूना सुवर्णबिंदू ( Gold points ) अशीही संज्ञा दिली जाते. मात्र हा सिद्धान्त आता फक्त तात्त्विक म्हणूनच उरला आहे. मध्यवर्ति बँका आतां अशा तऱ्हेनें सोन्याची खरेदी–विक्री करीत नाहींत. तसेंच मध्यवर्ति बँकाचा सोन्याचा दर व बाजारांत मिळणाऱ्या सोन्याचा दर यांत तफावत असते व तिसरे म्हणजे दुसऱ्या महायुद्धात व नतर बहुतेक राष्ट्रांतून विदेशविनिमयाच्या व्यवहारावर व सोन्याच्या आयात निर्यातीवर नियंत्रणें आलीं आहेत.

वाचकांच्या माहितीसाठीं या सर्व व्यवहारांची एकत्र कल्पना येण्याकरितां भारताच्या व्यापारतुलेचा व प्रदानतुलेचा तक्ता खालीं दिला आहे.

## भारताची व्यापारतुला

( कोटी रुपयांत ) ( संक्रमण व्यापार, पुनर्निर्यात सोडून )

| | आयात | निर्यात | एकूण विदेशव्यापार | तूट |
|---|---|---|---|---|
| सन १९५०-१९५१ | ६२३ | ६०१ | १२२४ | २२ |
| सन १९५७-५८ | ९९३ | ६२१ | १६१४ | ३७२ |
| सन १९५८-५९ | ८०४ | ५७० | १३७४ | २३४ |
| सन १९५९-६० | ८५१ | ६४६ | १४९७ | २०५ |

**भारताची चालू व्यवहाराची प्रदान तुला** ( कोटी रुपयांत )

| | १९५७-५८ | १९५८-५९ | १९५९-६० |
|---|---|---|---|
| आयात } खाजगी व } | १२३३ | १०२९ | ९२३ |
| निर्यात } सरकारी } | ५९४ | ५७५ | ६२३ |
| तूट | –६३९ | –४५४ | –३०० |
| अधिकृत देणग्या | +३४ | +३४ | +३५ |
| अदृश्य व्यापार | +१०४ | +९२ | +७८ |
| एकूण तूट | ५०१ | ३२८ | १८७ |

ही तूट अधिकृत कर्जे, आंतरराष्ट्रीय चलन निधींतून काढलेल्या रकमा, अन्य भांडवली व्यवहार आणि विदेशविनिमयाच्या गंगाजळींत घसरगुंडी या उपायानें भरून काढावी लागली. ती कशी भरून निघते व अदृश्य व्यापारांचीही फोड कशी होते याची कल्पना येण्याकरतां खालीं भारताच्या १९५७-५८ च्या प्रदान तुलेचे आंकडे दिले आहेत. तसेंच आपला दृश्य व्यापार कशा पद्धतीचा आहे याची कल्पना यावी म्हणून सन १९५९ च्या व्यापाराचा जास्त खुलासा देणारीं कोष्टकेंही त्याच प्रदानतुलेनंतर दिली आहेत.

**भारताची १९५७-५८ ची प्रदानतुला** ( कोटी रुपयांत )

| | जमा | नांवे | शिल्लक |
|---|---|---|---|
| **(अ) व्यापार तुला :** | | | |
| दृश्य व्यापार वस्तूंची आयात | | | |
| (खासगी) वा. मा. वि. किंमत | —— | ६८२ | |
| ,, (सरकारी) ,, | | ४९२·८ | |
| दृश्यव्यापार वस्तूंची निर्यात | | | |
| (खासगी) आनौक किंमत | ५७७·५ | | |
| ,, (सरकारी) ,, | ८१·४ | | – ५०५·९ |
| **(ब) अदृश्य व्यापार :** सोन्याची आर्थिक | | | |
| कारणाव्यतिरिक्त झालेली हालचाल | — | — | — |
| विदेश प्रवास | ३·९ | ७·० | – ३·१ |

| | | | |
|---|---|---|---|
| वाहतूक ( वा. भा. वि आयातींत समाविष्ट असलेला भाग सोडून ) | ४६·७ | १८·५ + | २८·२ |
| विमा ( ,, ,, | ९·१ | ५·५ + | ३·६ |
| सरकारी व्यवहार | ३३·७ | १५·३ + | १८·४ |
| गुंतवणुकीवरील नफा | २३·१ | २५·९ − | २·८ |
| इतर | ३५·९ | २१·६ + | १४·३ |
| सरकारी देणग्या (कोलंबो योजना, फोर्ड फाउंडेशन वगैरे प्रकारच्या ) | २९·२ | — + | २९·२ |
| खासगी देणग्या | ५७·७ | १६·४ + | ४१ ३ |
| चूकभूल, हिशोबांतील फरक | | + | ४·४ |
| एकूण चालू व्यवहाराचा हिशेबः- | ९०८·२ | १२८५·० − | ३७२·४ |

प्रदानतुलेंत अशी जी रकम कमी पडते ती ( म्हणजेच इथें—३७२·४ कोटी रु. ची. ) एकूण तूट भांडवली व्यवहारानें समतोल केली जाते. यावर्षी तिचा हिशेब असा होता.

( क ) भांडवली व्यवहार :

| | | | |
|---|---|---|---|
| खासगी दीर्घमुदतीचीं कर्जे | १३·० | २०·४ | − ७·४ |
| ,, अल्प ,, | १६·० | १७ २ | − १·२ |
| सरकारी व बँकिंग स्वरूपाचीं दीर्घमुदतीचीं कर्जे ( भिलई - योजना ) वगैरे स्वरूपाची | ८७·१ | १५·० | +७२·१ |
| कर्ज फेड | ६·३ | ७९·३ | −७३·० |
| अन्यव्यवहार | — | ०·६ | − ०·६ |
| अल्पमुदतीचीं सरकारी व बँकिंग स्वरूपाचीं कर्जे ( आतरराष्ट्रीय निधींतून काढलेल्या रकमा वगैरे. | ४०४·३ | २१·८ | +३८२·५ |
| — | — | — | — |
| एकूण भांडवली व्यवहाराचा हिशेब | ५२६·७ | १५४·३ | +३७२,४ |

या प्रदानतुलेवरून दृश्य व्यापार तुलेंतील भर व घट व तिचे अदृश्यव्यापार व भांडवली व्यवहार यानें समतोलन कसें होतें हें लक्षांत येईल. अर्थात् चालू व्यवहारांतील घट ही गंगाजळींतून किंवा भांडवली कर्जानें सारखी भरणें हें इष्ट नाहीं हें उघडच दिसून येईल. हें कोष्टक केवळ सर्वसामान्य माहितीसाठींच दिलें आहे. भारताचा सन १९५९ चा व्यापार कसा होता हेंही खालील कोष्टकावरून दिसून येईल.

**सन १९५९ मध्यें वेगवेगळ्या देशांशी केलेला व्यापार (कोटी रुपयांत)**

| | निर्यात | आयात |
|---|---|---|
| ग्रेट ब्रिटन | १६७.६४ | १७२.७२ |
| संयुक्त संस्थानें | ९५.१२ | १९५.४३ |
| जपान | ३४.३८ | ४०.९६ |
| ऑस्ट्रेलिया | १९.१५ | ११.८० |
| रशिया | ३०.३४ | १६.६५ |
| सीलोन | २२.१४ | — |
| पश्चिम जर्मनी | १९.४४ | ११८.७२ |
| कॅनडा | १५.१२ | २२.२१ |
| ब्रह्मदेश | १२.६२ | १३.१७ |
| इजिप्त | ८.८७ | ८.०४ |
| सौदी अरेबिया | — | २०.०५ |
| फ्रान्स | ८.१४ | १९.१० |
| बेल्जिअम | — | १२.३७ |
| अर्जेंटिना | ७.९८ | — |
| सिंगापूर | ७.५१ | ९.०९ |
| स्वित्झर्लंड | — | ७.८३ |
| कुवेत | — | ५.१५ |
| सुदान | १४.६२ | — |
| हॉलंड | ८.९६ | १३.०७ |

| | | |
|---|---|---|
| केनिया | ४.८३ | ११.६४ |
| इटली | ५.५८ | २५.८६ |
| स्वीडन | — | १०.७० |
| नायजेरिया | ३.९८ | — |
| पाकिस्तान | ६.२९ | ५.४६. |
| इराण | — | ३५.५६ |
| इतर देश | १२३.०७ | ११०.८० |

## सन १९५९ च्या आयात–निर्यातीतील प्रमुख पदार्थ.

| | निर्यात. | आयात. |
|---|---|---|
| अन्नधान्य ( पुनर्निर्यात सोडून ) | | ११८.९८ |
| मशिनरी ( विद्युल्लंग सोडून ) | | १४६.१९ |
| चहा | १२६.४० | — |
| लोखंड, पोलाद | — | ८४.०१ |
| सुती कपडे | ६१.३१ | — |
| बिनसुती कपडे | ७१.३५ | — |
| वाहतुकीचें सामान | — | ७०.४२ |
| अन्य कपडे | ४७.३६ | — |
| इलेक्ट्रिक मशिनरी | — | ५०.०१ |
| अलोह धातूंची माती | १६.६४ | — |
| कातडीं ( कमावलेलीं ) | २८.६५ | — |
| कच्चा कापूस | १६.३७ | ३४.७६ |
| ताजीं फळें व सुकीं फळें | १६.६० | ११.१९ |
| तेलबिया | १५.७७ | ११.२२ |
| कच्ची लोकर | १२.२२ | — |
| साखर | २.५४ | — |
| अशुद्ध लोखंड | १२.९३ | — |

## तांत्रिक शब्द व त्यांचे अर्थ :–

३

विदेशविनिमयाचा जास्त विचार करण्यापूर्वी त्यांतील कांहीं तांत्रिक शब्दांचा अर्थ माहीत असणें आवश्यक ठरतें. तसेंच त्यासंबंधीच्या व्यवहारांतही जीं सर्वसाधारण सूत्रें पाळलीं जातात त्यांचेंही सम्यक् ज्ञान असावें लागतें. विदेशविनिमय हाच शब्द इतका व्यापक आहे कीं त्याचे वेगवेगळ्या वेळीं वेगवेगळे अर्थ होतात व अशा वेळीं तो शब्द कुठल्या संदर्भांत वापरला गेला आहे हें बघावें लागतें. विदेशविनिमय याचा अगदीं साधा अर्थ म्हणजे परकीय चलन. तसेंच वर उल्लेखिल्याप्रमाणें दोन वेगवेगळ्या देशांतील चलनाच्या अदलाबदलीचे प्रमाणासही हा शब्द वापरला जातो. एका राष्ट्रांतील साधन संपत्तीचे दुसऱ्या राष्ट्रांतील चलनात अशी अदलाबदल करताना वापरल्या जाणाऱ्या पद्धतीसही हा शब्द व्यापक अर्थानें वापरला जातो. 'विदेशविनिमया'चे विविध अर्थ पहिल्या प्रकरणांत दिलेले आहेतच पण विदेशविनिमयांत कुठलाही अर्थ घेतला तरी त्यात 'चलन' किंवा त्यावरील हक्क अभिप्रेत आहे.

तसेंच या व्यवहारांतून जरी 'अर्थ' हा शब्द लुप्त झाला असला तरी प्रत्येक वेळीं तो अभिप्रेत आहे. विदेशविनिमय म्हणजे विदेशी चलन या अर्थाचा विनिमय होय. इथें "अर्थ" ह्या संज्ञेसही व्यापक अर्थ दिला गेला आहे. अर्थ किंवा चलन म्हणजे या ठिकाणीं केवळ त्या देशांतील वापरांत असलेल्या नोटा व नाणीं असें नव्हे तर इतर जो जो दस्तऐवज "अर्थ" म्हणजे पैसा या संज्ञेनें व्यक्त होणारे काम करण्यासाठीं वापरला जातो त्या त्या मौल्कि कागदपत्राचाही त्यांत समावेश होतो. निर्यातपत्र (Bill of Lading), चेक्स्, ड्राफ्ट, प्रॉमिसरी नोटा व बिल्स ऑफ एक्स्चेंज यांचा उदाहरणार्थ त्यांत निर्देश करायला हरकत नाहीं.

## अन्यपरिमाण दर (Currency Rate):

विदेशविनिमयाच्या व्यवहारांत परकीय चलन आपल्या चलनाचे बदली विकत घ्यावें लागतें किंवा परकीय चलनावर अधिकार देणारें कागदपत्र आपल्या हातांत असल्यास असें चलन विकून त्याबदली आपलें चलन घ्यावें लागतें. या व्यवहारांत, अन्य व्यवहाराप्रमाणेंच आपल्याजवळची वस्तू द्यायची झाल्यास ती शक्य तितकी कमी कशी देतां येईल किंवा दुसऱ्याजवळची वस्तू घ्यावयाची असल्यास ती जास्ती कशी मिळेल याच तत्त्वाचा विचार केला जातो. विदेशविनिमयांत दोन प्रकारानें परकीय चलनाचें प्रमाण सांगितलें जातें. पहिल्या प्रकारांत आपल्या चलनाचें परिमाण कायम ठेवून त्याबद्दल अन्य चलनाचे किती परिमाण दिलें जाईल हें सांगितलें जातें. जेव्हां १०० रु. च्या बदल्यांत बँक किती डॉइश मार्कस्, स्विस फ्रँक्स, डॅनिश क्रोनर्स, किंवा डच गिल्डर्स द्यायला तयार आहे किंवा यांच्या किती परिमाणाबद्दल १०० रु. द्यायला तयार आहे, त्याचे भाव सांगितले जातात तेव्हां त्याला अन्य परिमाण दर (Currency Rate) असें म्हणतात. अशा दरांचे वेळीं १०० रु. चे बदली वर सांगितल्याप्रमाणें, अधिकृत विक्रेता बँक फक्त ८२॥ मार्कस् विकायला तयार होईल; तर मार्कचा चेक खातेदाराकडून विकत घेतांना मात्र त्याला ८४ मार्कांसाठीं १०० रु. देऊं करील. म्हणजेच विकत घेतांना मात्र परकीय चलन जास्ती म्हणजेच त्याचे वाढतें परिमाण पण विकतांना मात्र परकीय चलन कमी द्यायचें म्हणजे त्याचें घटतें परिमाण या सिद्धान्तानुसार ती वागेल. अन्य परिमाणदरांत चढत्या भावांत घ्या व उतरत्या भावांत विका, जास्ती घ्या, कमी द्या (Buy High, Sell Low) हा तिचा उद्देश राहील.

## स्वपरिमाण दर (Pence Rate):

याउलट परकीय चलनाचें परिमाण स्थिर ठेवून आपल्या चलनाचे बदलीचें प्रमाण जेव्हां सांगितलें जातें तेव्हां त्या प्रकाराला स्वपरिमाणदर (Pence Rate) म्हणतां येईल. म्हणजे १०० डॉलर्सचें परिमाण स्थिर

ठेवून त्याबद्दल किती रुपये दिले अगर घेतले जातील अशा प्रकारचे दर सांगतांना स्वपरिमाणदराचा अवलंब होईल. स्वपरिमाण-दराचे वेळीं आपलें चलन जितकें कमी दिलें जाईल, तितका फायदा होईल. म्हणजे अन्य परिमाणदरांतील तत्त्वाऐवजीं इथें त्या तत्त्वाच्या उलट तत्त्व पाळलें जाईल; म्हणजेच १०० डॉलर्स आयातदाराला विकतांना बँक जरी ४८० रुपयाला ते विकावयाला तयार असली तरी निर्यातदाराला किंवा परकीय चलनाच्या धन्याला मात्र त्याच्याकडून १०० डॉलर्स घेतांना ती ४७५ रु. च द्यायला तयार होईल. स्वपरिमाणदरानें जेव्हां विदेशविनिमयाचे दर सांगितले जातात तेव्हां कमी किंवा उतरत्या ( भावांत ) भांजणींत घ्या व चढत्या भांजणीत विका, हें तत्त्व असणें उघड आहे. म्हणजे स्वपरिणाम दरात विकतांना वाढतें परिमाण पण खरेदी करतांना घटतें परिमाण या सिद्धान्ताचा अवलंब बँक करील ( Buy Low, Sell High ) आणि या प्रकारें सर्व व्यवहार, बँक काय प्रत्येकजणच करायला बघेल व आपल्याजवळील वस्तूच्या मोबदल्यांत दुसऱ्याकडून वस्तूचें जास्त प्रमाण कसें मिळेल हें बघण्याची देणारा पराकाष्ठा करील तर घेणारा आपल्याजवळील वस्तूचें कमी प्रमाण कसें दुसऱ्याला जाईल याची कोशीस करील.

## कसर, वाढावा व अन्य तांत्रिक परिभाषा :

विदेशविनिमय व्यवहारांत "विदेशविनिमय" हा शब्द कांहीं वेळा दोन चलनांतील अदलाबदलीचा दर म्हणून वापरला जातो; तर कित्येक वेळां "परकीय चलन" या अर्थानेंही वापरला जातो. तो कुठल्या वेळीं कुठल्या अर्थानें वापरला जात आहे हें संबंधित व्यक्तींनें नीट लक्षांत घ्यावयास हवें. कित्येकदां याच संदर्भांत आपण डॉलर महागला, पौंड स्वस्त झाला अशी शब्दसंहिता वापरलेली ऐकतों, तर कित्येकदां यांचे दर वाढले, कडाडले किंवा घसरले असेही शब्द प्रचारांत आलेले बघतों. त्याचप्रमाणें अमके चलनांत कसर ( Discount ) आहे किंवा वाढावा ( Premium ) आहे असेही उल्लेख विदेशविनिमयव्यवहारांत आढळतात. त्यांचे योग्य ते अर्थ लक्षांत घेतले म्हणजे अशा व्यवहारांत बरोबर काय अभिप्रेत आहे हें समजणें

सोपें जातें. कित्येकदां विदेशविनिमय आपल्याला फायद्याचा ( Favourable ) आहे, किंवा आपल्या बाजूचा आहे व कित्येकदा तो आपल्या बाजूचा नाहीं ( Unfavourable ) असेंही म्हटलें जातें. या सर्व शब्दांचा एकमेकांशीं संबंध आहे. रुपयाची किंमत घसरली असें म्हटलें तर त्याचा अर्थ रुपयाच्या बदली दरांत वाढ झाली असा होतो. १०० डॉलर्सला ४७५ रु. मिळत असले व रुपयाची किंमत घसरली तर त्याचा अर्थ पर्यायानें डॉलर्सची किंमत वाढली किंवा डॉलर्स महाग झाले व रुपये स्वस्त झाले असा होईल. म्हणजे अशा वेळीं १०० डॉलर्सला जास्त रुपये, समजा ४७७ रु. मिळतील, पण डॉलर्स विकत घ्यायचे असले तर तसेच जास्त रुपये म्हणजे ४७५ ऐवजीं ४७७ रुपये द्यावे लागतील.

कित्येकदां विनिमयाबद्दल बोलताना आजचा दर पक्का ( Firm, Hard ) होता किंवा कच्चा ( Weak, Easy ) होता असें म्हटलें जातें. ज्या वेळेला एकाद्या चलनाचा पक्का दर म्हटला जातो त्यावेळेला चलनांतील दरांत वाढ झाली आहे असा अर्थ होतो. दर कच्चा असतो त्यावेळेला त्यांत घसरगुंडी दिसते. म्हणजेच या तिन्ही शब्दसमुच्चयांचा अर्थ एकत्र करावयाचा झाला तर असें म्हणतां येईल कीं, रुपयाची किंमत वाढली असेल, किंवा रुपयाच्या बदली दरांत घट दिसेल, किंवा रुपयाला वाढावा आला आहे असें असेल तेव्हां रुपया पक्का झाला असें म्हटलें जाईल. हे शब्दसमुच्चय ज्या वेळेला स्वकीयचलनदर (Currency Rate) असेल तेव्हां योग्य ठरतील. परकीय चलनदर ( Pence Rate ) असेल तेव्हा त्याप्रमाणें अर्थ बदलून घ्यावा लागेल, म्हणजे उलटे करावे लागतील. चलनाची पक्की व कच्ची स्थिति (Hard and Weak, Strong and Easy) चलनांतील सुधारणा व घसरगुडी ( Appreciation and Depreciation ) चलनाचे फायदेशीर वा बिनफायदेशीर दर ( Favurable or Unfavourable Rates ) व चलनांतील वाटावा या कसर ( Premium or Discount ) याची कल्पना खालील उदाहरणावरून येईल. समजा काल सध्याकाळीं १०० डॉलर्सचा खरेदी भाव ४७१ रुपये व विक्रीचा भाव

४७६.५० रु. व बँकांतर्गत विक्रीचा भाव ४७४ रु. होता. तो आज सकाळीं तोच राहिला व डॉलर्स कुणी विकायला तयार नसले व खरेदीचीच मागणी जास्त राहिली तर डॉलर पक्का आहे असें म्हटलें जाईल. कांहीं वेळानें निर्यात बिलें मिळाल्यानें एकाद्या बँकेजवळ जास्त डॉलर्स होऊन तिची परिस्थिति दीर्घ ( Long ) झाली तर ती थोड्या कमी भावांत कां होईना ते विकावयास निघेल व विक्रीचा भाव त्यावेळीं कमी झाल्यास म्हणजे १०० डॉलर्सला ती अन्य बँकांकडून फक्त रु. ४७३.७५ घेऊं लागल्यास किंवा इतरांना रु. ४७६.२५ प्रमाणें विक्री करूं लागल्यास डॉलरची घसरगुंडी झाली, किंवा डॉलरचा दर बँकेला बिनकिफायतशीर होऊं लागला असें म्हटलें जाईल. वाढावा या कसर हे शब्दप्रयोग नेहमीं वायद्यांतील दराबाबतच वापरले जातात. तयार ( Spot ) दरांबद्दल नाहीं. समजा आज १०० डॉलर्सची विक्री ४७६.५० ला होत असेल पण तीन महिन्यांचे वायद्याचे डॉलर्सचा दर ४७८ असेल तर वायद्यांतील दरासाठीं १॥ रुपयाचा वाढावा आहे असें म्हटलें जाईल. तसेंच खरेदीसाठीं वायद्यांत ४७१ रुपयांऐवजीं बँक ४७२॥ देत असेल तर तीन महिन्यांचे खरेदीचे दरांतही १॥ रु. चा वाढावा आहे म्हणजे 'डॉलरला वाढावा आहे' असें सांगितले जाईल.

## दर कसे सांगतात :

ज्या वेळेला विदेशविनिमयांत बँका विदेशी चलनांचे दर सांगत असतात त्यावेळीं त्यांतला पहिला दर हा विक्रीचा असतो व दुसरा खरेदीचा असतो. मार्कचा दर सांगतांना बँकेनें ८२॥ व ८४॥ असे सांगितले तर त्याचा अर्थ ती बँक १०० रुपयाला ८२॥ मार्क विकावयाला तयार आहे पण घेण्याचेवेळीं मात्र ती ८४॥ मार्क खरेदी करील, तेव्हां १०० रुपये देईल असा अर्थ होतो. १५ ५/१६ व १६ १/१६ असे पौंडाचे दर सांगितले तर दर रुपयाला बँक १ शिलिंग ५ ५/१६ पेन्स विकील व १ शिलिंग ६ १/१६ पेन्स विकत घेईल असें समजलें जाईल. या व्यवहाराची फोड करतांना असे व्यवहार मुक्तपणें होतात व कुठलेंही नियंत्रण त्यावर नाहीं हें अभिप्रेत धरलें आहे.

असे दर सागताना बँकाना स्टॉक एक्स्चेंजवरील जॉबरप्रमाणेंच व्यवहार करावा लागतो. एकाद्या बँकेला विशिष्ट चलन विकावयाचें आहे, का घ्यावयाचे आहे याचा, ती चोकशी करते, तेव्हा आपले दर सागणाऱ्याला पत्ता नसतो. त्यानें आपले दर सागितले कीं नतर त्याप्रमाणें ती इतके इतके चलन त्या दरानें विकावयाला किंवा घ्यावयाला तयार आहे म्हणून सागते व मग तो सौदा पुरा होतो. इग्लडमध्यें आणि भारतातही बँकाना आपले रोकड किंवा वायद्यातील सोदे दलालामार्फतच करावे लागतात, तर फ्रान्स, वेल्जिअम, हॉल्ड, डेन्मार्क या ठिकाणीं बँका एकमेकाना सरळ व प्रत्यक्ष असे चलन विकू शकतात. जिथें बका एकमेकाना असे विदेशी चलन प्रत्यक्षपणें विकत नाहींत व दलालपद्धती असते तिथें हा व्यवहार कशा पद्धतीनें होतो याचे उदाहरण खालीलप्रमाणें देता येईल.

## दीर्घ व ऱ्हस्व परिस्थिति :

सकाळीं प्रत्येक बँक आपली विदेशचलनपरिस्थिति (आदले दिवशीच्या सध्याकाळची) (Position) कशी आहे ती बघते. ती लाब, म्हणजेच दीर्घ किंवा अतिजमेची (Long, Overbought) असेल तर त्याचा अर्थ तिच्याजवळ विदेशीचलन वाजवीपेक्षा जास्त शिल्लक आहे असा होतो. विनिमयव्यवहारातील अनिश्चितता व धोका नाहींसा करण्यासाठीं हें जादा चलन तावडतोव येईल तितक्या चागल्या भावानें विकून ती परिस्थिति सगतोल करणें बँकेला हितावह असतें. याउलट परिस्थिति, ऱ्हस्व, कमी शिल्केची किंवा तुटीची असेल (Short, Oversold) तर बँकेनें खरेदी व शिल्लक चलनापेक्षा जास्त विक्री केली असा अर्थ होतो. यातून परत मूळ स्थितीवर येण्यासाठीं शक्य त्या कमी भावात चलन खरेदी करणें हेंच धोका कमी करण्याचें साधन ठरतें. या परिस्थितीचा विचार केल्यानतर बँक आपापल्या विदेशी चलनासाठीं खरेदी-विक्रीचे दर काय राहतील ते ठरवते. सकाळीं प्रत्येक बँकेला दलालाकडून फोनवर तिच्या दराबद्दलची चौकशी होतेच आपले दर सांगितल्यानतर दलालाकडून मग वेगवेगळ्या बँकाकडे चौकशी होत असते, त्यावरून कुणाची काहीं खरेदी का विक्री व्हावयाची आहे याचा त्याना अदाज येतो. मग

खरेदीदार बँकांना, विक्री करणाऱ्या बँकेचें नांव न सांगतां फक्त भावच दलालांकडून सांगितला जातो. तसेच विक्री करणाऱ्या बँकांना खरेदीदार बँकाचीं नांवें न सांगतां तशाच पद्धतीनें भाव सांगितला जातो. जर विरुद्ध बाजूच्या बँकेला तो भाव मान्य नसेल तर तो किती खालीवर होऊं शकेल याची ती दलालाकडे चौकशी करते व त्याबाबत आपले भाव सांगते. मग दलाल दुसऱ्या बाजूच्या बँकेला ते परत कळवतो. त्यावेळीं स्वत:ची काय परिस्थिति आहे हे बघून तो भाव मान्य करावयाचा कीं नाहीं का त्यांत कांहीं आणखी बदल करावयाचा ते ती बँक ठरवते व तो दलालाबरोबर पटल्यास दलाल दोन्ही बाजूंना सौदा पुरा झाल्याची बातमी सांगतो, व मग दुसऱ्या बाजूच्या बँकेचें नांव सांगतो. नंतर तो दोघांना आपले कॉंट्रॅक्ट पाठवतो. व दोन्ही बँकाकडून एकमेकांना खरेदीविक्रीचे कराराबद्दलची खात्रीपत्रें पाठवलीं जातात व मग खरेदी करणारी बँक, विक्री करणाऱ्या बँकेला, ते विदेशी चलन परदेशांतील आपले कुठले खातीं जमा करावयाचे आहे ते कळवते व त्याप्रमाणें विक्री करणारी बँक आपल्या विदेशी प्रतिनिधीला तसे पैसे वर्ग करण्याची सूचना देते. त्याचवेळीं खरेदीदार बँकेकडून तिला रुपयांत रक्कम अदा केली जाते. आंतरबँकिंगच्या या व्यवहारांत सांगितला जाणारा दर हा टेलिग्राफिक ट्रॅन्स्फर (T. T.) चा असतो व वर्ग करावयाच्या सूचनेचा तारखर्च विक्री करणाऱ्या बँकेवर पडतो. तसेच भारतांत, विक्री करणाऱ्या अधिकृत बँकेला, सौदा पुरा झाल्यावर, दलालाला ( सध्यां $\frac{1}{32}$% इतकी ) *दलाली ही द्यावी लागते.*

वरील पद्धत वर्णन करतांना तयार खरेदीविक्री व्यवहाराबद्दलच कल्पना दिली आहे. पण वायद्यांतील व्यवहाराबाबतही अशीच पद्धत अवलंबिली जाते. वायद्यांतील व्यवहारांत जानेवारी वायदा, फेब्रुवारी वायदा असा वायदा सांगितला जातो, व तो सौदा झाल्यावर फेब्रुवारी, किंवा त्या त्या अशा वायद्याच्या महिन्यांत पाहिजे तेव्हां चलन मागण्याची खरेदीदार बँकेला मुभा ( Option ) असते. ( वैयक्तिक पातळीवर जेव्हां वायद्यांत, हमीपत्राच्या

किंवा अन्य व्यापारी व्यवहाराच्या आधारावर एकादा व्यापारी किंवा संस्था असा सौदा करते तेव्हांही खरेदीदारालाच वायदा पुरा करण्याबद्दल विक्री-दाराला सांगण्याचा विशेषाधिकार असतो.) अशा वायद्यांतील रक्कम ही थोडीथोडीही मागता येते. बँकिंग व्यवहारांत पौंडांचा व्यवहार जेव्हा केला जातो तेव्हां भारतात तो दर, दोन भागांतील प्रमाण किती राहील या पद्धतीनें सांगितला जातो. पहिला भाग हा रुपयाला १ शिलिंग सहा पेन्सनें किती पौंड व दुसरा भाग हा रुपयाला १ शिलिंग ५ २१/३२ पेन्सनें किती पौंड असा असतो व हें प्रमाण पुरवठा व मागणीच्या तत्त्वानुसार (उदाहरणार्थ १: १, ४: १, ७: २ याप्रमाणे) सांगितले जाऊं शकते. बँक जर विक्रीला जास्त उत्सुक असेल तर पहिला भाग जास्त प्रमाणांत सांगितला जातो. जर विक्रीस पौंड बाजारांत येत नसतील तर खरेदीदार बँकेला रिझर्व बँकेकडून किमान २५००० पौंडांचेवर, १ शिलिंग ५ ५३/६४ पेन्स या दरानें तयार पौंड किंवा १ शिलिंग ५ २१/३२ दरानें ६ महिन्यापर्यंतच्या वायद्यांत मिळूं शकतात. तसेच बाजारांत कुणी खरेदीदार नसल्यास रिझर्व बँक अधिकृत बँकेकडून १ शिलिंग ६ पेन्स या दराने पौंड (२५००० चे वर असल्यास) खरेदी करते.

बँका, असे खरेदी विक्रीचे सौदे दिवसभर, परिस्थिती दैनंदिन व्यवहारामुळें (ड्राफ्ट, तारवदली विकणें, बिले घेणें, वगैरे) फिरत असते त्या प्रमाणें समतोल राहण्यासाठीं, करीत असतात. सकाळी ऱ्हस्व परिस्थिती असेल तर बिलांची रक्कम वसूल झाल्यानें ती दुपारी दीर्घ होऊं शकेल व ती परत इमी पत्राखालील बिलामुळें किंवा तारवदली विकल्यामुळें ऱ्हस्व होऊं शकेल. अशा रितीनें परिस्थितीचा अंदाज घेऊन व्यवहारी (Dealers) सर्व जगांत याच पद्धतीनें व्यवहार करीत असतात.

## दरांतील वेगवेगळे फरक :

भारतांत अधिकृत बँका अन्य व्यापाऱ्यांना जेव्हां खरेदी विक्री करतात तेव्हां, नियंत्रणामुळें त्याचे पाठीमागें कांहीं समत असा व्यापारी व्यवहार आहे ना हे बघत असतात. बँकांकडून जेव्हां दर सांगितले जातात

तेव्हां असे दर वर अन्यत्र सांगितल्याप्रमाणें पहिला विक्रीचा व दुसरा खरेदीचा अशा पद्धतीनें सांगितले जातात व ते "तयार" (Spot, Ready) विक्री वा खरेदीचे असतात. विदेशविनिमयाच्या व्यवहारांत या दरांची आणखीही गुंतागुंत होऊं शकते. ज्या वेळेला असा व्यवहार करावयाचा असतो त्या वेळेला बँकेकडे खरेदीसाठीं वेगवेगळ्या प्रकारचे (चलनी नोटा, चेक, ड्राफ्ट, मुदतीहुंडया, निर्यातपत्रासोबतच्या दर्शनी हुंडया) विदेशी चलन येतें. तसेच विक्रीचे वेळींही खातेदार किंवा खरेदीदार वेगवेगळ्या प्रकारे विदेशी चलन (टेलिग्राफ ट्रॅन्स्फर, मेल ट्रॅन्स्फर, ड्राफ्ट) मागूं शकतो.

बँका ज्यावेळीं विदेशी चलन तारबदलीनें (टेलिग्राफ ट्रॅन्स्फर) खरेदी करतात तेव्हां अन्य बँकांची परदेशांत खातीं असतील त्या ठिकाणीं त्या खात्यांतून बँकेला तयार विदेशी चलन त्यादिवशीं मिळूं शकते. या उलट खातेदारानें माल निर्यात करून त्याची हुंडी जर आयातदारावर काढली असली तर ती हुंडी तो आपल्या बँकेंत भरील म्हणजेच पर्यायानें बँक जी त्याच्याकडून खरेदी करील, त्या हुंडीचे पैसे मात्र त्या बँकेला परदेशांत ती आयातदारावर देखाड झाल्यावर व त्यानें त्याची रक्कम भरल्यावरच मिळेल. तत्पूर्वी त्या हुंडीचे पैसे बँक ती खरेदी करून निर्यातदाराला देऊनही टाकील. कित्येकदां खातेदार आपल्या खात्यांत परकीय चलनांत काढलेले त्यांच्या नांवाचे चेक्स, डिव्हिडंड वॉरंट्सही भरतात. अशा चेक्स व वॉरंट्सची रक्कम त्या बँकेला जेव्हां परदेशांतील बँका चेक वटवतील तेव्हांच मिळेल. म्हणजे वरील शेवटच्या दोन्ही प्रकारांत बँकेनें त्याचे आधीं पैसे दिले तरी तिला त्या मौलिक कागदाचे पैसे प्रत्यक्ष मिळण्यास थोडा कालावधि लागतो, व या वेळेइतकें पर्यायानें तिचें व्याज बुडतें. त्याचप्रमाणें वरील कागदपत्र पाठविण्यासाठीं बँकेला कांहींसा खर्चही येतो. साहजिकच असे चेक्स, वॉरंटस् व दर्शनी हुंडया यांच्या खरेदीचा दर बँक जरा कमी ठेवील. म्हणजेच खरेदीचे वेळीं बँका एक दर तयार खरेदी किंवा तारवर्ग (Telegraphic Transfer) यासाठीं ठेवील व दुसरा दर टपालवर्ग (Mail Transfer) साठीं ठेवील आणि तिसरा दर्शनी हुंडया (Sight Bills) साठीं ठेवील.

## टेलकेल दर

विदेशी चलनाचा व्यवहार करणारी बँक वरील दर सागताना स्वपरिमाण दर व अन्य परिमाण दर याचा सदर्भ घेऊन, स्वपरिमाण दर सागितल्यास विक्रीस कमी, खरेदीस जास्त ( Buy high, sell low ) म्हणजे उदाहरणार्थ १ रुपयाला १.५ १/१६—१.६. १/१६ असा दर सागते. तसेंच विदेशचलनपरिमाणात दर असल्यास विक्रीस जास्त खरेदीस कमी हा सिद्धान्त अमलात आणते. १०० डॉलर्सबरोबर अमुक रुपये असा दर सागण्याची पद्धति असताना जितके जास्त रुपये १०० डॉलर्स विकताना मिळतील किंवा जितके कमी रुपये १०० डॉलर्स खरेदी करताना द्यावे लागतील तितके किफायतशीर ठरेल. याउलट एक रुपयाबरोबर अमुक शिलिंग पेन्स असा दर सागण्याची पद्धति आहे, तेथे दर रुपयास जितके कमी शिलिंग विकले जातील किंवा खरेदी करताना दर रुपयास जितके जास्त शिलिंग पेन्स मिळतील तितके ते फायदेशीर पडेल. वरील उदाहरणात १०० डॉलर्स विकताना ४७५ पेक्षा ४७६ त्यापेक्षा ४७८ रुपये मिळाल्यास व विकत घेताना १०० डॉलर्सऐवजीं ४७१ रुपये किंवा त्यापेक्षा कमी म्हणजे ४७० किंवा ४६९ रुपये दिले तर बँकेचा नफा वाढेल. याउलट एक पौंड विकताना १३.३८ रुपये घेतल्यास पण एक पौंड खरेदी करतेवेळीं १३.२५ रुपये दिल्यास तो व्यवहार किफायतीचा होईल. ही सर्वसामान्य जी दर सागण्याची पद्धत आहे त्याबद्दल जास्त खुलासा इतरत्र झालाच आहे. पण त्यातही बँका कुठल्या प्रकारानें विदेशी चलन विकावयाचे आहे, *किंवा, विशेषतः खरेदी करावयाचे आहे याचा विचार करून त्याचे दरात* थोडा-फार फरक करतात. सगळ्यात लौकर पैसे देण्याघेण्याचे साधन म्हणजे तारवदली ( Telegraphic Transfer ) होय म्हणून हा दर नेहमीं "समन्वय दर" म्हणून समजला जातो व त्यात नेहमीं कमी जास्त फरक केला जातो. तत्वत: टेलिग्राफ ट्रॅन्स्फरचा दर हा नेहमीं महाग, जास्त खर्चाचा असतो. चलन विकताना बहुश. ते तारवदली किंवा टपाल-वदलीनेच असल्यानें बँकाचे दरात ( नोटा व नाण्याचे विक्रीखेरीज ) फरक

दिसत नाहीं, पण चलन विकत घेतांना मात्र बँका तें चेक ड्राफ्ट का हुंडीचे स्वरुपांत आहे, हुंडी असल्यास नुसती दर्शनी हुंडी आहे का नाविक दस्तऐवजाबरोबर काढलेली हुंडी आहे का हमीपत्राखाली द्यावयाच्या दस्तऐवजाबरोबरची हुंडी आहे याचा विचार करून वेगवेगळे दर देते. बँकाकडून हे दर कसे दिले जातात हें खालील उदाहरणांवरून लक्षांत येईल.

| | | |
|---|---|---|
| (अ) चेक, ड्राफ्टसारखीं वसुलीचीं बिलें तयार खरेदी : | ४७०.२५, | १०० डॉलर्सला |
| हमीपत्राखालील बिलें—तयार खरेदी : | ४७१.२५, | |
| टेलिग्राफिक ट्रॅन्स्फरखालील खरेदी : | ४७२.२५, | |
| आंतरबँकीय तयार ( टेलिग्राफिक ) खरेदी : | ४७४.००, | |
| टेलिग्राफिक ट्रॅन्स्फर किंवा ड्राफ्टची विक्री | ४७७.२५, | |

(ब) पौंडांतील प्रवासी चेक, टेलिग्राफ

| | | |
|---|---|---|
| ट्रॅन्स्फर ड्राफ्ट वगैरे विक्रीसाठीं | दर रुपयाला | १ शिलिंग ५ ३१/३२ पेन्स. |
| पौंडांतील आयातीचे ड्राफ्ट वगैरे विक्रीसाठी | ,, | १ शिलिंग ५ १५/१६ पेन्स. |
| पौंडांतील आयातीचे सहा महिनेपर्यंत मुदती ड्राफ्टचे विक्रीसाठी | ,, | १ शिलिंग ५ २९/३२ पेन्स. |
| पौंडांतील आयातीचे सहाचे वर, १२ महिनेपर्यंत मुदतीचे ड्राफ्ट विक्रीस | | १ शिलिंग ५ ७/८ पेन्स. |
| पौंडांतील चेक्स ड्राफ्ट वगैरे खरेदीसाठीं | दर रुपयाला | १ शिलिंग ६ १/१६ पेन्स. |
| पौंडांतील तीस दिवसांचे मुदतीचे बिलाचे ६ महिन्यांच्या वायद्यांतील खरेदीसाठीं | दर रुपयास | १ शिलिंग ६ ३/३२ पेन्स. |

वरील उदाहरणावरून बँका वेगवेगळे दर देतात तेव्हां "चांगली हुण्डी चांगला दर" (Better the bill, better the rate) हें तत्त्व वापरतात असें दिसून येईल. अर्थात् हवाई मार्गानें हल्लीं सर्व टपाल जात असल्यानें त्यांत वसुलीसाठी फार दिवस जात नाहींत त्यामुळें व्याजाबाबतचे हिशेबापोटीं दरांत खूपसा फरक पडलेला दिसत नाहीं. पण पूर्वी मात्र तो असावयाचा. तसेच Exchange as per Endorsement या

शर्तीनें काढलेल्या बिलाचा दर देतांना असा फरक करावा लागतो. असा दर देताना विशेषत. मुदती हुंडीबाबत व्याज व इतर खर्च याचा विचार कसा करतात हें खालीं दाखवलें आहे.

समजा इंग्लण्डमधल्या व्यापाऱ्यानें न्यूयॉर्कवर काढलेले एक लाख डॉलर्सचें बिल एका इंग्लिश बॅंकेनें घ्यावयाचे ठरवलें व ते ९० दिवसाच्या मुदतीचें असेल तर त्याचा दर खालील प्रमाणे काढला जाईल.

| | |
|---|---|
| टेलिग्राफिक ट्रॅन्स्फरचा दर | २·८०१२ |
| नव्वद दिवसाचे चार टक्क्यानें व्याज | ·०२८०१२ |
| न्यूयॉर्कमधील खर्च, आकाराचे पोटीं $\frac{1}{2}$% | ·०१४००६ |
| दरा (एक्स्चेज) मधील कमिशन $\frac{1}{16}$% | ·००१७५०७५ |
| | २·८४४९६८७५ म्हणजेच |

२·८४५० डॉलर्स. अशा रीतीनें काढलेल्या या दराला टेलक्वेल दर (Tel Quel Rate) म्हटलें जातें. टेलिग्राफिक ट्रॅन्स्फरचा दर जर पेन्स रेट म्हणजे स्वपरिमाण पद्धतीनें सांगितला जात असेल तर व्याज, विदेशात आकार, खर्च व एक्स्चेंज या बाबी त्यातून वजा केल्या जातील. वरील उदाहरणात अन्य परिमाण दर पद्धतीमुळे बॅंकेला एका पौंडापोटीं जितके जास्त डॉलर्स मिळतील (Buy High) तितके पाहिजे असतात तर स्वपरिमाण दरात जितके स्वत.चे चलन कमी दिलें जाईल तितकें फायदेशीर असतें म्हणूनच वर सांगितल्याप्रमाणें वजावट केली जाते. अशा खरेदी विक्रींत बिल बघून बॅंका दरात कसा फरक करतात तें मागील तक्त्यावरून दिसलें आहेच.

**वायदा व्यवहार (Forward Dealings)**

वरील विवेचन हें तयार खरेदी अगर विक्रीच्यावेळीं काय होतें तें दाखविणारें आहे, पण कित्येक वेळ अशी विक्री करण्यासाठीं हातात परकीय चलन त्यावेळीं उपलब्ध नसते किंवा मालाचे वगैरे कागदपत्र कधीं येतील व खरेदीची जरूरी लागेल याची नक्की तारीख सांगता येत नसते. मात्र असा व्यवहार अदाजे कुठल्या मुदतींत होईल याची सर्वसाधारण कल्पना व्यवहार करणाऱ्याला असते, किंवा ज्यावेळेला दर्शनी हुंडीऐवजीं मुदती

हुंडी काढलेली असते त्यावेळीं ती रकम, नक्की दिनांक माहीत असला तरीही भविष्यकाळांत उपलब्ध होणार असते किंवा लागणार असते. परकीय चलनाचे दर हे नेहमीं बदलणारे असतात व राजकीय, सामाजिक, व आर्थिक अनेक घटनांचा त्यावर नित्य परिणाम होत असतो. हें जाणून सामान्यपणे व्यवहारी मनुष्य या अनिश्चिततेच्या वातावरणाची काळजी न करतां त्याबाबत आधींच वायदा करण्यास उत्सुक असतो व अशा वायद्यानें तो भविष्यकाळांत उपलब्ध होणाऱ्या किंवा लागणाऱ्या परकीय चलनाचा दर आजच बॅंकेकडून ठरवून घेतो. अर्थात् (बॅंक किंवा) कुठलाही विक्रेता याबाबत भविष्यकाळांत त्यावेळीं त्या चलनाची काय परिस्थिति असेल, त्याच्या मागणी-पुरवठ्यांत काय संभाव्य बदल होतील, त्या काळांत दोन्ही ठिकाणचे व्याजाचे दर काय असतील वगैरेंचा हिशोब करूनच वायद्याचे दर देत असतो. पण त्याचाच अर्थ परकीय चलनाची रोख तयार खरेदी विक्री होते तशीच वायद्यातही एक महिन्याच्या, दोन महिन्यांच्या, किंवा बारा महिन्यांच्या वायद्यानेंही विक्री होत असते, किंवा खरेदी होत असते, व या खरेदीविक्रीचे दर सांगतांना ते चालू किंवा रोख खरेदीविक्रीच्या भावांत घट किंवा वाढावा किंतीची आहे ते सांगून दर्शविले जातात. ज्यावेळीं स्वकीय चलनदर दिला जात असेल तेव्हां परकीय चलन, वाढीनें (Premium) आहे असें म्हटलें म्हणजे तें महाग आहे असा त्याचा अर्थ होतो. जेव्हां त्यांत घट आहे म्हणून म्हणतात (Discount) तेव्हां परकीय चलन स्वस्त आहे असें समजलें जाईल. वायद्यांतील चलन हें महाग किंवा स्वस्त असणें हें त्यावेळीं काय परिस्थिति असेल याच्या विक्रेत्यांनीं घेतलेल्या अंदाजावर अवलंबून असते. खालील उदाहरणांवरून तयार दर, वायद्याचे दर व घट व वाढावा यांचा खुलासा होऊं शकेल.

### लंडनमधील वेगवेगळ्या चलनांचे दर

| चलन | तयार दर | तीन महिन्यांचे वायद्याचा फरक |
|---|---|---|
| न्यूयॉर्क (डॉलर) | २·८१ ३/८–२·८१ ३/४ | सेंट १/४–१/८ वाढावा |
| पॅरिस (फ्रॅंक्स) | १३·७६–१३·७६ १/२ | १–१ १/२ कसर |

| | | |
|---|---|---|
| व्हिएन्ना (शिलिंग) | ७२·४६–७२·५५ | ग्रोशेन ५–१० कसर |
| हॅंबुर्ग (मार्क) | ११·२०–११·२५ | फेनिग १½-१½ वाढावा |
| ब्रुसेल्स (फ्रॅंक्स) | १४०·२०–१४०·५० | २–१ कसर |
| ॲम्स्टरडॅम (गिल्डर) | १०·५६–१०·६० | ¾–¼ वाटावा |
| कोपेनहेगन (क्रोनर) | १९·३३–१९·३६ | २-१½ वाढावा |
| मिलानो (लिर) | १७४१-१७४२·२५ | १¼–१½ वाढावा |
| स्टॉकहोम (क्रोनर) | १४·५२¾–१४·५३⅛ | ½–¼ कसर |
| झुरीक (स्विसफ्रॅंक्स) | १२·१६½–१२·१७¾ | ३–३½ वाटावा |
| ऑस्लो (क्रोनर) | २०·०१–२०·०१½ | सम–½ वाटावा |
| मॉंट्रिअल (कॅने. डॉलर्स) | २·९०–२·९२ | १½–१¾ कसर |

# विनिमयव्यवहार

## ४

### वायद्यांतील व्यवहार :

दोन देशांतील चलनांचे विनिमय दरावर अनेक बाबींचा परिणाम होतो. ज्या देशाच्या चलनाला जास्त मागणी असते, त्या देशाचे चलनाचा दर नेहमीं कठीण असा असतो. वस्तूची किंमत ही मागणी व पुरवठ्यावर अवलंबून असते हा अर्थशास्त्रांतील सिद्धान्त परकीय चलनाबाबतही लागू पडतो व त्याचप्रमाणें हे दर बदलत असतात. पण या चलनांत व्यवहार करणारे बँकांसारखे अधिकृत प्रतिनिधी किंवा दलाल फारसा धोका पत्करायला तयार नसतात. जर एखाद्या दलालानें तीन महिन्यांच्या वायद्यानें डॉलर्स विकले असतील तर त्याला त्यावेळीं ते डॉलर्स आपल्या हातांत आहेत याची खात्री असावी लागते. कदाचित् ही रक्कम लहान असेल तर, किंवा त्यावेळेला डॉलर्स स्वस्त होतील असा त्याचा अंदाज असेल तर तो ते डॉलर्स आपल्या शिलकींतून देईल किंवा स्वस्त भावांत विकत घेऊन त्यांतून आपला वायदा पुरा करेल, पण सौदा जर मोठा असेल तर, त्या वेळेच्या अनिश्चिततेमुळें काय होईल याची काळजी न करतां विकलेल्या डॉलर्सच्या इतकेच डॉलर्स तो सुमारे, वायद्यांतच खरेदी करेल, व परिस्थिती समतोल ठेवील.

उदाहरणार्थ हमीपत्र उघडल्यानंतर तीन महिन्यानें येणाऱ्या आयातीकरतां बँकेच्या खातेदारानें ६०००० डॉलर्स तीन महिन्यांतील बोलीनें वायद्यांत घेतले म्हणजे बँकेला ते विकावे लागतील. समजा हा व्यवहार करतांना बँकेनें त्याला ४७५ रु. नें हे डॉलर्स विकले तर आयातदाराच्या दृष्टीनें त्याला नक्की किती रक्कम द्यावी लागेल हे कळेल, व

बँकेला ती रक्कम त्यावेळीं आपल्या अमेरिकेतील बँकेच्या पुस्तकात आपल्या खात्यावर ठेवावी लागेल. ही रक्कम कदाचित् त्यावेळीं असणाऱ्या आपल्या शिलकींतून बँक देईल, किंवा सुमारें त्यावेळीं तयार डॉलर्स घेऊन त्यातून ते देऊ शकेल. तयार डॉलर्स ज्यावेळीं बँकेला घ्यावे लागतील त्यावेळीं डॉलर्सचा दर तोच राहील असे नाहीं. तो जर वाढला म्हणजे डॉलर्स जर महाग झाले तर बँकेचें नुकसान होईल. कारण बँकेला डॉलर्स जरी चढत्या भावात घ्यावे लागले तरी गिऱ्हाइकाला मात्र तीन महिन्यापूर्वी ठरवलेल्या वायद्याच्याच भावात विकावे लागतील. याउलट डॉलर्स जर स्वस्त झालेले असतील तरीही गिऱ्हाइकाचा भाव ठरलेला असल्यामुळें तिचा फायदा होईल. पण बँक किंवा दलाल अशा फायद्यातोट्याच्या भरीला न पडता गिऱ्हाइकाला तीन महिन्याच्या वायद्याचे डॉलर्स विकले तर तितक्याच महिन्यांच्या वायद्यात सुमारें तितकीच रक्कम (ती सुमारे ५० ते ६० हजारापर्यंत या उदाहरणात असेल) खरेदी करून अनिश्चितता टाळेल.

विदेशविनिमयाचे वायद्यातील व्यवहारात असा प्रतिसौदा करून, आपले सौदे एकमेकाविरुद्ध गुंतवून आपली स्थिति समतोल ठेवण्याची पद्धत सहसा सर्वच अवलंबितात. याउलट कित्येकदा पुढील परिस्थितीचा अदाज घेऊन, खरेदीच्या सौद्यापेक्षा विक्रीचे सौदे जास्त केलेले असल्यास त्या स्थितीला जादा विक्रीची परिस्थिति (Oversold Position) म्हणतात. याउलट शिल्लक जास्त झाल्यास किंवा विक्रीचे सौदे खरेदीपेक्षा कमी झाल्यास जादा खरेदीची परिस्थिति (Over Bought) समजली जाते. अशी परिस्थिति कुठली आहे हें बघताना हातीं असलेली खात्यातील परकीय चलनाची शिल्लक व एकूण वायद्यात केलेली खरेदी-विक्री, या सर्वांचा एकत्र विचार करावा लागतो. बँका, व खासगी व्यक्ति, संस्था, यांच्या वायद्यातील व्यवहारात फरक हा असतो कीं बँका जशी परिस्थिति समतोल ठेवण्याचा प्रयत्न करतात तशी काळजी करण्याचे खासगी व्यवहारात कारण नसते. वायद्यातील व्यवहाराचा विचार करताना आणखीही एका गोष्टीची म्हणजे छेद व्यवहाराची माहिती देणें इष्ट ठरेल.

**छेद्व्यवहार :**

ज्या वेळेला एकाच चलनाची खरेदी व विक्री अशी एकाच वेळीं केली जाते त्या वेळेला त्या व्यवहाराला छेद (Swap) हें नांव दिलें जातें. अशा व्यवहारांत पौंड, फ्रँक, मार्क्स, अशा चलनांची जरी तयार खरेदी केली तरी त्याविरुद्ध तें चलन लगेच वायद्यांत विकलें जाऊन 'अनिश्चितता' काढून टाकली जाते किंवा, हातीं असलेल्या उपलब्ध चलनांतून विक्री तयार विक्री केली तर उपलब्ध शिल्केंतील घट भरून काढण्यासाठीं तें चलन लगेच वायद्यांत पुढें खरेदी केलें जातें. म्हणजेच अशा प्रकारांतील व्यवहारांत एक व्यवहार 'तयार' (Spot, Ready) असतो व त्याचा परिणाम निष्फळ करण्यासाठीं म्हणजेच त्या व्यवहाराला छेद देण्यासाठीं केलेला व्यवहार 'वायद्यांतील' असतो. छेदव्यवहार हा कसा होतो हें खालील उदाहरणावरून लक्षात येईल.

समजा आजचा मार्क्सचा आंतर बँकिंग विक्रीचा दर १०० रुपयाला ८२.५० आहे व खरेदीचा दर ८३ पर्यंत आहे आणि तीन महिन्यांचे वायद्यांत १०-२० फेनिग्जची कसर आहे. म्हणजे बँक, गिऱ्हाइकाला मार्क तीन महिन्याच्या वायदेव्यवहारांसाठीं ८२.४० ने (८२.५०+०.१० उणे बँकेचा फायदा ०.२०) विकूं शकेल. हेच मार्क्स वायद्यांत विकले तरी त्या व्यवहाराला छेद देण्यासाठीं ती बँक ते आज ८२.५० या दरानें तयार खरेदी करेल. बँकेनें या व्यवहारांत जरी ०.१० नें फायदा केलेला असला तरी तिला दोन गोष्टींचा विचार करावा लागेल. एक म्हणजे त्या गिऱ्हाइकाला जे मार्क्स द्यावयाचे आहेत ते तीन महिन्यानें द्यावयाचे आहेत, तेव्हां ते त्यावेळीं तयार ठेवणें महत्त्वाचें आहे. अर्थात् तयारखरेदींत घेतलेले मार्क्स त्यासाठीं तसेच शिल्लकींत बिनव्याजीं ठेवणें शक्य नाहीं कारण तयारखरेदीसाठीं आधींच रुपयांत रक्कम द्यावी लागल्यानें तेवढ्या रकमेवरचें व्याज उगीचच बुडेल; कारण ज्या गिऱ्हाइकाला वायद्यांत मार्क्स विकले जातील तो ते तीनमहिन्यानींच घेऊन त्याबद्दल रुपये वळते करेल. यावर तोड म्हणून मग बँक हातांत आलेले मार्क्स लगेच तयार

विकून टाकील व त्यासाठी तिला ८२.६० हा दर मिळेल. ह्या व्यवहाराला परत छेद देण्यासाठीं ती बँक वायद्यात मार्क निकत घेईल. या छेद व्यवहारात पूर्वीच्या छेद व्यवहारात जितका फायदा होईल त्यापेक्षा जास्त तोटा होऊन बँकेला चालणार नाहीं. हातात आलेले तयार मार्क निकताना बँकेला बाजारातील ८३ दराऐवजीं एकसमयावच्छेदें व्यवहार केल्यानें त्यापेक्षा कमी दरानेंच म्हणजे ८२.६० या भावानें ते द्यावे लागतील. ८२.५० दरानें तयार खरेदींत घेतलेले मार्क्स ८२.६० दरानें विकताना बँकेला सकृद्दर्शनीं तोटा झाल्यासारखे दिसते. पण वायद्यातील (तीन महिन्याच्या) मार्कच्या खरेदीसाठीं तिला ८२.७० हा दर द्यावा लागेल व एकूण सर्व व्यवहार खालीलप्रमाणें होतील.

| विक्री | | खरेदी | |
|---|---|---|---|
| तीन महिन्याचे वायद्याची गिऱ्हाइकाला | ८२·४० | तयार खरेदी | ८२·५० |
| आतर बँकिंग तयार | ८२·६० | तीन महिन्यातील वायद्याची खरेदी | ८२·७० |

या सर्व व्यवहारात एकूण दोन छेद व्यवहाराची सागड आहे आणि त्यात बँकेला शेवटीं फायदाच कसा होत आहे हें लक्षात येईलच. तयार खरेदी व तयार विक्री व तीन महिन्यातील वायद्यातील खरेदी व विक्री याचा एकमेकाना तिरपा छेद जाऊन बँकेला शेंकडा २० फेनिग इतका फायदा मिळेल. अर्थात असे व्यवहार करताना जितकी रक्कम वायद्यात प्रथम विकली जाईल तितकीच तयार खरेदींत मिळून सपूर्ण छेद जाईल व तीच परत तयार विक्रींत सगळी देऊन त्याबरोबरीची रक्कम, वायद्यातील खरेदींत मिळेल असें सहसा होणार नाहीं. कुठल्याही छेद व्यवहारात असा सपूर्ण छेद जाणें कठीण आहे. तसेंच हे चारी व्यवहार होण्याचें दरम्यान दरात थोडाफार फरक पडून बँकेचा नफा वाढण्याची किंवा तोटा होण्याची शक्यताही आहेच. पण त्याचे तात्पर्य, बँक अनिश्चिततेचा धोका टाळण्याचा व आपली एकूण परिस्थिति जास्तींत जास्त समतोल ठेवण्याचा प्रयत्न करील येवढेच घेतले पाहिजे. अशी परिस्थिती ही समतोल ठेवायची कीं दीर्घ वा ऱ्हस्व

ठेवायची हे बँकेच्या त्या चलनाबद्दलच्या भावी दराच्या अंदाजावर अवलंबून असते. पण बहुधा बँका परिस्थिति चालू ठेवण्याचा (Running a Position) सहसा प्रयत्न न करतां ती, छेद देऊन जास्तींत जास्त समतोल ठेवण्याची पराकाष्ठा करतात.

थोड्या वेळापुरतीच ज्यांना विदेशी चलनाची गुंतवणूक करावयाची असते त्या तऱ्हेचे लोकही असा छेदव्यवहार पत्करतात व 'धोक्याचें स्वरूप' नाहींसें करून टाकतात. एखाद्या बँकेजवळ जर आज पैसे उपलब्ध असले व स्वदेशांत योग्य गुंतवणूक दिसत नसली तर ब्रिटीश ट्रेझरी बिलांत गुंतवण्यासाठीं ती पौंड खरेदी करील व तें बिल कुठल्या तारखेला मुदत बाद होते हें माहीत असल्यानें त्या तारखेच्या सुमारास आपल्या खात्यावर तेवढे पौंड जमा होतील याची खात्री असल्यानें त्या तारखेनंतर ते विकण्यासाठीं न थांबतां, ट्रेझरी बिल घेण्यासाठीं जेव्हां पौंडाची खरेदी केली असेल त्या वेळेलाच ते विकून टाकील. अर्थात् असे पैसे गुंतवतांना इथल्यापेक्षां लंडनमधील व्याजाचा दर जास्त असेल तरच ती असा विचार करील. असा व्यवहार करताना, त्या पौंडाचें कालातरानें मिळणारें भारतीय चलन, खरेदीच्या वेळीं दिलेल्या चलनापेक्षां (व्याजांतील फरक व अन्य खर्चाचा विचार करतां) कमी मिळणार नाहीं याची त्या बँकेला वा व्यवहार करणाऱ्याला अशा छेद-व्यवहारामुळें खात्री मिळेल.

## छेद व गुंतवणूक :

वर सांगितल्याप्रमाणें ट्रेझरी बिलें किंवा अन्य तऱ्हेच्या गुंतवणुकीसाठीं छेदाचा (Swap) व्यवहार केला जातो. तेव्हां त्याला छेद व गुंतवणूक (Swap & Investment) म्हटलें जातें. अशा तऱ्हेच्या व्यवहारांत वर सांगितल्याप्रमाणें एकच विदेशी चलन घेतलें पाहिजे असें नाहीं. भारतीय रुपयांचे, बदली घेणाऱ्यानें पौंड विकत घेतल्यावर, मग त्या पौंडाचे बदली मार्क्सही विकत घेतां येतात. इथें विनिमयनियंत्रणाचा विचार अंतर्भूत नाहीं. ती गुंतवणूक मोकळी होईल तेव्हां या अंदाजानें मार्क्स विकून परत पौंड घेण्याच्या वायद्यांतही व्यवहार करतां येतो.

## छेद व ठेव :

छेदा मधला आणखी एक प्रकार म्हणजे छेद व ठेव ( Swap & Deposit ) होय. या प्रकारात वरील उदाहरणच घ्यावयाचें झालें तर भारतीय बँकेला पौंड हवे असतील तर ती १-६ व १-५ ३१/३२ या दोन दरानें १:१ या प्रमाणात ते घेईल, व त्या पौंडातून ट्रेझरी बिलें विकत घेईल. मात्र त्याबदली द्यावयाचे रुपये ती ज्या बँकेकडून ( ब्रिटीश ) पौंड लंडनमध्यें मिळतील तिच्याच भारतातील आपल्याकडे असलेल्या खात्याला जमा करील. हे रुपये त्या बँकेला अर्थात् हवे असतील तरच ती तसा व्यवहार करेल व ते जमा रुपये वापरायला अर्थात त्या बँकेला मोकळीक राहीलच. त्यावेळेलाच ती भारतीय बँक वायद्यात पौंड विकून टाकील. त्यासाठीं ती पौंडापाठीमागें कदाचित् काहीं रुपये कमी घेण्याला तयार होईल. म्हणजे १ लाख पौंडाचा हा व्यवहार जर आपण गृहीत धरला तर सुरवातीला ती रुपये १३३४४९२-७० न.पै. ठेव म्हणून ब्रिटीश बँकेच्या भारतातील व्हॉस्ट्रो खात्याला जमा करील पण निर्यात किंवा ट्रेझरी बिलाचे पौंड परत लंडनमध्यें मिळाल्यावर रुपये १३३४२६०।८० न.पै. त्या बदली घेण्याची वायदा विक्री करेल. अर्थात् हे करताना लंडनमध्यें पौंड गुंतवले तर व्याजांत फरक पडून या वायद्यात झालेल्या तोट्यापेक्षा जास्त नफा मिळेल अशी खात्री झाल्यावरच ती हा व्यवहार करेल.

## व्यवहार्य दिनांक ( Value Date ) :

विदेश चलनातील व्यवहारात आणखी एक बाब अतर्भूत होते. ती म्हणजे व्यवहार्य दिनाक ( Value Date ). हल्लीं बहुतेक देशातील महत्त्वाच्या शहरातून हवाई मार्गानेंच टपाल पोचवलें जातें. ही गोष्ट खरी असली तरी अंतर्गत दळणवळणापेक्षा त्यात जास्त वेळ लागणार हें उघड आहे. पूर्वी जेव्हा हवाई वाहतूक सर्रास नव्हती, तेव्हा एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं सूचना जाण्यासाठीं वेळ लागे. अशा वेळीं आपल्याला पाहिजे तेव्हां रकमा जमा नावें व्हाव्यात म्हणून आगाऊ सूचना देऊन अशा तारखा सांगितल्या जात. त्यामुळें व्यवहार एका दिवशीं ठरला किंवा केला

गेला तरी त्याची व्यवहार्य तारीख म्हणजे ज्या तारखेला अशा रकमा जमा नावें होत, किंवा व्हायच्या असत त्या तारखा वेगळ्या असत. त्याचप्रमाणें कित्येकदां व्यापारी बिलांच्या बाबत रक्कम जमा झाली तरी सर्व सोपस्कार होईपर्यंत प्रत्यक्ष जमा नावें व्यवहार करीत नसत व नाहींत. अशा वेळीं रक्कम मागाहून जमा नांवे केली तरी व्याजाचे हिशोबासाठीं ती त्या मागील दिवशींच खात्यावर मांडली गेली असें समजतात. या तारखेला 'व्यवहार्य दिनांक' म्हटलें जातें. ज्या वेळेला तारेनें पैसे पाठवले जातात, तेव्हां दोन्ही ठिकाणच्या खात्यांत एकाच दिवशीं व्यवहार दिसतात. उदाहरणार्थ—मुंबईस १५ तारखेला 'अ' बँकेनें कांहीं पौंड 'ब' बँकेकडून घेतले व तिला ते आपल्या लंडनमधील 'क' बँकेच्या खातीं तारेने जमा करण्यास सांगितले तर 'ब' बँक तशी व्यवस्था करील. 'अ' बँक आपल्या खात्यांतून ते व्यवहार मांडतांना 'ब' बँकेला रिझर्व बँकेवरील चेक देईल व रिझर्व बँक खातींजमा व परदेशी बँकखतावणी खात्यांत ती रक्कम नांवें मांडेल. पंधरा तारखेलाच ती तार लंडनला पोचल्यावर ती विदेशी बँकही त्याच दिवशीं ते पौंड 'अ' बँकेच्या खात्यावर जमा करेल. अशा व्यवहारामुळें १५ तारखेला 'अ' बँकेची भारतीय रुपयांतील शिल्लक कमी झाल्यानें त्या रकमेवर तिला व्याज मिळणार नाहीं. पण त्याच तारखेला लंडनमध्यें मात्र त्या रकमेवर व्याज ( तें मिळत असल्यास ) चालू होऊन 'अ' बँकेचे प्रत्यक्ष असे कांहींच नुकसान होणार नाहीं. पण समजा अशी रक्कम तारेने जमा करण्याऐवजीं हवाई टपालानें जमा करण्याची 'अ' बँकेनें 'ब' बँकेला अनुज्ञा दिली तर प्रत्यक्ष हातांत पैसे पडल्या खेरीज 'ब' बँक कांहीं ( आपल्या शिल्लकींतून ) असे पौंड देण्याची 'क' बँकेला आज्ञा पाठवणार नाहीं; म्हणजे 'अ' बँकेचें तेवढ्या भारतीय रुपयांवरील व्याजाचें नुकसान होईल 'ब' बँकेचें टपाल समजा 'क' बँकेला १८ तारखेला मिळालें तर 'क' बँक ते पौंड 'अ' बँकेचे खात्यावर अठरा तारखेला जमा करील व त्या दिवसापासून त्या रकमेवर व्याज चालू करेल. म्हणजे 'अ' बँकेचे तीन दिवस पैसे बिनव्याजी राहिले असा त्याचा अर्थ होईल. ( या रकमेचें व्याज 'ब' बँकेला रक्कम

आधीं जमा मिळाल्यानें अप्रत्यक्ष मिळूं शकेल व याचा दृश्य परिणाम म्हणजे हवाई दर (Mail Transfer) 'अ' बँकेच्या बाजूनें झुकता राहील. किंवा थोडक्यांत म्हणजे तारेचा दर (T. T. Rate) स्वस्त राहील.)

दुसरें उदाहरण घ्यावयाचें झालें तर 'अ' बँकेचे हमीपत्राखालील कांहीं कागदपत्र 'ब' बँकेनें १५ तारखेला ब्रिटनमधील निर्यातदाराकडून स्वीकारले तर हमीपत्रानुसार त्याला पैसे देण्यासाठीं 'ब' बँक ती रक्कम 'अ' बँकेच्या तिच्या पुस्तकांतील खात्यावर लगेच पैसे नांवें टाकून दस्तऐवज 'अ' बँकेकडे पाठवून देईल. 'अ' बँकेला ते कागदपत्र पोंचेपर्यंत आपल्या खात्यावर कांहीं रक्कम नावें पडली आहे याची कल्पना असणारच नाहीं. त्यामुळें त्या बँकेच्या खतावणींत विदेशी बँकेच्या नांवाखालीं असलेली शिल्लक जास्त दिसेल व व्याजाचा हिशोब तपासण्यासाठीं काढलेले कच्चे जास्त दिसतील. ते कागदपत्र हातांत पडल्यावर ही परिस्थिति नीट करण्यासाठीं 'अ' बँक जरी अठरा तारखेला विदेशी खात्यावर पैसे जमा करील, तरी त्या समोर व्यवहार्य तारीख पंधरा म्हणजे ज्या तारखेला विदेशांत तिच्याखातीं नांवें रक्कम पडली असेल ती घालेल व खातेदाराच्या नांवावर (आयातदाराच्या खातीं) ती रक्कम १८ तारखेला नांवें पडली तरी व्यवहार्य तारीख पंधरा दाखवून त्याचें खातें कॅश क्रेडिट असल्यास तेवढें कच्चे वाढवून घेईल. व्यवहार्य तारखांचा हिशोब योग्य होण्यासाठीं, पुढें करावयाचा एकादा व्यवहार आधींच कळवून ठेवूनही तो वेळेवर होईल याची बँक खबरदारी घेऊ शकेल. समजा पंधरा तारखेला आपल्या खात्याला रक्कम नांवें टाकून ती दुसऱ्या बँकेला द्यावयाची असेल तर 'क्ष' बँकेला व्यवहार्य पंधरा तारखेला रक्कम द्यावी अशी सूचना ती बँक आपल्या बँकेला दहा तारखेलाच देऊं शकेल. अशारीतीनें ड्राफ्ट काढल्यावरही एकादी बँक विदेशस्थ बँकेच्या खात्यांत खतावणींत लगेच रक्कम जमा करीत असली तरी कच्च्यांसाठीं ती रकम परदेशांत ज्या दिवशीं ड्राफ्टची रकम नांवें पडेल तीच तारीख व्यवहार्य धरली जाईल. व्यवहार्य दिनांकाचा (Value Dates) अर्थ हा असा लावला जातो व त्याचा उपयोग खात्यांचा मेळ घालतांना (Reconciliation) होतो.

**विदेशस्थ व स्वदेशस्थ खातीं** (Nostro & Vostro Accounts): एकादी बँक जेव्हां विदेशी बँकेंत आपले विदेशी चलनांत खातें ठेवते तेव्हां त्याबाबत स्वतःच्या पुस्तकांत त्या विदेशी बँकेचे नांवानें जें स्वतात्रणी खातें काढते त्याला विदेशस्थ खातें (Nostro A/C) असें संबोधतात. या उलट विदेशी बँकेनें जर आपल्याकडे स्वकीय म्हणजे (तिच्या दृष्टीनें परकीय) चलनांत खातें ठेवलें तर त्या खात्याला स्वदेशस्थ (Vostro A/C) खातें असें संबोधिलें जाईल. नॉस्ट्रो म्हणजे आमचें तुमचेकडे असलेलें व व्हॉस्ट्रो म्हणजे तुमचें आमच्याकडे असलेलें खातें होय. महाराष्ट्र बँकेचे मिडलंड बँकेकडे असलेल्या खात्यांचे व्यवहारासाठीं मिडलंड बँकेच्या नांवानें महाराष्ट्र बँकेच्या पुस्तकांत असलेलें खातें हें विदेशस्थ खातें होय. तर मिडलंड बँकेचें महाराष्ट्र बँकेच्याच पुस्तकांत असलेलें रुपयांतील खातें हें स्वदेशस्थ खातें होय. अशीं खातीं दोन्ही बँका एकमेकां-कडे जेव्हां परस्पर संबंधासाठीं ठेवतात, तेव्हां कुठल्या खात्यांतून व्यवहार होत आहे हें कळण्यासाठीं या नांवाचा उपयोग होतो. उदाहर-णार्थः—महाराष्ट्र बँक व मिडलंड बँक यांचीं एकमेकांकडे खातीं असलीं तर एकादा व्यवहार करतांना महाराष्ट्र बँक ती रक्कम लंडनमधील खात्यावर नांवें लिहायला सांगेल किंवा मिडलंड बँकेच्या नांवाच्या पुणें-मुंबईंतील खात्यावर ती रक्कम जमा करील, व तसें त्या बँकेला कळवील. या दोन्ही बँकांपैकीं एक बँक जेव्हां तिऱ्हाईताच्या खात्यासंबंधीं व्यवहार करते तेव्हां त्या खात्याला (Loro A/C) खातें असें संबोधतात. महाराष्ट्र बँकेनें मिडलंड बँकेला जर आंध्र बँकेच्या खातीं कांहीं रक्कम जमा करायला सांगितली तर आंध्र बँकेच्या खात्याचा ती त्रयस्थ खातें-त्यांचे तुमच्याकडे असलेलें खातें-असा उल्लेख करील. विदेशस्थ किंवा नॉस्ट्रो खातीं विदेशी चलनांत असतात. तर स्वदेशस्थ किंवा व्हॉस्ट्रो खातीं स्वदेशी चलनांत असतात हें उघड आहे. वेगवेगळ्या देशांतून अशीं जीं खातीं (Nostro) ठेवलीं जातात, त्यावरच अधिकृत बँकेतर्फे ड्राफ्ट, किंवा मेल ट्रॅन्सफर्स दिल्या जातात. तसेंच विदेशांत वसुलीसाठीं पाठवलेल्या बिलांची रक्कमही अशा

खात्यांतून जमा करण्याच्या सूचना बँक देते. जिथें जशी शिल्लक ठेवणें रोजच्या बदलत्या व्यवहारानुसार जरूर वाटतें, त्याप्रमाणें खात्यात अशी रक्कम बँका जमा करतात किंवा त्या खात्यावर केवळ, मेल ट्रॅन्स्फर किंवा ड्राफ्टनें रक्कम नावें टाकतात. अर्थात् हीं खातीं अधिकृत बँकेच्या व्यवहारात उलट्या बाजूनें दाखविलीं जातात. म्हणजे विदेशी बँकेंत जेव्हा खात्यावर जमा शिल्लक असेल तेव्हा अधिकृत बँकेच्या पुस्तकात ती रक्कम रुपयात रूपातरित करून नावें बाजूला दिसते. कारण बँकेच्या नावें बाजूच्या नोंदी ह्या जिंदगी व येणें (Assets) असतात. अधिकृत बँकेच्या नॉस्ट्रो खात्यात भारतीय रुपये व विदेशी चलन अशा दोन्ही प्रकारचे हिशेब ठेवावे लागतात. या खात्याची रोजची परिस्थिति बघूनच सर्व व्यवहार केला जातो. ही परिस्थिति कशी बघितली जाते याचा इथेंच थोडाच खुलासा करणें हे जरूर आहे.

अधिकृत बँकेचें परदेशातील खातें हें परदेशी चलनात असल्यानें तिथें शिल्लक नसताना काहीं व्यवहार नकळत होणार नाहींत व नावें रक्कम खात्यावर दिसणार नाहीं, याची काळजी बँकेला घ्यावी लागते. अर्थात् हें करताना बँकेला शिल्लक खात्यावर फार मोठी रक्कम उगीच बिनव्याजी रहाणार नाहीं याचीही काळजी घ्यावी लागतेच. बँकेनें काढलेले ड्राफ्ट जरी विदेशी बँकेला देखाड होऊन लगेच वटवले जात नसले तरी ते अधिकृत बँकेच्या पुस्तकातील ( नॉस्ट्रो ) खात्यात लगेच दाखवले जाऊन तितकी शिल्लक कमी दाखवतात. हमीपत्राखालीं काहीं कागदपत्र आले कीं ती रक्कमही अशीच लिहिली जाते. वस्तुत. ती, कागदपत्र यावयाचे आधींच ५–७ दिवस विदेशातील खात्यात नावें पडलेली असते. तसेंच वेळोवेळीं घेतलेल्या चलनाची देवघेव ज्या ठराविक तारखेला होते, त्या त्या दिवसाची नोंदही बँकेंतील चलन विक्रेता करतो व आपली परिस्थिति ( position ) समतोल ठेवण्याचा प्रयत्न करतो. या नोंदी करताना प्रत्यक्ष ज्या तारखाना विदेशातील बँकेच्या खात्यात रकमा जमा नावें होतात त्याच्या तारखाही नॉस्ट्रो खात्यात व्यवहार्य दिनाक ( Value Date ) म्हणून माडल्या जातात.

**कोलांटी** (Arbitrage) :

अधिकृत बँका किंवा विदेशी चलनांत व्यवहार करणारे लोक त्यांतल्या धोका किंवा अनिश्चितता कशा तऱ्हेनें टाकतात ते अन्यत्र सांगितलेंच आहे. त्याखेरीज एकाच चलनाची किंवा एकाहून अधिक चलनांची ही एकाच वेळीं वायद्यात व तयार अशी उलटी सुलटी खरेदी विक्री करून त्यांत थोडाफार फायदाही मिळवता येतो. अर्थात् जिथें विनिमय नियंत्रण असेल तिथें असे व्यवहार करतां येणार नाहींत. पण जिथें परदेशी चलनातील मुक्त व्यवहार होऊ शकतात, अशा केंद्रातून असे व्यवहार होतात. शेअर्सचे व्यवहारात जसा एकसमयावच्छेदेंकरून असा क्रयविक्रय व्यवहार होतो, त्याच प्रमाणें विदेशविनिमयातही तसा व्यवहार होऊ शकतो. मात्र एकच चलन असल्यास त्याचे व्यवहार दोन वेगवेगळ्या ठिकाणीं केले जातात किंवा वेगवेगळ्या भाव परिस्थितींत केले जातात, अथवा जास्त चलनें असल्यास एकमेकांचे बदली परिमाणातील फरकामुळें ते केले जातात. ज्या वेळेला या प्रकारांत एकाचठिकाणीं व्यवहार होतो तेव्हा त्याला साधी कोलांटी (Direct or Simple Arbitrage) म्हटलें जातें, पण एकाहून जास्त व्यवहार झाल्यास ती संयुक्त कोलांटी (Compound Arbitrage) होते.

एकच वस्तु वेगवेगळ्या ठिकाणीं वेगवेगळ्या भावांत विकत मिळत असेल व विकतां येत असेल तर त्या भिन्न दरांचा फायदा घेऊन जास्त दर असेल तिथे ती विकायची व कमी भाव असेल तिथें तीच खरेदी करून परत पूर्व स्थितीला यायचें व तसें होत असताही दोन्ही भावांतील फरकाचा फायदा घ्यावयाचा, हें कोलांटीचें (Arbitrage) मूलतत्त्व होय. आणि शेअर्स प्रमाणेंच चलनांतही असे दोन ठिकाणीं दोन दर असणें, त्या त्या ठिकाणच्या मागणी पुरवठ्यामुळें शक्य असल्यानें, विदेश व्यवहारातील निष्णात दलाल, विनिमय नियंत्रण नसेल तर त्याचा फायदा घेऊं शकतो. कित्येकदां एका चलनाचे दुसऱ्या चलनातील रूपांतराचे दरांतही त्याच चलनाचा ज्या

दोन ठिकाणीं व्यवहार होतो त्या दोन ठिकाणांत फरक होतो. लंडनमध्यें एका पौंडाला २.८० डॉलर्सचा दर दिला जात असला तरी न्यूयॉर्कला डॉलर पौंडाचा दर तोच असेल असें नसतें. किंबहुना तो तसा नसण्याचीच शक्यता असते. (अर्थात् त्यांत फारसा फरक असणार नाहीं. कारण अशी खूप तफावत आढळल्यास दुसऱ्या ठिकाणीं त्या ठिकाणच्या चलनाला मागणी वाढून तो दर पक्का होऊं लागेल व ती तफावत हळूहळू कमी होत दोन्ही ठिकाणचे दर सारखेच होतील). न्यूयॉर्कला जर २.७९ डॉलर्सना एक पौंड मिळत असेल तर कुठल्याही व्यापाऱ्याला लंडनमध्यें १०० पौंडाचे २८० डॉलर्स घेतां येतील. हेच २८० डॉलर्स न्यूयॉर्क बाजारांत विकल्यास १०० पेक्षां थोडे जास्त पौंड मिळतील. हा व्यवहार सरळ कोलांटी झाली. पण समजा भारतीय शंभर रुपयांना ८२॥ मार्क मिळत असले व ७॥ पौंड मिळत असले पण पौंडचा मार्कच्या रूपांतराचा दर ११-१० असला तर शंभर रुपयांना ८२॥ मार्क सरळ घेण्यापेक्षां १०० रु. चे ७॥ पौंड घेऊन त्या पौंडाचे मार्क घेतले तर ८३-२५ मार्क मिळतील. म्हणजेच ०-७५ मार्क इतका फायदा होईल. या उदाहरणांत पौंडाची खरेदी विक्री (तितक्याच) वेगवेगळ्या दोन ठिकाणीं होते म्हणून हें संयुक्त कोलांटीचें (Compound Arbitrage) उदाहरण म्हणतां येईल. येथें मुंबई हॅंबुर्गच्या समक्ष दरांपेक्षां मुंबई लंडन व लंडन हॅंबुर्ग यांच्या अन्योन्य संबंधित दरांत फायदा दिसतो. रुपयाचे मार्क घेण्याऐवजीं रुपयाचे पौंड, पौंडाचे फ्रॅंक्स, फ्रॅंक्सचे क्रोनर व क्रोनरचे मार्क असाही रूपांतराचा व्यवहार वरीलप्रमाणें फायद्याचा होत असेल तर करतां येईल.

असे व्यवहार करतांना एकाच चलनाचे दोन अन्य चलनाशीं रूपांतराचे जे दर असतात, त्यांची एकमेकांत तुलना करावी लागते. अर्थात् हे संबंधित दर विचारांत घेतांना टेलिफोन किंवा तारेचा खर्च दोन्ही ठिकाणीं खरेदी विक्रीचेवेळीं द्यावी लागणारी दलाली विचारांत घेऊनच फायद्याचा हिशेब करावा लागेल. म्हणूनच असा व्यवहार खूप मोठ्या प्रमाणावर केला तरच फायद्याची शक्यता असते.

खळी पद्धत :

कोलांटीच्या क्रयविक्रयाच्या व्यवहारांत असे अन्योन्य दर काढण्याचे ां एका सांखळी पद्धतीचा उपयोग करतात. ती खालीलप्रमाणें असते.

आपल्याला जें उत्तर हवें असतें त्यासाठीं डाव्या बाजूला प्रश्नचिन्ह र मग ओळीनें सर्व दरांचे अन्योन्यसंबंधांचे दुवे जुळवले कीं ही सांखळी र होते. वरील उदाहरण सांखळीपद्धतीनें मांडावयाचें झाल्यास खालील- णें मांडतां येईल.

किती मार्क्स = १०० रुपये.
जर १०० रुपये = ७॥ पौंड
जर एक पौंड = ११·१० मार्क.

अशी सांखळी सोडवण्यासाठीं उजव्या बाजूच्या सर्व घटकांचा गुणा- करून त्याला डाव्या बाजूच्या सर्व घटकांच्या गुणाकारानें भागिलें कीं र येतें. वरील सांखळींत

$\frac{१००\times७.५\times११.१०}{१००\times१}$ असा गुणाकार भागाकार केला कीं ८३.२५ उत्तर मिळूं शकतें. ही सांखळी वेगवेगळ्या दराच्यातील फरकामुळें क कोलांटीपद्धतीचा, क्रयविक्रय केला तर खालील उदाहरणांत तां येईल.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| मुंबई | — | झुरीक | — | ९० फ्रँक्स |
| मुंबई | — | न्यूयॉर्क | — | ४७२ रुपये |
| न्यूयॉर्क | — | झुरीक | — | ४२६ फ्रँक्स |

अशा साखळीपद्धतीचा उपयोग विदेशविनिमयांतील अनेक व्यव- ांत करतां येतो. दोन देशातील विनिमयाच्या टांकसाळ दरांचें ( Mint of Exchange ) अंकगणित करतांनाही ही पद्धत उपयोगी पडते. अशा खळी पद्धतीचा फायदा कोलांटीच्या व्यवहाराचे वेळीं दिसून येतो. खालील हरणावरून त्याची कल्पना येईल.

डेन्मार्कमध्यें डॅनिश क्रोनर आणि पौंड व मार्क यांचे अन्योन्य भाव २६ सप्टेंबर १९६१ रोजीं खालीलप्रमाणें होते.

१ पौंड = १९·३८५ डॅनिश क्रोनर

१०० मार्क्स = १७२·४० डॅनिश क्रोनर

पण जर्मनींत हॅंबुर्ग येथें पौंड आणि मार्क यांचा दर १ पौंड = ११.२४५२५ मार्क असा होता. अशावेळीं एकाद्या डॅनिश बॅंकेनें क्रोनर विकून त्याबदली मार्क्स खरेदी करण्याऐवजीं क्रोनर विकून पौंड खरेदी करणें व मग पौंड विकून मार्क खरेदी करणे जास्त फायद्याचें पडेल; कारण अशा पद्धतीनें जो क्रोनर व मार्क यांचा दर मिळतो तो प्रत्यक्ष क्रोनर मार्कच्या दरापेक्षा फायदेशीर पडतो. कारण अशावेळीं १०० डॉ. मार्क खरेदी करतांना १७२.४० इतके क्रोनर द्यावे लागण्याऐवजीं १७२.३८४० इतकेच क्रोनर द्यावे लागतात. हा फरक दिसण्यांत जरी अगदीं लहान असला तरीही ज्यावेळीं दहा लाख मार्कची खरेदी करावयाची असते त्यावेळीं त्या व्यवहारांत अगदीं सहजपणें १६० क्रोनरची बचत होते. अशा आंतरराष्ट्रीय व्यवहारांत वेगवेगळ्या ठिकाणच्या दरांत फारसा फरक असत नाहीं. कारण हीं सर्व शहरें टेलिफोननें व टेलेक्स पद्धतीनें एकमेकांशीं जोडलीं गेलीं असल्यानें एकाद्या ठिकाणच्या दरांत जर बरीच तफावत असली तर सर्व बाजूंनीं तिथें मागणी येऊं लागते व अशी दरांतील तफावत तिथल्या मागणी व्यवहार करणारांचे लगेच लक्षांत आल्यावर त्यांनीं दर बदलल्यानें लगेच नाहींशी होऊं लागते.

---

# इतिहास व पूर्वपीठिका :

५

विदेशविनिमयाचे व्यवहार कसे होत असतात याचें आतापर्यंत थोडक्यांत विवेचन आलेलें आहे. पण असा व्यवहार करतांना राष्ट्राच्या एकूण परिस्थितीकडे जर कुणी बघितलें नाहीं तर त्याच्या चलनावर परिणाम होण्याची शक्यता असते. म्हणूनच विदेशविनिमयाचा व्यवहार त्यातील निगडित शक्तींच्या मुक्त खेळांवर सोडण्याऐवजीं नियमित करणें आवश्यक आहे असा नवीन विचारप्रवाह विसाव्या शतकात सुरू झाला. एकोणिसावें शतक संपेपर्यंत जें औद्योगीकरण झालें त्यायोगें काहीं राष्ट्रांतच औद्योगिक क्रांति झाली होती. हीं राष्ट्रेंच जगांतली बरीच निर्यात करीत होतीं. त्यांच्या साम्राज्यविस्तारामुळें त्यांना हवें ते विक्रीचें क्षेत्रही हातांत उपलब्ध होते. त्यामुळे एकमेकांमध्यें फारशी स्पर्धा नव्हती. पण विसाव्या शतकांत पहिल्या महायुद्धाचा भडका उडाल्यानंतर या विकसित राष्ट्रांतच एकमेकांबद्दल स्पर्धा सुरू झाली; अविकसित राष्ट्रें हळूहळूं विकासाकडे जाऊं लागलीं, आणि विद्युत् शक्ति व तत्सम अनेक क्रांतिकारक शोधांमुळें, गरजांत व उत्पादनांत व त्यामुळें आयातनिर्यातीचे क्षेत्रांत बरेच बदल झाले. महायुद्धाच्या अवाढव्य खर्चाच्या वोजांमुळेंही या विदेश विनिमयाचे व्यवहारांबाबत वेगळे विचार निर्माण झाले. त्यातच सन १९२९ ची मंदीची प्रचंड लाट अनेक राष्ट्रांचे डोक्यांवरून गेली, जुन्या अवमूल्यनाच्या वा अन्य उपायाऐवजीं नवीन परिणामकारक उपाय अत्यावश्यक वाटूं लागले. नियमित (Regulated) विदेशविनिमयाच्या कल्पनेनें बरेंच मूळ धरलें. अनेक राष्ट्रांनीं त्याची कांस धरायला सुरवात केली. अविकसित राष्ट्रांना तर आपल्या विकासाचे दृष्टीनें अशीं संरक्षणें असणें वरदान वाटूं लागले. विनिमयनियंत्रणाचा पुरस्कार सर्वत्र होऊं लागला,

त्यामुळें, आज जगात आतरराष्ट्रीय चलननिधीच्या तत्त्वाप्रमाणे देखील परत पूर्वीप्रमाणें खुला अनियंत्रित व्यापार व विदेशविनिमयाचा व्यवहार सुरू व्हावा असें सर्वमान्य झालें असलें, तरी व्यवहारात बहुतेक देशातून विनिमयनियंत्रणच चालू असल्याचें दिसतें.

विनिमयनियंत्रणाला जर्मनीनें सन १९३० नतर बरीच चालना दिली. युद्ध खडणीच्या रकमेच्या फेडीमुळें जर्मनीवर पहिल्या महायुद्धानतर बराच ताण पडत होता. प्रदानतुला समतोल राखणें तिला बरेंच कठीण जात होतें. स्थिर सरकार ही वस्तु तिथें दुर्मिळ होऊ लागली होती. जनतेचा 'मार्क' चलनावरील विश्वास कमी होऊ लागला होता. मार्कची किंमत व्यवहाराचे दृष्टीने जास्त (Overvalued) वाटत होती. अशावेळीं विदेश चलन व्यवहारावर नियंत्रण हाच मार्ग जर्मनीला अवलंबावा लागणें अपरिहार्य होतें. सन १९३१ मध्यें जर्मनीनें चोखाळलेल्या मार्गावर व नतरच्या नाझी राजवटीनें आणलेल्या नियंत्रणावर राजकीय दृष्टीनें किंवा अन्य पूर्वग्रहामुळें अनेकानीं जरी कडक टीका केली होती तरी पण फ्रँक चाईल्ड वा तत्सम अन्य त्रयस्थ निरीक्षकाचें मत, तीं नियंत्रणें अत्यावश्यक होतीं असेंच आहे. त्यामुळेच तर अवघ्या ९ वर्षांत जर्मनीचें सामर्थ्य बरेंच वाटलें. विदेशविनिमयाच्या नियंत्रणासाठीं जे वेगवेगळे प्रकार अवलबिले जातात ते साधारणपणे खालीलप्रमाणें असतात.

## नियंत्रणाचे विविध प्रकार :

१ ) पहिल्या प्रकारात विदेशविनिमयाचा सर्व व्यवहार सरकारच्या हुकुमतीखालीं येतो व कुठलेही विदेशी चलन विकत घेणाराना तें सरकारकडून किंवा सरकारनें नेमलेल्या अधिकृत प्रतिनिधीकडून घ्यावें लागतें. तें विकताना असें चलन देणें अत्यावश्यक आहे याची सरकार खात्री पटवून घेतें विदेशी चलनाबाबतचे भाडवली व्यवहारावर तर नियंत्रण येतेंच, पण त्याचवेळीं अशा प्रकारात विनिमयनियंत्रणाचे बरोबर व्यापारनियंत्रणाचा मार्गही स्वीकारला जातो, व राष्ट्राला आवश्यक अशाच वस्तूच्या आयातीस परवानगी दिली जाते व त्यासाठीं आयात परवाने दिले जातात. चैनीच्या

वस्तूंची आयात किंवा मजेसाठीं प्रवास अशा बाबींसाठीं चलन उपलब्ध केलें जात नाहीं. आयातींत दृश्य व्यापारी वस्तूंप्रमाणें अदृश्य अशा सेवांचा ( वाहतूक, विमा वगैरे ) ही अंतर्भाव केला जातो. कांहीं राष्ट्रांत ह्या दोन्ही नियंत्रणखात्यांचा समन्वय असतो तर कांहीं ठिकाणीं व्यापारनियंत्रणाचा व विनिमयनियंत्रणाचा मेळच आढळून येत नाहीं व परिस्थिति जास्तच बुचकळ्यांत टाकणारी ठरते.

या प्रकारांत ज्याचेजवळ परकीय चलन असतें किंवा ज्यास अशा चलनावर अधिकार मिळतो त्याला त्याचा परस्पर व्यवहार करतां येत नाहीं. तर ते सर्व सरकारच्या किंवा अधिकृत प्रतिनिधींच्या हवालीं करावें लागतें. तसेंच सरकारी अनुमतीखेरीज अन्य चलनांतील खातीं कुणालाही ठेवतां येत नाहींत व संमत खातेदारांना अशा खात्यांचे हिशेब द्यावे लागतात.

२ ) या प्रकारात वेगवेगळ्या विदेशी चलनांचे स्वकीय चलनांशीं असावयाचें बदली परिमाण ठरवलें जातें व त्या राष्ट्रांतील किंवा अन्य राष्ट्रांतील व्यापाऱ्यांना त्या दरानेंच खरेदी विक्री करावी लागते. कित्येकदां आयातीसाठीं एकाच चलनाचे वेगवेगळ्या वस्तूसाठीं वेगवेगळे चलनपरिमाण ही ठरवलें जातें. मागणी व पुरवठा यांचा याबाबतचा संबध तोडण्यात येतो व चलन अनेकदां ऊर्ध्वमूल्य (Over-valued) परिस्थितींत ठेवले जातें.

३ ) या प्रकारांत दोन राष्ट्रांत करार करून विदेशविनिमयाची खरेदी-विक्री व्यापाऱ्यांमध्यें होण्याऐवजीं, दोन सरकारांचीं एकमेकांकडे मध्यवर्ती बँकेतर्फे खातीं ठेवलीं जातात व जमा नांवें सर्व व्यवहारांची व आयात-निर्यातीसाठीं झालेल्या तसेंच वैयक्तिक व्यवहारासाठीं, सेवाचे व्यवहारासाठी व भांडवली व्यवहारासाठीं अशा झालेल्या जमा नांवे व्यवहारांची--त्यांत नोंद होते. अशा प्रकारांत वैयक्तिक देवघेवीचें स्वरूप राष्ट्रीय देवघेवीचा आकार घेतें. अशा कराराचें स्वरूप हें खालीलप्रमाणें असतें. अशा राष्ट्रांतील करारान्वयें झालेल्या संमत आयातीबद्दल आयातदाराकडून स्वदेशी चलन घेऊन ती रक्कम त्या आयातदाराचे देशाची मध्यवर्ती बँक तिच्याकडे असलेल्या

दुसऱ्या निर्यातदाराच्या राष्ट्राच्या बँकेच्या खात्यांत जमा करते. तिकडे ती बँक त्याच्या बरोबरीची रक्कम स्वतःचे चलनांत निर्यातदाराला देते. इतर व्यवहारांचे पोटींही दुसऱ्या राष्ट्राची बँक आपल्या नागरिकांकडून स्वतःचे चलनांत विदेशी चलनाइतक्या बरोबरीची रक्कम वसूल करून घेते व अन्य राष्ट्राच्या मध्यवर्ती बँकेचे खात्यांत ती जमा करते. ठराविक मुदतीनंतर त्या खात्यांच्या वजाबाकीनंतर जमा नावें रकमेची पूर्तता दोन्ही बँका ( राष्ट्रें ) करारांत ठरलेल्या अटीनुसार करतात. थोडक्यांत क्लिअरिंगच्या तत्त्वावरच ही व्यवस्था केली जाते. हल्लीं बऱ्याच राष्ट्रांकडून असे परस्पर विनिमयाचे करार केले जातात. या पद्धतींत पूर्वींच्या प्रत्यक्ष विनिमयाचेंच ( Barter ) तत्त्व सामुदायिक रीत्या अवलंबिलें जातें, पण त्यांत कित्येकदां व्यापारांवर अनेक प्रकारचीं अप्रिय बंधनें पडतात हें उघड आहे.

४ ) कांहींवेळां विनिमयनियंत्रणांत परकीय नागरिकांचीं त्या राष्ट्रांत असलेलीं खातीं अडकवलीं (Blocked) जातात व हें चलन विशिष्ट अटींखेरीज मुक्त केलें जात नाहीं. त्यामुळें कित्येकदां अशा शिल्की रकमांची कमी किंमतीला अनधिकृत रीत्या चोरटी विक्री केली जाते. परकीय नागरिकांचे त्या राष्ट्राचे कांहीं कर्जरोखे, शेअर्स असल्यास त्यांच्या तबदिलीच्या व्यवहाराला किंवा विक्री केल्यास विक्रीच्या रकमेचे विदेशी चलनांतील रूपांतराला परवानगी दिली जात नाहीं. म्हणजेच ते कर्जरोखे शेअर्सही अप्रत्यक्षपणें अडकवले जातात.

५ ) कांहीं वेळां विनिमयनियंत्रण हें वरील अनेक मार्गांनीं प्रत्यक्षपणें व्हावयाचे ऐवजीं अप्रत्यक्ष व्यापारनियंत्रणाचे द्वाराही केलें जातें. आयातीला प्रतिबंध करण्यासाठीं कित्येकदां जबर जकात बसवली जाते. उद्देश हा कीं आयात झालेल्या मालाची किंमत खूप वाढून लोकांची तो घेण्याची प्रवृत्ति कमी व्हावी. या उलट निर्यात वाढावी म्हणून वेगवेगळ्या प्रकारची मदत, सूट ( Subsidy ) वगैरेही दिली जाते. युद्धानंतर अनेक राष्ट्रांतून निर्यातीला उत्तेजन मिळावें म्हणून निर्यातदारांचे संरक्षणासाठीं निर्यातविमा देण्याची पद्धतही त्याचसाठीं निघाली. असे निर्यातविमे देण्यासाठीं हल्लीं अनेक राष्ट्रांतून सरकारी प्रवृत्ति वाढली आहे. हें खातें पुष्कळदां सरकारतर्फे स्वतः किंवा

अन्यविमा कंपनी मार्फत चालवलें जातें व निर्यातदाराला अनेक प्रकारचें संरक्षण सुमारें ८५ ते ९० टक्क्यापर्यंत दिलें जातें. त्यांत खालील संरक्षणांचा समावेश होऊं शकतो.

## निर्यात विम्यापासून मिळणारें संरक्षण :

१ ) ज्यांवर निर्यातदार किंवा आयातदार यांचा ताबा नसेल अशा उद्भवणाऱ्या सर्व अकल्पित अडचणी,

२ ) माल मिळाल्यानंतर सहा महिन्यांत आयातदाराची पैसे देण्याची अनिच्छा किंवा असमर्थता,

३ ) आयातदाराची नादारी,

४ ) माल निर्यात झाल्यावर आयातदारानें तो सोडवून न घेतल्यास पुनर्निर्यातीसाठीं वगैरे येणारा खर्च,

५ ) सरकारी कायदे, नियम, वटहुकुम यांमुळें विदेशी चलन-वर्गांतराची निर्माण होणारी अशक्यता,

६ ) आयातदार राष्ट्राचे निर्यात राष्ट्राशीं किंवा अन्य राष्ट्रांशीं सुरू होणाऱ्या युद्ध अथवा इतर कारणांमुळें रक्कम मिळण्याची अशक्यता,

७ ) जहाजानें मार्ग बदलल्यानें, वा नयनीय काल वाढल्यानें, वाढलेला व आयातदाराकडून वसूल होऊं न शकणारा खर्च,

कित्येक राष्ट्रांतून या संरक्षणाबरोबरच निर्यातीबद्दल कांहीं मदतही दिली जाते (Subsidy). या प्रकारांचा विदेशविनिमयाशीं प्रत्यक्ष संबंध येत नसला तरी अप्रत्यक्षपणें संबंध आहे. कारण कुठल्याही आंतरराष्ट्रीय व्यापारांतील व्यवहारांतूनच विदेशविनिमयाचे व्यवहार निर्माण होतात.

## अदलाबदल :

कित्येकदां अन्य कुठलींही नियंत्रणें न घालतां व्यापाऱ्यांना मालाचीच खासगी अदलाबदल करण्याची पूर्वी कांहीं राष्ट्रांतून मुभा दिली जावयाची व जितकी निर्यात केली जाईल तितकीच आयात करण्याची परवानगी असायची पण फक्त व्यापार नियंत्रणाचाच हा सरळ मार्ग हल्लीं नुसता

चोखाळला न जाता व्यापार व विनिमय या दोहोंचेंही नियत्रण करण्याची व या दोन्ही नियत्रणाचा समन्वय साधण्याची हल्लीं प्रवृत्ति आहे. पण त्यातल्या त्यात, त्याच निर्यातदाराला एका ठराविक कक्षेच्या बाहेर जाऊन निर्यात वाढवल्यास, त्याचें चलन, त्याला आवश्यक, अशा वस्तूच्या आयातीसाठीं किंवा ज्याची आयात झाल्यास त्यापासून नवीन वस्तु निर्माण होऊन त्या निर्यात होऊ शकतील अशा वस्तूच्या आयातीसाठीं, वापरण्यास योग्य तो आयात परवाना दिला जातो.

## पहिल्या महायुद्धानंतरची परिस्थिती :

विनिमय व्यवहाराचे नियत्रण करताना दृश्य व्यापार व विविध असा अदृश्य व्यापार (Visible Trade and Invisible Trade) याचा जसा विचार करून धोरण ठरवले जातें तसेंच भाडवली व्यवहाराबाबतही नियत्रण आणलें जातें. जर्मनीनें १९३१ सालीं त्या देशातून भाडवलाचें पलायन (Capital Flight) होऊ लागलें, म्हणूनच नियत्रण सुरू केलें. आज मात्र दुभगलेल्या जर्मनीपैकीं पश्चिम जर्मनींत कुठलेही विनिमय नियत्रण नाहीं. भारतात सन १९३९ पासून नियत्रण सुरू झालें आहे. पण पचवार्षिक योजना, व वाढत्या गरजा यामुळें आपली परिस्थिति सध्या जास्तच बिकट झाल्यानें नियत्रण उठविणें नजिकच्या काळात तरी शक्य नाहीं. उलट आजमितीस प्रत्येकानें विदेशी चलन कमींतकमी कसें खर्च होईल व राष्ट्राची परिस्थिति चागली कशी राहील याचाच जास्तींतजास्त विचार करणें आवश्यक आहे भारतात गेलीं काहीं वर्षें अगदीं कडक नियत्रण असूनही भारताची विदेशी चलनाची गगाजळी कशी घटत चालली आहे तें खालील आकड्यावरून दिसून येईल.

एप्रिल १९५६—रिझर्व बॅंकेची परदेशी गगाजळी रु. ७४६ कोटी
" १९५७ " " " ५२५ कोटी, घट २२१ कोटी रु.
" १९५८ " " " २६५ कोटी, घट २६० कोटी रु.
" १९५९ २११ कोटी, घट ५४ कोटी रु.

एप्रिल १९६० — „ „ „ १९७ कोटी; घट १४ कोटी रुपये.

चार वर्षांतील (१९५६ ते १९६०) एकूण घट ५४९. कोटी रुपये.

भारताप्रमाणेंच जगांतील अनेक राष्ट्रांतून आज विनिमय नियंत्रण दिसून येत असलें तरी विनिमय नियंत्रणामुळें खुल्या व्यापाराचे तत्त्वाची गळचेपी होते. त्यामुळें व्यापार व विनिमय या दोन्हीवरील नियंत्रणें जितक्या लौकर काढतां येतील तितक्या लौकर तीं काढणें हें प्रत्येक राष्ट्राचें ध्येय असलें पाहिजे; कारण कित्येक वेळेला असें नियंत्रण, हें नियंत्रणासाठीं न येतां दुसऱ्याच्या नियंत्रणाला प्रत्युत्तर म्हणूनही येऊं शकतें. दुसऱ्या महायुद्धानंतर सर्व जगांतील व्यापाराचा विचार केला तर असें दिसून येईल कीं आंतरराष्ट्रीय व्यवहार हा एकमेकांच्या सोयीसाठीं असतो हें तत्त्व विसरलें जाऊन प्रत्येक राष्ट्र फक्त आपल्याच व्यापार संवर्धनाचा विचार करूं लागलें व त्यामुळें विदेशी चलनाच्या स्थिरतेच्या धोरणासाठीं प्रत्येक राष्ट्राचा तोच दृष्टिकोन येऊं लागला. अन्योन्य व्यापारी करार, देशीधंद्यांचे संरक्षणासाठीं आयातीवर वाढती जकात किंवा निर्यातीवर सवलत अशा अनेक प्रकारें व्यापार व विदेशी चलनावर वेगवेगळीं नियंत्रणें हळूहळूं कांहीं राष्ट्रांकडून आणलीं जाऊं लागलीं व त्याला प्रत्युत्तर म्हणून इतर राष्ट्रेंही तोच मार्ग अवलंबूं लागलीं. आपल्या चलनाचें अवमूल्यन केलें तर निर्यात व्यापार वाढतो म्हणून सोयीस्कर अवमूल्यनें होऊं लागलीं किंवा वेगवेगळ्या देशांचे बरोबर स्वतःच्या चलनांचे वेगवेगळे अधिकृत दर ठरवले जाऊं लागले व एकाद्या जहाजांत बसलेल्या नावाड्यांनीं आपापल्या मनाप्रमाणें उलटींसुलटीं वल्हीं मारावींत अशा प्रकारचें वातावरण जगांत निर्माण झालें.

## आंतरराष्ट्रीय चलननिधि :

अखेर दुसरे महायुद्धाचे शेवटीं शेवटीं याबाबत कांहीं तोडगा काढावा म्हणून जुलै १९४४ मध्यें संयुक्त संस्थानांतील न्यू हॅंपशायरमधील ब्रेटन-वुडस येथें एक कॉन्फरन्स भरवली गेली. (१ जुलै ते २२ जुलै) या सभेस ४४ राष्ट्रें उपस्थित होतीं व त्यांनीं सर्व मध्यवर्ती बँकांची बँक अशी भूमिका

घेणारी एक बँकेसारखी संस्था असावी व तिनें विनिमय व्यवहारासाठीं सदस्य राष्ट्रांवर कांहीं बंधनें ठेवावींत असें ठरविलें व सर्व राष्ट्रांना, तसे कायदे १९४५ अखेर करून, सदस्य व्हावयाची मंजुरी घेण्याबद्दल सांगितलें गेलें. २७ डिसेंबर १९४५ रोजीं या ४४ पैकीं ३० राष्ट्रांनीं आपली संमती दर्शविल्यानें त्यांना सदस्य राष्ट्रें म्हणून गणले जाऊन 'आंतरराष्ट्रीय चलननिधि' (International Monetary Fund) संस्थेची स्थापना करण्यांत आली. लॉर्ड कीन्स किंवा व्हाईट अशासारख्या लोकांचें, अशी संस्था असावी असें अनेक दिवस मत होतें. क्रिकेटच्या खेळाचे जसे कांहीं नियम असतात तशीच आचारसंहिता आंतरराष्ट्रीय व्यवहारांतही असावी असें बरेच विचारवंत तत्पूर्वींही सांगत होते व १९३६ सालीं याबावत मर्यादित प्रमाणावर कांहीं प्रयत्नही केले गेले होते.

आंतरराष्ट्रीय चलननिधीच्या सुरवातीच्या या तीस सदस्य राष्ट्रांत भारताचा अंतर्भाव आहे. निधीच्या प्रत्यक्ष कार्याला १ मार्च १९४७ ला सुरवात झाली. चलनाचे आंतरराष्ट्रीय व्यवहार एकमेकांच्या सहकार्यानें सोडवावेत या तत्त्वाची प्राणप्रतिष्ठा त्यावेळीं झाली, व प्रत्येक चलनाची सोन्यांतील व अमेरिकन डॉलर्समधील परिवर्तनीय किंमत निधीतर्फे ठरवण्यांत आली. अमेरिकन डॉलरची सोन्यांतील परिवर्तनीय बरोबरी किंमत १५$\frac{५}{२१}$ ग्रेन सोनें (९० टक्के कसाचें) आहे.

या निधीचे जे उद्देश आहेत त्यांत राष्ट्रांराष्ट्रांतून खुला व्यापार प्रस्थापित करणें, राष्ट्रांच्या चलनांचें स्थैर्य राखणें, तसेंच गळेकापू अवमूल्यनाला प्रतिबंध करणें व शक्य तितक्या लौकर विनिमय नियंत्रणें नाहींशीं करणें हे महत्त्वाचे उद्देश आहेत. एकाद्या राष्ट्राला जर विदेशी चलनाची टंचाई भासूं लागली तर या निधींतून त्याचा कर्जाऊ पुरवठा होऊं शकतो. प्रत्येक राष्ट्रानें या निधीला जो भरणा करावयाचा होता त्यांतील (अ) २५% सोन्याचे रूपांत अगर (ब) स्वतःच्या सुवर्ण सांठ्यांच्या १० टक्के सोने किंवा डॉलरच्या चलनांत, या दोन्हीपैकीं जे कमींतकमी असेल तें व उरलेला भरणा स्वतःच्या चलनांत असा करावयाचा होता. निधीनें प्रत्येक चलनाचें सोन्याशीं बदली परिमाण ठरवून दिलें

आहे म्हणजेच पर्यायानें दोन राष्ट्रांच्या चलनाचीं बदली परिमाणेंही त्यायोगें ठरवलीं गेलीं आहेत. या परिमाणाच्या शेकडा एक टक्क्यापर्यंत त्या राष्ट्राला आपल्या चलनाचे खरेदीविक्रीचा दर खालीवर नेतां येतो. अशीं दोन्ही टोकें कांहीं राष्ट्रांचे बाबतींत शेवटीं परिशिष्टांत दिलीं आहेत. उदाहरणार्थः—इंग्लंड आणि संयुक्तसंस्थानें यांचा निधीनें सध्यां ठरवलेला दर एक पौंडास २. ८० डॉलर्स असा आहे. हा भाव २.७८ ते २.८२ पर्यंत फिरूं शकतो. ज्यावेळेला व्यापारतुला किंवा प्रदानतुला यांत खूप मोठी घालमेल झाल्यानें असा दर राहणें अशक्य राहील, त्यावेळेला त्या राष्ट्राला आपल्या चलनाचें पुनर्मूल्यन किंवा अवमूल्यन करण्यासाठीं निधीकडे परवानगी मागावी लागते. १९४९ सालीं ग्रेट ब्रिटनवर अशी परिस्थिति आली होती व त्यानंतर जीं जीं राष्ट्रें स्टर्लिंग पौंडावर बरींच अवलंबून होतीं त्या इतर राष्ट्रांनाही पौंडांशीं आपल्या चलनाचें प्रमाण कायम ठेवण्यासाठीं तसेंच अवमूल्यन करावें लागलें होतें.

एकाद्या राष्ट्राला परदेशी चलनाची खूपच चणचण भासली तर निधींतून त्याला स्वतःच्या वर्गणीच्या २५% पर्यंत रक्कम तात्पुरती काढून घेतां येते. तसेच वर्गणीइतक्याच रकमेपर्यंत कर्जही मिळूं शकतें. अशा पैसे काढण्याबद्दल साहजिकच निधीला त्या राष्ट्राकडून कांहीं आकार (Charge) दिला जातो. भारताची सुरवातीची वर्गणी ४० कोट डॉलर्स इतकी होती, व सध्यां ती ८० कोटी डॉलर्स इतकी आहे. जागतिक परिस्थितीचा विचार करून ही वर्गणी कमी जास्त करण्याचा निधीला अधिकार आहे. त्यानुसार १९५९ सालीं ही वर्गणी वाढवण्यांत आली.

## निधीचे उद्देश :

आंतरराष्ट्रीय निधीच्या व्यवहारांत पूर्वीच्या सुवर्ण पद्धतीचा (Gold-Standard) पुष्कळसा आभास होतो. पण तें सुवर्ण पद्धतीचें नवें स्वरूप आहे असें मात्र नाहीं. निधीनें प्रत्येक राष्ट्राच्या चलनाचें सोन्यांत परिमाण ठेवलें आहे व आपली कांहीं वर्गणी ही सोन्यांत ठेवली आहे. तसेंच जमेल

तेव्हां निधींतल्या अन्य चलनाऐवजीं सुवर्णसांठा वाढवण्याचा प्रयत्नही केला जातो; पण निधीच्या व्यवहारामुळें चलनाच्या बाह्य किंमतीला स्थैर्य आणण्यासाठींच सोन्याचा उपयोग होतो. निधीचा सर्वसामान्य उद्देश विनिमय स्थैर्य निर्माण करणें, गळेकापू विनिमय अवमूल्यन (Competitive Exchange Depreciation) टाळणें व राष्ट्राराष्ट्रांच्या चलन व्यवहारांत स्थैर्य व बदली शक्यता (Convertibility) आणणें व त्यासाठीं योग्य ती मदत करणें हा आहे. तसेंच राष्ट्रीय उत्पन्न वाढवणें व सर्वांगीण खुला व्यापार वाढविणें हेही निधीचे उद्देश आहेत. निधीच्या करारनाम्यानुसार कुठल्याही चलनाची किंमत, केवळ मूलभूत तोल (Fundamental Equilibrium) गेल्यासच वदलण्याची सदस्य राष्ट्रांना परवानगी असते.

विदेशविनिमयाच्या व्यवहारांत, स्वतःच्या राष्ट्राचा तोल सावरण्यासाठीं वेगवेगळ्या राष्ट्रांनी जे जे मार्ग अवलंबिले त्यांत वेगवेगळ्या चलनाच्या परिमाणाचे दर वेगवेगळे ठरवणें हाही एक होता हें वर लिहिलें आहेच. दक्षिण अमेरिकेंतील अनेक राष्ट्रें, स्पेन, ग्रीस, इंडोनेशिया, या सर्वांनीं हा प्रयोग पूर्वीं करून पाहिला होता. विशेषतः राष्ट्राची औद्योगिक प्रगति जेव्हां त्वरेनें करावयाची होती त्यावेळेला या मार्गाचा अवलंब केला गेला होता. आपल्या निर्यातीची ज्या राष्ट्रांत अपरिहार्य जरूर आहे, तिथल्या चलनांचे बाबत असा दुजाभाव केला जातो पण आंतरराष्ट्रीय चलननिधीच्या तत्त्वानुसार असे वदलते दर नसावेत असें मान्य झालें आहे.

**परिवर्तनशक्यता; बदलीशक्यता (Convertibility) :**

आंतरराष्ट्रीय चलननिधीच्या तत्त्वानुसार प्रत्येक राष्ट्रानें परिवर्तन किंवा बदली शक्यतेकडे (Convertibility) शक्य तितक्या लौकर वाटचाल करावयाची आहे. पूर्वीं, नियंत्रणें बसण्याच्या आधीं अशी परिवर्तनशक्यता सर्व चलनांत होतीच; पण नंतर मात्र या परिवर्तन शक्यतेवर आघात करूनच नियंत्रणाची कांस धरावी लागली होती. बदली शक्यतेंत चलनासंबंधीच्या कुठल्याही खुल्या व्यवहारांचीच कल्पना अभिप्रेत असते. अशा बदली शक्यतेची इथेंच जर थोडी कल्पना दिली तर तें वावगें ठरणार नाहीं.

विदेशविनिमयाच्या व्यवहारांमध्यें एकाहून अनेक देशांतील चलनाबाबतचे व्यवहार होतात हें स्पष्ट केलेंच आहे. पण त्यांतही 'पैसा' या वस्तूचें जें मूलभूत तत्त्व आहे तेंही विसरून चालत नाहीं. पैसा जें कार्य करतो तें कार्य त्यानें पार पाडलें तरच त्याला 'पैसा' ही संज्ञा मिळेल. आपल्याजवळच्या वस्तूंचे पैशांत रूपांतर केल्यानंतर त्या पैशाच्या योगानें अन्य वस्तू वर्तमानकाळांत किंवा भविष्यकाळांत खरेदी करतां आल्या पाहिजेत. किंवा वेगळ्या भाषेंत म्हणजे आपल्याजवळ असलेला पैसा, त्या वस्तू विकणाऱ्यांना मान्य झाला पाहिजे. इंग्लंडमधील पौंडाच्या नोटेचा असा उपयोग हिंदुस्थानांतील व्यापाऱ्याला होणार नाहीं. या पौंडाचे त्याला पाहिजे असलेल्या रुपयांत किंवा सोन्यांत किंवा समजा त्याला स्वित्झर्लंडमधून माल खरेदी करावयाचा असल्यास, फ्रँकमध्यें परिवर्तन करून मिळालें तरच तो उपयोगी आहे. ज्यावेळीं आंतरराष्ट्रीय व्यवहारातील गुंतागुंत वाढली नव्हती, अनेक देश सुवर्णपद्धतीच्या कुठल्या तरी तऱ्हेचा अवलंब करीत होते, त्या वेळेला या 'परिवर्तनशक्यते' चें फारसें ज्वलन्त महत्त्व वाटत नसावें. पण अनेक घडामोडींमुळें जेव्हां आंतरराष्ट्रीय व्यवहारांतही प्रत्येक देशानें राष्ट्रीय पातळीवरून विचार करून आपल्या सुवर्ण व विदेशी चलनाच्या सांठ्यांत घट होतां कामा नये असें ठरवायला सुरवात केली व पहिल्या महायुद्धांतील व युद्धोत्तर कालांतील घटनांमुळें अनेक राष्ट्रांची आर्थिक स्थिति विस्कळित झाली व १९३१ सालीं इंग्लंडनें सुवर्णपद्धतीचा त्याग केला, तेव्हांपासून 'परिवर्तनशक्यते' चा प्रश्न फार महत्त्वाचा झाला. आज अनेक देशांतील विनिमयनियंत्रणामुळें ही बाब इतकी ज्वलंत होऊन बसली आहे कीं आंतरराष्ट्रीय चलननिधीनें आपल्या उद्देशांतील एका कलमान्वयें प्रत्येक देशानें आपलें चलन 'परिवर्तनशक्यते' प्रत शक्यतो लौकर न्यावें असें आवाहन करून निधीचें तें एक 'उद्देश' आहे असें गृहीत धरलें आहे. विशेषतः एखाद्या देशाच्या चलनावर जर त्या देशाच्या बाहेरील अन्य राष्ट्रांचे हक्क आले तर तीं राष्ट्रें त्या चलनाचें रूपांतर करण्यासाठीं व्यवहार करणारच. अशा व्यवहारामुळें

पहिल्या राष्ट्राच्या चलनाचे विदेशविनिमय दरावर परिणाम होणें साहजिक आहे. कारण अन्य राष्ट्रांना रूपांतरासाठीं तें जमा झालेलें चलन विकावें लागणार, म्हणजेच त्या चलनाचा पुरवठा मागणीपेक्षां वाढला कीं त्याची किंमत घसरणें स्वाभाविक आहे. अशा वेळीं तें राष्ट्र आपल्या चलनावरील हक्कांचें असें परिवर्तन करण्याची हक्कधारकांना बंदी करील व ती घसरगुंडी थांबवण्याचा प्रयत्न करील. कित्येकदां एकादें चलन पुरेशा प्रमाणांत जर उपलब्ध होऊं शकत नसलें तर त्या चलनांतील शिल्लक न घालवण्यासाठीं अशा 'बदली ऊर्फ परिवर्तनशक्यतेवर' निर्बंध घातले जातील. पौण्डाचे बाबतींत इंग्लंडला कांहीं वर्षांपूर्वीं असे बदली शक्यतेचे निर्बंध घालावे लागले व रुपयाचे बाबतींतही भारतसरकारचे असे निर्बंध आहेतच. ज्या वेळेला भारतीय व अभारतीय कुठल्याही व्यक्तीला आपल्याजवळचे रुपये नको असल्यास त्याचें रूपांतर इतर कुठल्याही चलनांत किंवा सोन्यांत करून घेतां येईल, तेव्हां ही बदली शक्यता संपूर्ण प्रस्थापित झाली असें म्हणतां येईल. अर्थात ही परिस्थिति कुठल्याही राष्ट्राला एकदम आणणें शक्य नाहीं. पण अशी 'संपूर्ण बदली शक्यता' (Full Convertibility) आणण्याची प्रत्येक राष्ट्राची सध्यां पराकाष्ठा चालू आहे. कारण आपले हक्काचे जर दुसऱ्या पैशांत रूपांतर करतां येणार नाहीं असें विदेशीयांना वाटलें तर ते अशा तऱ्हेचे हक्क ज्यामुळें निर्माण होतात असे गुंतवणूक वगैरे प्रकाराचे व्यवहार करण्यास धजावणार नाहींत. पण संपूर्ण बदली शक्यतेप्रत जगांतील सर्व राष्ट्रें जाणें सध्यां तरी अशक्य दिसतें. त्याचीं प्रमुख कारणें, सुवर्ण सांठ्याची टंचाई व अविकसित राष्ट्रांचे परकीय चलन संवर्धित करण्याचे प्रयत्न हीं सांगतां येतील. दुसऱ्या महायुद्धानंतर जेव्हां इंग्लंडकडून येणें असलेल्या रकमेपोटीं अनेक राष्ट्रांचे स्टर्लिंग चलनावर फार मोठ्या प्रमाणावर हक्क प्रस्थापित झाले तेव्हां ते परत मागितले गेल्यास स्टर्लिंगच्या अंतर्बाह्य किंमतीवर, परिणाम होऊं नये म्हणून इंग्लंडला बदली शक्यतेवर कडक निर्बंध आणावे लागले होते. पण १९५२ सालानंतर स्टर्लिंगची परिस्थिति सुधारूं लागल्यानंतर हळूहळू अंशतः परिवर्तनशक्यतेचें प्रमाण त्यांनीं वाढवलें आहे. संपूर्ण

बदलीशक्यतेंत अशा चलनाचें बाहेरच्या नागरिकांनाही नव्हे तर त्याच राष्ट्रांतील नागरिकांना रूपांतर करून मिळतें. अंशतः बदलीशक्यतेंत बाहेरील नागरिकांच्यावर कमी बंधनें असतात. पण त्याच देशांतील नागरिकां-वर जास्त बंधनें असूं शकतात. १९५४ सालीं इंग्लंडनें ट्रॅन्स्फरेबल खात्यांची पद्धत सुरू केल्यावर त्या वर्गांतील राष्ट्रांना आपल्या स्टार्लिंग पौंडाचे दुसऱ्या राष्ट्रांतील नागरिकांना स्टर्लिंग पौंडांतच पैसे देण्यास कुठलेंही बन्धन राहिलें नाहीं. अशी बदलीशक्यता संमत करण्यांत इंग्लंडच्या स्टर्लिंगवर ताण पडत नव्हता. कारण त्यांत एकाच विभागांत फक्त एका राष्ट्राच्या स्टर्लिंगचे हक्कांत घट होऊन दुसऱ्या राष्ट्राचे स्टर्लिंगवरील हक्कांत वाढ होत होती.

भारतांतही आज अंशतः बदलीशक्यता आहे. भारतीय रुपयावर हक्क असलेल्या भारतीय किंवा अभारतीय व्यक्ति, संस्था, सरकारें याना त्या रुपयाचें, पाहिजे त्या अन्य चलनांत किंवा सोन्यांत परिवर्तन करून तें सरास भारताबाहेर नेतां येत नाहीं तर कांहीं बाबींतच ( जिथें अशी परवानगी दिली जाते तिथें ) असें परिवर्तन होऊं शकतें. अशा रुपयावरील हक्कांचें परिवर्तन केव्हां केव्हां संमत होऊं शकतें त्याचा तपशील भारतीय विनिमय नियंत्रणाचा विचार केला आहे तिथें दिलेला आहे.

---

## भाग दुसरा

# विदेशविनिमय खातें

६

विदेशविनिमय म्हणजे काय याचा थोडासा शास्त्रीय विचार पूर्वीच्या प्रकरणांतून आलेला आहे. दैनंदिन व्यवहारांत या शास्त्रीय माहितीची फारशी जरूरी नसली तरी त्यांतील कांहीं मूळ तत्त्वांची तोंडओळख असावी या उद्देशानेंच पहिल्या भागांत त्याबद्दल ऊहापोह केला होता. या भागांत विदेशविनिमयाचा व्यवहार करतांना इतर लागणाऱ्या नित्य बाबींची माहिती दिली आहे. विदेशविनिमयाचा विभाग बँकांतून कसा चालवला जातो, तेथें कुठले व्यवहार कसे केले जातात, विनिमयांतील महत्त्वाचा व्यवहार म्हणजे आयात व निर्यात या दोन्ही प्रकारचा व्यापार; त्याबाबत महत्त्वाचे कागदपत्र कोणते व त्यांची उलाढाल कशी होते, वगैरे बाबतची माहिती या व पुढील प्रकरणांतून आढळेल. व्यापारी कागदपत्रांची म्हणजे विशेषतः नाविक निर्यातपत्र ( Bill of Lading ) सागरी विमापत्र ( Marine Insurance Policy ) यांची माहिती देतांना शक्य ते महत्त्वाचे तपशील दिले आहेत पण ज्यांचा सर्वसामान्य व्यापारांत समावेश होत नाहीं त्याबद्दल फार ऊहापोह केलेला नाहीं. तसेंच हमीपत्र, वसुलीचीं बिलें याबाबतही आवश्यकच माहिती देण्याचा प्रयत्न केला आहे.

**विदेशविनिमय खातें:–** जेथें जेथें बँका विदेशविनिमयांत व्यवहार करतात तेथें तेथें त्यासाठीं प्रत्येक बँकेचें त्याबाबतचें स्वतंत्र खातें असतें. या खात्याचे उपविभाग सुमारें दहा ते बारा असतात. त्यांची वर्गवारी साधारणपणें अशी असते.

१ ] व्यापारी हमीपत्रें ( Letters of Credit )

२ ] बिलें ( Bills )

३ ] नियंत्रण ( Exchange Control )

४ ] मेल ट्रॅन्स्फर, ड्राफ्ट, (T. T. M. T. & D. D. S.)

५ ] केबल खातें ( Cables )

६ ] हिशेब विभाग ( Accounts )

७ ] विदेश संबंध, व्यापारसंवर्धन व माहिती ( Foreign Relations, Trade Promotion & Information )

८ ] प्रवासी ( Travellers )

९ ] विदेश चलन–खरेदी विक्री. ( Arbitrage or Dealers )

१० ] नियंत्रण तक्ते ( Returns )

कांहीं बँकांतून हमीपत्रें व बिलें या विभागाचे उपविभागही पाडलेले असतात. या प्रत्येक खात्याचें सर्वसाधारण काम खालीलप्रमाणें चालतें.

**( १ ) व्यापारी हमीपत्रें:**–या विभागाचे आयात हमीपत्रें व निर्यात हमीपत्रें असे दोन विभाग कांहीं ठिकाणीं पाडलेले असतात व या विभागाचे पुन्हां खंडवार, देशवार, किंवा चलनवार असे उपविभाग पाडलेले असतात. तर काहीं बँकातून फक्त देशवारच विभाग ठेवून त्या त्या विभागांत आयात व निर्यात दोन्ही प्रकारचीं हमीपत्रें हाताळलीं जातात. कारण प्रत्येक देशाबरोबर व्यवहार करतांना तिथले नियम, निर्बंध व व्यापार तसेच विनिमय-नियंत्रण यांचा विचार करावा लागतो व एका देशविभागासाठीं एक उपविभाग केल्यास त्या त्या कर्तृवर्गाला ( Staff) ती ती माहिती चांगली राहूं शकते. आयात हमीपत्रें म्हणजे आयात करणाऱ्या आपल्या खातेदारांसाठीं परदेशांत उघडलेलीं हमीपत्रें होत तर निर्यात हमीपत्रें म्हणजे आपल्या निर्यातदाराचें नांवें आपल्या विदेशी प्रतिनिधी वा अन्य विदेशी बँकांनीं निर्यातदाराचे नांवानें उघडलेलीं व स्थानिक बँकेनें कळवलेलीं हमीपत्रें होत.

(२) बिलें:—या विभागाचेही प्रथमत दोन उपविभाग पाडले जातात. आलेलीं बिलें व पाठवावयाचीं बिले. या उपविभागाचे पुन्हा दोन विभाग केले जातात—१) वटवलेलीं बिलें २) वसुलींची बिलें वँ या चार विभागाचे प्रदेशवार किंवा बँकनिहाय असे पोटभाग पाडले जातात. आलेल्या बिलात कांहीं बिलें बॅकेच्या हमीपत्रावर आलेलीं व विदेशी प्रतिनिधी बॅकानीं वटवलेलीं असतात तीं तपासून घेऊन आयातदाराला विदेशी-चलन रुपयाचे बदल्यात देणें हें काम इथें केलें जातें. फक्त वसुलीसाठीं हमीपत्रावर नसलेलीं अशीं अन्य प्रकारचीं बिलें येतात, तेव्हा तीं ज्यावर काढलेलीं असतात त्याला देखाड केलीं जातात जहाज कधीं येणार आहे, कुठला माल येणार आहे याबद्दलची माहितीहीं असें बिल देखाड करताना दिली जाते. बिलाची वसुली होईपर्यंत प्रतिनिधी-बँकेच्या सूचना पाळणें व वसुलीनतर सूचनेप्रमाणें विदेशी चलन खरेदी करून रक्कम रवाना करणें हें काम या विभागातून होतें.

पाठवावयाचीं बिलें देखील अशींच, दोन प्रकारचीं म्हणजे फक्त वसुलीसाठीं पाठवावयाचीं व निर्यात हमीपत्राखालीं वटवण्याचीं अशीं असतात. फक्त वसुलीसाठीं पाठवावयाचीं म्हणजेच हमीपत्राखालीं नसलेलीं बिलेंही, बॅका निर्यातदाराची पत, प्रतिष्ठा, व गरज पाहून वटवू शकतात. हमीपत्राखालीं वटवण्याच्या बिलाची कटाक्षानें सपूर्ण तपासणी होते व सादर केलेले कागदपत्र सदोष असल्यास किंवा हमीपत्रात मागितल्याप्रमाणें नसल्यास, तें बिल मान्य केलें जाईल याबद्दलचें निर्यातदाराचें खात्रीपत्र घेऊन, किंवा परदेशावून आयातदाराची समति मागवून मग वटवलीं जातात किंवा वसुलीसाठीं पाठवलीं जातात. वसुलीच्या बिलाचे वेळीं निर्यातदारानें वसुलीबाबत काय काय सूचना दिल्या आहेत त्या नमूद त्याची अमलबजावणी करावयासाठीं आवश्यक अशा, बिल वसूल करणाऱ्या बॅकेला धावयाच्या सूचना तयार करण्यात येतात. नतर, पाठवावयाच्या सर्व बिलाची दोन सचामध्यें विभागणी करण्यात येऊन, पहिला मुख्य सच हवाई मार्गानें रवाना

करण्यांत येतो व दुसरा संच दुसऱ्या हवाई व सागरी टपालानें निर्यातदाराचे सूचनेप्रमाणें पाठवला जातो.

(३) **नियंत्रणः**—या विभागांत विनिमयनियंत्रणानें बँकांवर जीं बंधनें घातलेलीं असतात, त्यांची अंमलबजावणी करण्यासाठीं आवश्यक तें काम केलें जातें. प्रत्येक विक्रीबाबतचे योग्य ते नियंत्रण फॉर्म (ए., एस्. ए. वन, ए. सेव्हन वगैरे फॉर्म भारतात घेतात त्याप्रमाणें) घेणें, अशा विक्रीसाठीं मध्यवर्ति बँकेची पूर्व संमति लागत असल्यास ती मागणें, अस्थायिक व गोठवलेल्या खात्यांबाबतचा पत्रव्यवहार करणें, विनिमय व्यवहार करायला परवानगी दिलेल्या स्वतःच्या शाखांची तपासणी करणें, हेंही काम कांहीं ठिकाणीं या नियंत्रणखात्याकडेच सोंपवलें जातें.

जातात. या तारा पाठवणें, तसेच आलेल्या तारांचे सांकेतिक भाषेंतून वा परभाषेंतून स्वभाषेंत भाषांतर करणें, सुरवातीच्या सांकेतिक आकड्यांची किंवा शब्दांची फोड करणें, चूक असल्यास तिची दुरुस्ती मागवणें, देणें, हें काम इथे केलें जातें. हल्लीं परदेशांतून सर्वत्रच व भारतातही कांहीं ठिकाणीं केवळ ऐवजीं (टेलिप्रिंटरचा) 'टेलेक्स' पद्धतीचा उपयोग केला जातो याच खात्यांतून अन्य बँकांनीं पाठवलेल्या संकेत शब्दांच्या किल्ल्या (Test Keys) ठेवल्या जातात किंवा दुसऱ्या बँकाना स्वतःच्या बँकेची संकेत किल्ली (Test-Key) पाठवली जाते.

( ६ ) **हिशेब खातें**:—या खात्यात विदेशविनिमयाच्या सर्व व्यवहारांचे हिशेब ठेवले जातात. वेगवेगळ्या देशांतील प्रतिनिधि बँकांतून ठेवलेलीं खातीं, (Nostro A/cs) विदेशी बँकांनीं आपल्या बँकेंत ठेवलेलीं खातीं (Vostro A/cs) यांची सर्व नोंद इथे होते. या खात्यातील शिल्लकावर अनेक कारणानें लक्ष ठेवावें लागतें. मेल ट्रॅन्स्फर व ड्राफ्ट काढणाऱ्या खात्याला या खात्याशीं जास्त संबंध ठेवावा लागतो. तसेंच आपल्या खात्यांचे परदेशी बँकांतून येणाऱ्या खातेनोंदीबरोबर मेळ घालण्याचें (Reconciliation) कामही येथें केलें जातें. तसेंच प्रत्येक बँकेतून नॉस्ट्रो खात्यात असणारी शिल्लक क्रयविक्रय खात्याला (Dealers) रोज कळवणें, इतर बँकांकडून येणाऱ्या उलट व्यवसायाची नोंद ठेवणें व त्याप्रमाणें मेल ट्रॅन्स्फर, हमीपत्रें या खात्याना सूचना देणें वगैरे जबाबदारी याच खात्याची असते.

( ७ ) **विदेश संबंध व माहितीविभाग**:—विदेश विनिमयाचा व्यवहार करणाऱ्या बँकांचा, आपल्या खातेदारांना परदेशातील व्यापाराबद्दलची माहिती देणें, आयात निर्यात व्यवहाराबद्दल मदत करणें, तिकडील फर्म्सची खाजगी पत, प्रतिष्ठा यावरील माहिती मिळवून देणें, बँकेचा स्वतंत्र प्रवास विभाग नसल्यास प्रवाशांना प्रवासाबद्दल मार्गदर्शन करणें याबद्दलचा हा खास विभाग असतो. वेगवेगळ्या देशांतून टेंडर्स काढल्यास त्यांची, तसेंच

जागतिक अशीं वेगवेगळीं प्रदर्शनें असतात, त्यावद्दलची माहिती देणें हेंही या विभागाचें काम आहे.

(८) प्रवास-खातें:—या खात्यातर्फे परदेशीं जाणाऱ्यांना प्रवासी चेकची विक्री करणें, आलेल्या प्रवाशांना इतर माहिती देणें, प्रवासी चेक किंवा चक्री हमीपत्रांची रक्कम देणे, त्यांचा पत्रव्यवहार बँकेचे पत्त्यावर आला असल्यास देणें हें काम केलें जातें. पाश्चात्य देशांत कांहीं बँकांतून व्हिसा, पासपोर्टसाठीं खटपट करणें, दुसऱ्या देशाबद्दलची माहितीपत्रकें देणें, विमान किंवा बोटींचीं तिकिटें काढण्याची खटपट करणें हीं या विभागातर्फे कामें केलीं जातात.

(९) चलन खरेदी-विक्री:—या विभागात प्रत्येक चलनाची दैनंदिन परिस्थिति (Position) ठेवली जाते व खातेदारांना तसेंच बँकेच्या हमीपत्रें ड्राफ्ट वगैरे खात्यांना लागणारे चलन विकलें जातें, किंवा त्यानीं दिलेलें चलन विकत घेतलें जातें. विदेशविनिमयाच्या व्यवहारांत रोज दोन चलनांचे बदलीपरिमाण तेंच राहत नसतें. त्यामुळें कुठलाही तोटा होऊं नये म्हणून बँका आपली परिस्थिति समतोल (Square) ठेवीत असतात. बँकांनीं जर जवळ म्हणजे नॉस्ट्रो खात्यावर शिल्लक नसतांना चलन विकले तर जादा विक्रीची (Over-Sold) किंवा असलेल्या शिलकींतील चलन विकण्याऐवजीं जास्त चलन शिल्लक ठवलें तर जास्त शिलकीची (Over-Bought) परिस्थिति येते. दोन्ही परिस्थितीत बँकांना नफानुकसानीचा संभव असतो. अशी खरेदी-विक्री ही तयार किंवा हुकमी (Ready) किंवा विचार वायद्यात (Forward) अशी दोन्ही प्रकारांनीं होत असते व या दोन्हींचा उपयोग करून बँका शक्यतितकी, जास्तींत जास्त प्रमाणांत, आपली परिस्थिति समतोल ठेवण्याचा प्रयत्न करीत असतात. अर्थात् तत्त्वतः हें शक्य असलें तरी व्यवहारांत अशी बेरीज वजावाकी सारखी होणारी अगदीं समतोल परिस्थिति क्वचितच निर्माण होते. पण ती करण्यासाठीं बँका आपल्या चलन परिमाणाचा दर सारखा कमीजास्त करीत असतात. बॅंकेला जर एकादें चलन पाहिजे असेल तर ती आपला दर वाढवते. पण

जर चलन विकावयाचें असेल तर तो कमी करते. या उलट बँकेला जर विदेशी चलन विकावयाची इच्छा नसेल तर ती आपला दर वाढवते किंवा जर घ्यावयाची इच्छा नसेल तर ती आपला दर कमी करते. निर्यात हमीपत्रावरील दस्तऐवज एकदम खूप आले व ते वटवल्यामुळें जर बँकेला विदेशी चलन विकत घ्यावें लागलें तर ती तेवढें किंवा त्याच्या जवळपास रकमेचें विकलें जाईल तितकें चलन विकून टाकते आणि अशी व्यवहाराची अखंड साखळी दर क्षणाला चालू असते. या प्रत्येक व्यवहारात बँक एका बाजूनें घेतलेली जबाबदारी दुसऱ्या बाजूनें पुरी होईल व त्यात तोटा होणार नाहीं हें बघत असते. या विभागात हें काम करणारे, त्या त्या खरेदी–विक्रींतले दर्दी असतात व त्याचा अन्य बँकातील या विभागाशीं टेलिफोन-टेलेक्स द्वारा सारखा संबंध असतो. बँकातील विदेशविनिमय विभागाच्या अन्य खात्यातून चालणाऱ्या सर्व व्यवहाराची म्हणजे ड्राफ्ट, मेल ट्रान्स्फर किती काढल्या गेल्या किंवा त्या बँकेवर अन्य किती बँकानीं काढल्या, हमीपत्रें किती वटवलीं गेलीं किंवा अन्य बिलें किती वसुलीसाठीं पाठवलीं गेलीं, आयात हमीपत्रावर अन्य बँकात किती रक्कम नावें पडली या सर्व कामाची जमी या विभागाकडे सारखी येत असते.

(१०) **नियंत्रण तक्तेः**—जेथें जेथें विनिमय व्यवहारावर नियंत्रण असतें तिथें विदेशविनिमयाचा व्यवहार करणाऱ्या अधिकृत बँकाना सर्व व्यवहाराबद्दलचे अनेक प्रकारचे तक्ते मध्यवर्ती बँकेला पाठवावे लागतात. भारतातील अधिकृत बँका असे तक्ते रिझर्व बँकेकडे वेळोवेळीं पाठवीत असतात. त्यातील काहीं दहा दिवसानीं, काहीं मासिक तर कांहीं त्रैमासिक असे असतात याच तक्त्याबरोबर बँकेला प्रत्येक विक्रीबाबत घेतलेले नियंत्रण फॉर्म (Control Forms) व संपूर्ण वापरले गेलेले आयात परवाने तसेच रिझर्व बँकेनें दिलेले खास परवानेही पाठवावे लागतात. या खात्याचें काम हे तक्ते वेळेवर पाठवणें, सर्व फॉर्म बरोबर भरले गेले आहेत कीं नाहीं हें बघणें हें असतें.

विदेशविनिमयाचे काम बँकेतून कसें चालतें याची ही ढोबळ माहिती आहे. त्यात प्रत्येक बँक आपल्या सोयीनुसार बदल करीत असते. हा व्यवहार करताना बँकाना जगातील अन्य देशातून असणाऱ्या बँकाची आपले प्रतिनिधी म्हणून नेमणूक करावी लागते. अशा प्रतिनिधी बँकाची नेमणूक करणें फक्त मोठ्या बँकानाच जमणें शक्य असतें, त्यामुळें बहुधा हा व्यवहार बँका व काहीं मोठ्या पतप्रतिष्ठेचे वैयक्तिक प्रतिनिधीच करतात. बहुतेक देशात विनिमयनियत्रणानें हा व्यवहारही काहीं बँकानाच करावयाला परवानगी दिली आहे. अशा बँका आपल्या परकीय चलनातील खातीं दुसऱ्या देशातील बँकातून ठेवतात व त्या खात्याचे द्वारा सर्व व्यवहार पार पाडले जातात काहीं मोठमोठ्या फर्म्स व व्यक्तींना सबळ कारण असेल तर प्रत्यक्ष परकीय चलनात खातीं देशाचे बाहेर ठेवता येतात. ज्या व्यक्तींना अशीं खातीं ठेवता येतात त्याना ठराविक मुदतीचा हिशेब मध्यवर्ती बँकेला द्यावा लागतो तर काहीं वेळा बँकाना अशा फर्म्स, व्यक्तींसाठीं त्याच्या नावाचीं खातीं उघडून त्या फर्मसच्या आदेशानुसार त्याचे नावे व्यवहार करता येतात बँका आपली खातीं ज्या बँकातून परदेशात ठेवतात, त्याच्या मार्फत आपले व्यवहार करण्यासाठीं त्याना त्या बँकेशीं विशिष्ट प्रकारची व्यवस्था करावी लागते, याचा वर उल्लेख केलेला आहेच. अशी व्यवस्था झाली म्हणजे परदेशातील बँक ही त्या खातेदार बँकेची त्या देशातील प्रतिनिधी ( Correspondents किंवा Agents ) समजली जाते. कित्येकदा एका बँकेंत खातें ठेवून त्यातून व्यवहार करण्याची व्यवस्था करूनही दुसऱ्या बँकाना प्रतिनिधी नेमता येतें. त्यासाठीं अशा सर्वच प्रतिनिधी-बँकातून खातीं ठेवावीं लागतात असें नाही. मात्र खातें नसताना असा व्यवहार करावयाचा असेल तर परदेशातील बँक जिच्यासाठीं प्रतिनिधित्व करावयाचें व जिचे व्यवहार बघायचे त्या बँकेची सुस्थिति वगैरे जरूर विचारात घेते.

अशी एजन्सीची व्यवस्था झाल्यानंतर दोन्ही बँका एकमेकाच्या सोयीसाठीं व सुरक्षिततेसाठीं आपल्या अधिकृत अधिकाऱ्याच्या सह्या व तारेसाठीं सांकेतिक किल्ली ( Test key ) वगैरे पाठवतात व मग त्यांना तारेने किंवा टपालानें योग्य ते व्यवहार विनाविलंब पार पाडता येतात. व अशा बँकातर्फे हमीपत्रें काढण्याची व त्याखालील बिलें वटवण्याची, मेलट्रॅन्स्फर, टेलिग्राफिक ट्रॅन्स्फर द्वारें पैसे देण्याची, ड्राफ्ट काढण्याची सोय करता येते. तसेंच परदेशातील खात्यात वेळीं अवेळीं शिल्लक नसल्यास ओव्हरड्राफ्ट असण्याची व्यवस्थाही प्रतिनिधी बँकेतर्फे केली जाते. अशा प्रतिनिधि बँका व्यवहाराप्रमाणें एका देशात एकाहून अधिकही ठेवल्या जातात. प्रतिनिधी म्हणून ज्या बँकेला निवडावयाचें तिच्याकडून उलट व्यवसाय किती येईल या बाबीचाही विचार केला जातोच. विदेशविनिमयाच्या व्यवहारातील प्रतिनिधी बँका व विनिमय व्यवहारात विशेषत व्यापारात जे अनेक महत्त्वाचे कागदपत्र विचारात घ्यावे लागतात त्याची व नियम व्यवहार कसे होतात याची माहिती घेणें क्रमप्राप्त ठरेल

---

# नाविक निर्यात पत्र ( Bill of Lading ) आणि मालवहातूक

७

विदेशविनिमयांत व्यापारी दस्तऐवज म्हणून जे कागदपत्र असतात त्यांत नाविक दस्तऐवज ( Shipping documents ) हे मुख्य असतात. या नाविक दस्तऐवजांमध्ये नाविक निर्यातपत्र ( Bill of Lading ) हा एक महत्त्वाचा कागद आहे. परदेशांतील ग्राहकाला माल पाठवितांना विक्रेत्याला तो बोटीवर चढवावा लागतो आणि असा माल अमक्या अमक्याला पोचवण्यासाठीं चढविला गेल्याची बोटीच्या मालकानें दिलेली पावती म्हणजेच 'नाविक निर्यातपत्र' ( Bill of Lading ) होय. कुठल्याही महत्त्वाचे कागदपत्राला पूर्वी इंग्रजींत बिल म्हणायचे व लेडिंग हें लोडिंगचें अपभ्रष्ट स्वरूप आहे. म्हणजे माल चढवल्याची पावती असा अर्थ या शब्दप्रयोगानें इंग्रजींत उघडपणें व्यक्त केला जातो. मालावरील मालकी हक्क शाबीत करणारा हा निर्यातपत्राचा कागद, महत्त्वाचा कागद समजला जातो. कारण त्यांवर केवळ कोरी सही ( Blank Endorsement ) केली कीं त्यांची मालकी बदलता येते. व पर्यायानें त्या कागदानें व्यक्त केलेल्या मालाची मालकीही बदलली जाते.

## मेट्स पावती व निर्यात पत्र :

कुठलाही माल बोटीवर चढवण्यासाठीं आला कीं तो माल पोंचवणाऱ्याला गोदींत माल आल्याबद्दल 'मेट' नांवाच्या अधिकाऱ्याकडून पावती मिळते. 'मेट्स रिसीट' म्हणून समजली जाणारीही पावती फक्त कच्ची पावती असते. ह्या पावतीवर कोरी सही करून ( Endorsement ) पावतींतील मालाचें स्वामित्व बदलतां येत नाहीं. या पावतीनंतर योग्य तें भाडें

दिल्यावर व प्रत्यक्ष बोटीवर माल चढल्यानंतर बिल ऑफ लेडिंग ही अधिकृत पावती दिली जाते. असें बिल 'शिप्ड् बिल ऑफ लेडिंग' असें समजलें जातें. कित्येकदां 'ऑन बोर्ड' असेही शब्दप्रयोग असणारें बिल दिलें-जातें. या दोन्हीं प्रकारांत या शब्दांनीं ती पावती सुरू होते म्हणून त्याला हें नामाभिधान दिलें जातें. मेट्स रिसीट ही कच्ची पावती असते तर निर्यात-पत्र ही पक्की अधिकृत पावती असते. बिल ऑफ लेडिंगमध्यें जशा प्रकारची मालाची स्थिति वर्णन केली असेल त्याच स्थितींत तो माल निर्यातपत्राचे धारकाला द्यावयाची कप्तानावर जबाबदारी असते.

## रिसीव्हड फॉरशिपमेंट प्रकारचे निर्यात पत्र :

या खेरीज 'रिसीव्हड फॉर शिपमेंट' प्रकारचें बिलही कांहीं वेळां नाविक कंपन्या देतात. मुख्यत्वें करून ही पद्धत अमेरिकेंत सुमारें १८९० सालापासून सुरू झाली. पण असें बिल हें 'शिप्ड्' किंवा 'ऑन बोर्ड' सारखें चांगलें समजलें जात नाहीं. कारण बोटीवर प्रत्यक्ष माल चढल्याची ती वानगी नसते. जवळ जवळ मेट्स रिसीट स्वरूपाचीच, फक्त माल बोटीवर चढविण्यासाठीं मिळाला येवढेंच सांगणारी ही पावती असते. ती बिल ऑफ लेडिंगच्या स्वरूपांत असते इतकेंच. माल प्रत्यक्ष बोटीवर चढवला जात नाहीं पण चढवला जाण्यासाठीं जेव्हां बोटीचा मालक तो ताब्यांत घेतो तेव्हां असें बिल दिलें जातें. माल बोटीवर प्रत्यक्ष चढवला गेला कीं या रिसीव्हड बिल ऑफ लेडिंगवरच 'ऑन बोर्ड' असा शेरा मारून व तारीख घालून त्याचें नेहमींच्या कायदेशीर बिल ऑफ लेडिंगमध्यें रूपांतर करून देतात, किंवा त्याबदलीं नवीन बिल ऑफ लेडिंग देतात.

## निर्यात पत्राचा संच :

बिल ऑफ लेडिंग देतांना त्याच्या सर्वसाधारणपणें दोन किंवा तीन प्रती दिल्या जातात व अशा किती प्रती दिल्या आहेत याची नोंद त्या निर्यातपत्राचे शेवटीं सहीपूर्वी वरच्या जागेंत केलेली असते. या सर्व प्रती मिळून एक समुचय (set) तयार होतो असें समजलें जातें. असें असलें तरी त्यांतील वर्णन केलेला माल हा पहिल्यांदा दाखल केल्या जाणाऱ्या

प्रतीपोर्टींच दिला जातो. मग ती समुच्चयामधील कुठलीही प्रत असली तरी चालते व माल दिल्यावर समुच्चयांतील बाकीच्या प्रती रद्द समजल्या जातात. म्हणूनच निर्यातपत्रधारकानें फक्त एकाच प्रतीवर समाधान न मानतां सर्व समुच्चय आपल्याला मिळेल याची दखल घेतली पाहिजे.

अशा सेटखेरीज नॉन–निगोशिएबल असा शेरा मारलेल्या जादा प्रतीही नाविक कंपनी निर्यातदाराला त्याच्या विनंतीनुसार देऊं शकते. मात्र त्या अनधिकृत अशा व केवळ ग्राहकाला पूर्व सूचना देण्यासाठीं किंवा वेगवेगळ्या दप्तरासाठींच उपयोगांत आणल्या जातात. यावरून एक गोष्ट उघड होते कीं बिल ऑफ लेडिंग हा 'क्वासी-निगोशिएबल' कागद समजला जातो व केवळ सही व हस्तांतर येवढ्यावरून त्याची मालकी दुसऱ्याकडे जाऊं शकते. मात्र बिल ऑफ एक्स्चेंज (हुंडी) प्रमाणें तें संपूर्णपणें 'निगोशिएबल' नसतें. कारण वर्ग झाल्यानंतरही नंतरच्या मालकाला त्याच्या पूर्वीच्या मालकाचा मालावर जितका हक्क असेल त्याहून जास्त हितसंबंध प्राप्त होत नाहीं. मालाइतकेंच या माल पावतीलाही महत्त्व आहे. ही पावती घेणाऱ्यानें ती योग्य ती किंमत देऊन, दैनंदिन व्यवहारांत व सचोटीनें कुठलीही भली बुरी शंका न येतां घेतलेली असल्यास त्याला, त्यांतील संपूर्ण अधिकार प्राप्त होतात व तो यामुळें स्वतःच्या सहीनें ती पावती परत दुसऱ्याला तबदील करूं शकतो, किंवा तीवरून फिर्याद करूं शकतो. मेट्स् रिसीटवरून मात्र ती ताब्यांत असणाऱ्याला असे अधिकार मिळूं शकत नाहींत. मेट्स् रिसीट ही निर्यातदारासाठीं किंवा माल विकणारांसाठीं त्याच्या प्रतिनिधींनीं (Clearing Agents, Shipping & Forwarding Agents) किंवा अन्य कुणी भाडें वगैरे भरलें असल्यास त्याला तें भाडें निर्यातदाराकडून मिळेपर्यंत आपल्या ताब्यांत ठेवतां येईल. कारण ती कच्ची पावती परत केल्याखेरीज बिल ऑफ लेडिंग मिळूं शकत नाहीं.

निर्यात पावती हा निर्यातदाराचा महत्त्वाचा कागद आहे. अशी पावती देतांना बोटीच्या मालकानें ती विशिष्ट अटीवरच दिलेली असते. ती पावती म्हणजे विवक्षित माल विशिष्ट प्रकारें ठराविक बोटीनें विवक्षित

दिलेल्याचेच शेरे आढळतात. हें भाडें जहाज व—किंवा माल हरवला किंवा न हरवला तरी द्यावेंच लागतें व तें परत मिळत नसतें. निर्यातपत्र भाडें दिल्याचे शेऱ्याचें असल्यास विक्रेत्याला पुढें फारसा त्रास होत नाहीं. निर्यातपत्र हा भाडें घेऊन माल पोंचवण्याचा एक करार असतो असेंही पूर्वी समजलें जात असें पण या गोष्टीला हल्लीं फारसें महत्त्व देत नाहींत. अर्थात्‌च आकार घेतल्यानंतर ताब्यांत घेतलेला माल 'व्यापारीय' (Merchantale) परिस्थितींत पोंचता करण्याची जबाबदारी जहाजाचे कप्तानावर पडते. एकादी वस्तु प्रथम आहे त्याच प्रकारच्या वर्णनाची वस्तु म्हणून जर ती विकली जाऊं शकली (थोडेसें नुकसान पोचलेलें असूनही) तरच ती 'व्यापारीय' समजली जाते. ती त्याऐवजीं त्याच नांवानें न ओळखल्या जाणाऱ्या अशा दुसऱ्या परिस्थितींत असली तर, ती विकली जाऊनही तिला 'व्यापारीय' म्हटलें जात नाहीं. जहाजाचें भाडें जें घेतलें जातें तें वजनावर, किंमतीवर किंवा नगावरही घेतलें जातें. तें जर उतरवण्याच्या बंदरांत दिलें जाणारें असलें तर तें देईपर्यंत त्यापोटीं मालावर बोटीच्या मालकाचा भाड्याच्या रकमेपुरता हक्क राहतो. (Unpaid Carrier's Lien) असें भाडें कदाचित् बुडण्याची शक्यता असल्यानें बोटीच्या मालकाला त्याचाही विमा उतरवितां येतो. किलेकदां असें भाडें आगाऊ भरून निर्यातदार बोटीवरील आपल्या मालासाठीं जागा राखून ठेवूं शकतो. पण अशा जागेंत नंतर जरी माल भरला गेला नाहीं तरी तें परत दिलें जात नाहीं व त्या प्रकारच्या भाड्याला मृतभाडें (Dead Freight) म्हणतात.

नाविक निर्यातपत्रांत दोन्ही बंदरांचीं जशीं नांवें दिलेलीं असतात, तसेंच हा जलप्रवास कुठलें जहाज करणार आहे, त्याचेंही नांव दिलेलें असतें, पण किलेकदां एका बोटीनेंच संपूर्ण प्रवास होण्याऐवजीं मध्यें जर बोट बदलली जाणार असेल तर पहिल्यांदां माल जी कंपनी घेते ती 'थ्रू बिल ऑफ लेडिंग' देते. भाडें अर्थात् तीच घेते व त्यांतील ठरवलेला भाग पुढील कंपनीस देऊन योग्य त्या ठिकाणीं दुसऱ्या बोटीवर माल चढवण्याची व्यवस्थाही तीच करते. असें 'थ्रू' बिल जर मिळालें नाहीं व ट्रॅन्सशिपमेंट असेल तर ट्रॅन्सशिपमेंटच्या

बंदरापर्यंतच पहिलें निर्यातपत्र असेल तर तें चांगले किंवा निर्दोष ( Clean ) असें समजत नाहींत. ज्या वेळेला थ्रू बिल ऑफ लेडिंग दिलें जातें त्या वेळेला पहिल्या जहाजानें ज्या अटींवर तें दिलें असेल त्याच अटी पुढील जहाजांवर बंधनकारक असतात.

कित्येकदां माल थोडा असल्यास अगर एकच प्रकारचा माल एकाच कंपनीस अनेक ग्राहकांस पाठवावयाचा असल्यास विक्रेता अगर ती मोठी कंपनी सर्व माल एकाच निर्यातपत्रावर पाठवून ते ग्राहकांच्या देशांतील आपल्या प्रतिनिधीकडे पाठवते. तो प्रतिनिधि, त्या निर्यातपत्राच्या आधारावर वेगवेगळ्या विक्रेत्याच्या नांवानें डिलिव्हरी ऑर्डर्स देतो. अशा डिलिव्हरी ऑर्डर्स जरी निगोशिएवल किंवा कायद्यानें मालावरील मालकी हक्क प्रस्थापित करणारे दस्तऐवज म्हणून मान्य झाल्या नाहींत तरी भाड्यांतील काटकसरीमुळें व एकाच बोटीनें माल पाठवीत असल्यास कदाचित् तो निर्यातदार लवकर पाठवूं शकत असल्यामुळें ग्राहकांसही तें सोयीस्कर पडतें म्हणून त्या घेणारें ग्राहक, हा विचार करूनच अशा डिलिव्हरी ऑर्डर्स स्वीकारीत असतात. फक्त मोठमोठ्या कंपन्याच हा मार्ग स्वीकारीत असतात.

## निर्यात पत्र देण्यापूर्वीची पार्श्वभूमि :

नाविक निर्यातपत्राचा विचार करतांना त्यांतील पार्श्वभूमीचाही विचार करावाच लागतो. असें निर्यातपत्र ही बोटीवर माल चढवल्याची पावती असते. तसेंच विशिष्ट भाडें दिल्यानंतर ताब्यांत दिलेला माल निर्यातदाराच्या इच्छेप्रमाणें ठराविक ठिकाणीं पोंचवण्याचा तो नाविक कंपनीनें केलेला कराराही असतो. हा करार करतांना त्या कंपनीवर जशी कांहीं जबाबदारी येते तसेंच या विशिष्ट व्यापारांत धाडस असल्यानें (इंग्रजांच्या युगांत

अधिकार किंवा हक्कही मिळतात. मोटारी, आगगाड्याप्रमाणें जहाजें सुद्धा माल ताब्यात घेतल्यावर, तो देणाराचे निश्वस्तच होतात. असा धंदा करणाऱ्या बोटींना (व त्याच्या कंपन्याना) सार्वजनिक वाहतूकदार (Common Carriers) अशी संज्ञा आहे व काहीं अपरिहार्य परिस्थिति सोडली तर त्याना अशी वाहतूक करावयास सांगितली गेल्यास व बोटींत जागा असल्यास कायदेशीरपणें ती नाकारता येत नाहीं. बेकायदेशीरपणें त्यानीं ती नाकारली तर तो गुन्हा ठरतो. खासगी वाहतूक (Private Carrier) करणाऱ्यावर हें बंधन नसतें. मात्र सार्वजनिक वाहतूकदार, बोटींत जागा नसेल, बोट एकाद्या बंदरात किंवा एकाद्या मार्गानें जाणार नसेल, माल वेळेवर आणून दिला गेला नसेल, भाडें दिलें गेलें नसेल, ज्या तऱ्हेची वाहतूक कधीं केली नसेल ती सांगितली असेल किंवा मालाचें पॅकिंग बरोबर नसेल तर अशा वेळीं मात्र अशी वाहतूक करण्याचें नाकारू शकतो. त्याचप्रमाणें माल नेताना कुठलाही अवघड धोका दिसत असेल तरीही तो वाहतुकीस नकार देऊ शकतो. कारण एकदा माल ताब्यात घेतल्यावर त्याची सर्व जबाबदारी त्या जहाजावर पडत असते, व सर्वसामान्यपणें जलप्रवास दीर्घ मुदतीचा व अनिश्चित प्रकारचा असल्यानें त्यात अनेक संकटें येऊ शकतात व ज्या संकटावर त्याचा ताबा नाहीं अशा संकटाबद्दल व त्यापासून होणाऱ्या नुकसानीबद्दल त्याला अभय दिलें जातें.

## हेगचे नियम :

याबाबत सर्व देशाचे एक विचार असावेत म्हणजे आंतरराष्ट्रीय जलवाहतुकींत सोपेपणा निर्माण होईल व गुंतागुंतीचे किंवा अडचणींचे प्रश्न निर्माण होणार नाहींत असें वाटल्यावरून आंतरराष्ट्रीय विधिसमिती (International Law Association) तर्फे हेग येथें १९२१ सालीं एक परिषद भरविली गेली व सर्वांनीं पाळावयाचे असे काहीं नियम ठरविण्यात आले. हे नियम नऊ आहेत. अनेक राष्ट्रांनीं, या मंडळाच्या शिफारशीनुसार या निर्णयाना नंतर कायद्याचें स्वरूप दिलें व आपापल्या

वस्तूंच्या जलप्रवासीय वाहतुकीबाबतच्या कायद्यांत त्यांचा अंतर्भाव केला. इंग्लंडमध्यें हे नियम मान्य करून जलप्रवासीय वस्तुनिर्यातीचा (Carriage of goods by Sea) कायदा सन १९२४ मध्यें मंजूर करण्यांत आला व हिंदुस्थानांतही अशा प्रकारचा कायदा करण्यांत आला आहे. या समितीचे बैठकीनंतर, ब्रुसेल्समध्यें १९२२ व १९२४ सालीं. भरविल्या गेलेल्या परिषदेंतून हेगचे नियमांत थोडा फेरबदल करण्यांत आला.

इंग्लंडमधील कायद्यांत जिवंत प्राणी, हेगच्या कलम सहाप्रमाणें खास परिस्थितींत बसणाऱ्या वस्तु, व डेकवरील वस्तु (On Deck Shipment) या तीन गोष्टींबाबत अपवाद करण्यात आले आहेत.

या नियमांतील कलम सहांतील परिस्थितींत बसणाऱ्या वस्तू, योग्य वाटल्यास कुठलेंही जहाज, निर्यातीसाठीं स्वीकारूं शकतें पण त्यापोटीं नेहमींप्रमाणें वस्तुनिर्यातपत्र दिलें न जातां 'नॉट निगोशिएबल' स्वरूपाची अशी फक्त पावती मिळते. ज्या ज्या देशांनीं हेगचीं कलमें कायद्याच्या स्वरूपांत स्वीकारलीं आहेत, त्यांनीं बंदरांतून माल निघतांना दिल्या जाणाऱ्या वस्तु निर्यातपत्रावर ते हेगच्या कलमावर आधारित असें लिहून देण्याचें बोटीच्या मालकांवर बंधन घातलेलें आहे. या बंधनाबाबतचा उल्लेख राष्ट्रांच्या आपापल्या वस्तूंच्या जलप्रवासीय वाहतुकीबाबतच्या कायद्यांत केलेला असतो. वस्तु निर्यातपत्रांतील या कलमाला सर्वश्रेष्ठ कलम (Clause Paramount) अशी संज्ञा आहे. या सर्वश्रेष्ठ कलमान्वयें त्या कायद्यानें या शिफारशीनुसार दिलेले सर्व हक्क जहाजांना मिळतात व ते हक्क निर्यातपत्राच्या करारांत अंतर्भूत झाल्याचें समजलें जातें. एकादी वस्तू डेकवरच ठेवून निर्यात करावयाची असेल तर, निर्यातपत्रांत तिचा निर्यातदाराच्या जबाबदारीवर डेकवर ठेवलेल्या वस्तू (on Deck Shipment) असें वर्णन करून हें सर्वश्रेष्ठ 'कलम' त्या शेऱ्यानें रद्द केलें जातें. अन्यथा निर्यात करावयाचा माल डेकखालीं सांठवला जाईल असें गृहीत धरलें जातें.

हेगच्या कलमांनीं निर्यात करावयाच्या वस्तू, जहाजावर योग्य तऱ्हेनें चढविण्याची, उतरवण्याची, हाताळण्याची, नेआण करण्याची व त्या मुद-

तींत त्याची नीट देखभाल करण्याची व योग्य काळजी वाहण्याची जबाबदारी जहाजाचे मालकावर टाकलेली आहे. त्यामुळें माल बरोबर नसल्यास पॅकिंग चागलें नसल्यास किंवा प्रवासात माल किंवा पॅकिंग यास इजा पोचण्याचा संभव असल्यास जहाजाचा मालक तसा शेरा मारूनच निर्यातपत्र देतो. ज्या वेळेला शेरा मारलेलें निर्यात पत्र दिलें जातें किंवा सकृद्दर्शनीं मालाबद्दल काहीं वेगळा उल्लेख केला जातो तेव्हा त्या निर्यातपत्रास खराब, वाईट किंवा सदोष, निर्यातपत्र ( उदा. —दोन पेट्याचें पॅकिंग चागलें नाहीं, माल गजलेला आहे, पोतीं फाटकीं आहेत इत्यादि. ) (Claused, Unclean Qualified, Foul, Dirty, Derogatory Bill of Lading ) अशी त्यास संज्ञा दिली जाते. असे शेरे नसले तर तें निर्यातपत्र निर्दोष, स्वच्छ, चागलें ( Clean ) असें समजतात. हमीपत्रात बहुश स्वच्छ व निर्दोष नाविक पत्राची मागणी केलेली असते, तेव्हा अशा अटी असलेलें निर्यातपत्र स्वीकारून, बिल वटवण्यास बॅंक सहसा तयार होत नाहीं. निर्यातपत्र जरी स्वच्छ असले तरी त्यावर सर्वसामान्यपणें 'आतील वस्तू माहीत नाहीं' 'वस्तू दिसण्यात तरी नीट आहेत.' ( in apparent good order ) असा शेरा हमखास असतोच, तरीही तें स्वच्छ समजलें जातें. (मालाचे पॅकिंग बाबत दुरुस्त्या कराव्या लागल्यास त्याचा खर्च मालाचे मालकाला द्यावा लागतो.)

बोटीवरून ज्यावेळेला 'जिवत प्राणी' किंवा 'वनस्पति' अशा गोष्टी नेल्या जातात त्यावेळेला त्याचेसाठीं पाणी वगैरे (अन्नाची इ ) ची सोय करावी लागते, व त्याची जबाबदारी, त्या वस्तू पाठविणाऱ्यावरच टाकली जाते. पण त्यांचेकडून योग्य तो आकार घेऊन त्याचेसाठीं बोटीवरील कप्तान व नोकर ते काम अगावर घेतात. मात्र अशा वस्तू, किंवा डेकवर ठेवल्या जाणाऱ्या वस्तु यांच्याबद्दल जहाजाचा कप्तान किंवा खलाशी याना जहाजाचा प्रवासकाल वाढल्यास, जहाज अनयनीय झाल्यास किंवा त्याची हयगय झाल्यास जबाबदार धरलें जात नाहीं

निर्यातपत्र व्यापाऱ्यानें हातात पडल्याबरोबर तपासून घ्यावें. वर उल्लेखिलेल्या सर्व गोष्टींची म्हणजे जहाजाचें नाव, दोन्ही बदराचीं नावें,

प्रवासाची दिशा (दाखवली असल्यास), मालाचें वर्णन व खुणा, निर्यातदाराचें नाव, भाडें दिलें का द्यावयाचें याचा उल्लेख, पॅकिंगबद्दलचे शेरे वगैरे नोंदी बरोबर आहेत ना याची खात्री करून घ्यावी. या निर्यातपत्रावरहुकूम पुढें त्याला बीजक (Invoice) व अन्य कागदपत्र तयार करून आयातदाराकडे पाठवावयाचे असतात, म्हणूनच नव्हे, तर निर्यातपत्र हा एक करार असतो, म्हणूनही त्याची संपूर्ण माहिती असणें त्याच्या दृष्टीनें इष्ट असतें. कारण या करारान्वयें जहाज कंपनी निर्यातदाराचा माल काहीं अटींवर नेण्याचें पत्करते पण त्याचबरोबर त्या जहाजालाही काहीं हक्क प्राप्त होत असतात.

## हेगचे नियम :

नौकानयनाचा हा व्यवहार जगात फार पूर्वीपासूनच चालत आला आहे व त्याबद्दलचे अलिखित नियमच पुष्कळ दिवस होते. पण याबाबत आंतरराष्ट्रीय रूढी एक असावी म्हणून हेग येथें १९२१ सालीं एक परिषद भरली व तिनें नौकानयनाबद्दल नऊ नियम करून ठेवले. पुढे अनेक राष्ट्रांनीं याबाबत कायदेच (Carriage of goods by sea) करून ते मान्य करून ठेवले आहेत. हेगच्या १९२१ च्या परिषदेनें केलेले नियम ब्रुसेल्सला ऑक्टोबर १९२१ मध्यें जी दुसरी आंतरराष्ट्रीय परिषद झाली तिथें पक्के दुरुस्त करण्यात आले हें मागें विदित केलेंच आहे. या नियमानुसारच ही वाहतुक होईल असें सांगणारी पहिली अट निर्यातपत्रातील करारात नेहमीं पहिल्यादा (ज्या राष्ट्रांनीं ते नियम मान्य केले आहेत त्यांच्या कोटीच्या बाबतींत) घालण्यात येते व तिला सर्वश्रेष्ठ कलम (Clause Paramount) असें संबोधिलें जातें. याचा मागें खुलासा केला आहेच.

त्याचप्रमाणें कित्येकदा जहाजाला सोयीनुसार व योग्य वाटल्यास एकदा वा अनेकदा मार्गेंपुढें जाण्याचा वा आपला मार्ग बदलण्याचा अधिकार आहे. ही अट निर्यातपत्रात अनेकदा दिसते (Deviatiom Clause)

## ट्रॅन्सशिपमेंटची अट :

तसेंच मालाची वाहतूक करताना कंपनीला वाटल्यास जहाज बदलण्याचा, वेळ पडल्यास दुसऱ्या कंपन्यांचे द्वारें माल पाठवण्याचा व हें करताना जरूर पडल्यास माल जमिनीवर वा बंदरात कुठेंही उतरवण्याचा, व परत भरण्याचा अधिकार आहे व त्याची सर्व जबाबदारी व्यापाऱ्यावर राहील अशीही अट (Transhipment Clause) कांहीं वेळा घातली जाते. व्यापाऱ्याला हें टाळावयाचे असल्यास ही अट चालणार नाहीं असें त्यानें कंपनीला आधींच कळवावें लागतें व मग जहाजाला हा अधिकार वापरता येत नाहीं. अर्थात वरील दोन्ही अटी जहाजकंपनीकडून घातल्या गेल्या तरी त्याचें पालन कुठल्या परिस्थितींत कसें करावें लागेल याचा विचार कायदेशीर प्रश्नाचे वेळीं कोर्टांना करावाच लागतो. ट्रॅन्सशिप्मेंट अटीमुळें नाविक-निर्यातपत्राचें 'ट्रॅन्सशिप्मेंट बिल ऑफ लेडिंगमध्यें' रूपांतर झालें असें मात्र समजलें जात नाहीं. ट्रॅन्सशिप्मेंटची अट घातली नसेल तर माल भरलेल्या जहाजानें, ठरवलेल्या व जाहीर केलेल्या मार्गानेंच प्रवास केला पाहिजे असें गृहीत धरलें जातें.

त्याचप्रमाणें माल अमुक बंदरात उतरवू म्हणून जरी जहाजानें हमी घेतली असली तरी त्या बंदरात किंवा त्या बंदराच्या आसपास पाण्यात जेथपर्यंत जहाज बिनधोकपणें जाऊं शकेल तेथपर्यंत माल नेऊं असेंही निर्यातपत्रात कांहीं कंपन्या कित्येकदा नमूद करतात. काही वेळा दोन जहाजांची टक्कर होऊन मालाचें नुकसान झालें तर एका जहाजाच्या नुकसानीची भरपाई दुसऱ्या जहाजाची चूक असो वा नसो, त्याच्याकडून घेतली जाते व ती रक्कम मालाचे मालकांना प्रमाणात वाटली जाते. हाही एक प्रकारचा जहाजाचा अधिकारच समजला जाईल. मात्र अशी अट (Both-to-Blame Collusion Clause) निर्यातपत्रात असावी लागते

**कॅस्पिआना अट** (Caspiana Clause) :

कांहीं वर्षांपूर्वी नाविक निर्यातपत्रातून 'कॅस्पिआना अट' म्हणूनही एक अट घातली जात होती. 'कॅस्पिआना' नावाची बोट असलेल्या एका जहाज

कपनीनें ब्रिटिश कोलंबियातून ग्रेटब्रिटनमधील बदरात माल उतरवण्याचे कत्राट घेतलें होतें. पण जहाजाचें समुद्रपर्यटन चालू असताच लडनच्या बदरात संप सुरू झाला. आणि संप किंवा टाळेबदीमुळें 'कॅस्पिआना' उतरण्याच्या बदरात नीट माल उतरवू शकली नाही तर दुसऱ्या सुरक्षित व सोयीच्या बदरात कप्तानाला माल उतरवता येईल अशा प्रकारच्या अटीचा आधार घेऊन कप्तानानें तो माल हॅंबुर्गला उतरवला. नतर तो माल हॅंबुर्गहून लडनला व पुढील बदरात पोचवण्याची बोटीच्या कपनीनें कांहींच व्यवस्था केली नाही किंवा हॅंबुर्ग येथील गुदामाचे भाडें किंवा पुढील ट्रॅन्सशिपमेंटचें भाडेंही दिलें नाहीं. यामुळें आपलें नुकसान झालें असा नाविक निर्यातपत्राचे धारकानें कपनीवर दावा लावला, आणि ग्रेटब्रिटनमधील बंदरातच माल उतरवण्याचा निर्यातपत्रानुसार बोट कपनीनें करार केला असल्यानें दुसऱ्या अटीचा त्याना आधार घेता येणार नाहीं असा कोर्टानें निर्णय देऊन वादीच्या बाजूनें निकाल दिला. त्यामुळें आपली बाजू जास्त भक्कम करण्यासाठीं नाविक कपन्या त्याबाबतची स्वतत्र अट निर्यातपत्रात घालू लागल्या. पण नतर कपनीनें केलेल्या अपिलात वरिष्ठ कोर्टानें निर्यातपत्रधारकाचे विरुद्ध व कपनीचे बाजूनें निकाल दिला व खालील कोर्टाचा निर्णय अग्राह्य ठरवला. त्यानतर नाविक कपन्यानीं कॅस्पिआना अट घालण्याचे बद केलें. कॅस्पिआना बोट प्रकरणीं झालेल्या या मोठ्या वादळामुळें त्या अटीला कॅस्पिआना अट हें नाव पडलें होते.

## शिळें निर्यातपत्र :

माल निर्यात केल्यावर त्याच्यापोटीं बोटीच्या मालकाकडून नाविक–निर्यातपत्र मिळाल्यानतर निर्यातदाराने तें बॅंकेकडे लगेच द्यावें लागतें, कारण माल पोचता व्हावयाच्या बदरात माल नेणारी बोट यायच्या आत तें निर्यातपत्र आणि इतर कागद बॅंकेकडून आयातदाराला मिळणें आवश्यक असतें. निर्यातपत्र मिळण्याचें आत बोट बदरात लागली तर विलबदड गोदीभाडें आणि अन्य खर्च वाढणें अपरिहार्य होतें व त्याची जबाबदारी निर्यातदारावर टाकण्यास आयातदार, प्रवृत्त होणें साहजिक असते. असें निर्यातपत्र वेळेवर

आलें नाहीं तर त्यानंतर तें निर्यातपत्र शिळें (Stale) समजलें जातें. किती दिवसानंतर निर्यातपत्र 'शिळें' समजायचें त्याबद्दल नियम नसून तें माल चढविलेल्या व उतरवल्या जाणाऱ्या बंदरामधील अंतरावर व बोटीनें घेतलेल्या मार्गावर अवलंबून असतें. ज्यावेळेला असें अंतर खूप असतें त्यावेळेला निर्यातपत्र १० ते १५ दिवसानंतर शिळें समजलें जातें. पण अशा दोन ठिकाणामधील अंतर जर कमी असलें तर एकादें निर्यातपत्र ४८ तासानींही शिळें धरलें जाईल. मुंबईहून कालिकत, कोचीन, कलकत्ता, कुवेत, रंगून, कोलंबो या ठिकाणीं जाणाऱ्या मालाचीं निर्यातपत्रें दोन ते पांच दिवसानींही शिळीं समजलीं जाऊं शकतील.

## जहाजाचे हक्क :

निर्यातपत्र हा मालावरील मालकी दर्शविणारा एक महत्त्वाचा कागद आहे. पण बोट बंदरांत सुरक्षित आल्यावरच तो कागद जास्त महत्त्वाचा ठरतो. नौकानयन हे पूर्वीं धाडस समजलें जात होतें आणि कित्येकदा जहाजाला अनिच्छेनें अशा काहीं गोष्टी कराव्या लागतात किंवा काहीं वेळा जहाज अनपेक्षित संकटांतही सांपडतें. त्यांत जहाजाची जबाबदारी किती हें जर ठरविलें गेलें नसतें तर वादग्रस्त प्रसंगीं अनेक वेळा निर्णय घेणें कठीण गेलें असतें. त्यातच मालाची माहिती जहाजाचे कप्तानाला खऱ्या अर्थानें मुळींच नसते. त्यामुळें नाविक–निर्यातपत्र देणाऱ्या जहाजावर काहीं जबाबदारी टाकली गेली आहे. तसेंच त्या जहाजाला जे काहीं हक्क दिले गेले आहेत त्यापैकीं काहीं अन्यत्र उल्लेखिले आहेत. ह्याशिवाय आणखीही काहीं हक्क जहाजाला असतात ते खालील प्रमाणें.

जहाज हें मालाच्या सुस्थितीबद्दल जबाबदार नसतें. मालाचें पॅकिंग ज्या तऱ्हेनें करून त्या जहाजाचे ताब्यांत तो दिला गेला असेल त्याच स्थितींत तो 'कन्साइनी' ला द्यायची त्याची जबाबदारी असते. पण मालांत जर अन्तर्भूत दोष (Inherent vices) असतील तर त्यामुळें होणाऱ्या नुकसानीस मात्र जहाज जबाबदार नसतें. जहाजावर जर काहीं नासकीं

फळे असतील व त्यामुळे इतर फळेंही खराब झालीं तर त्यास कप्तान कांहींच करू शकत नाहीं. इतकेंच नाहीं तर असा खराब माल फेकून द्यावयाचाही त्याला हक्क असतो. त्याचप्रमाणें जहाजातील शीतगृहाची यंत्रव्यवस्था बिघडल्यानें ती व्यवस्था आवश्यक असलेल्या मालाचें नुकसान झाले तर त्याला जहाज जबाबदार नसते.

कांहीं वेळा माल उतरवण्याच्या बदराबाबत बोटीकडून मालधारकाला विकल्प हक्क ( Option Cargo ) दिले जातात. म्हणजे माल, मुंबई किंवा कालिकत किंवा मद्रास इथें अथवा साउदॅम्प्टन, लंडन, ग्लासगो इथें उतरवायचा अशा प्रकारची सवलत असल्यास, त्यातल्या कुठल्याही ठिकाणीं तो उतरून देण्यास सांगण्याचा मालधारकाला हक्क असतो. मात्र तो यातल्या कुठल्या बदरात उतरावयाचा याबद्दलची माहिती जहाजाच्या प्रतिनिधीला जहाज सवलतींतल्या पहिल्या बदरात पोंचण्याचे आधीं अठ्ठेचाळीस तासाचे आंत द्यायला लागते; नाहींतर जहाजाचे कप्तानाला तो माल पहिल्या बदरात किंवा इतर कुठल्याही बंदरात उतरवण्याचा अधिकार राहतो.

तसेंच कांहीं रसायने किंवा तत्सम कमी ज्वलनबिंदु असणाऱ्या वस्तू जहाजाच्या पृष्ठभागावर म्हणजे डेकवर ठेवायला लागतात. त्यासाठीं 'असा माल डेकवर ठेवावा' अशा स्पष्ट सूचना माल चढवताना द्याव्या लागतात. अशा पृष्ठभाग–निर्यातीच्या ( on Deck Shipment ) सूचना नसल्यास जहाजाचे सोईप्रमाणें तो माल कुठेंही म्हणजे डेकवर किंवा डेकखालीं ठेवण्याचा जहाजाला हक्क आहे. सर्वसामान्यपणे कुठलाही माल पृष्ठभागाखालींच ठेवला जातो.

एकाच बदरात अनेकाना कांहीं वेळेला माल पुरवायचा असेल तेव्हां प्रत्येकाचे नावाचे वेगळे निर्यातपत्र कप्तानाकडून घेण्यापेक्षा तो निर्यातदार किंवा त्याचा प्रतिनिधी त्या देशातील आपल्या प्रतिनिधीच्या किंवा शाखेच्या नांवानें एकच निर्यातपत्र काढतो. तो प्रतिनिधी नंतर स्वतःच्या सहीनें दुसरीं वेगवेगळीं निर्यातपत्रें काढून तीं त्या त्या मालधारकाला पाठवतो व कप्तानानें दिलेलें एक निर्यातपत्र आपल्या प्रतिनिधी

किंवा शाखेला पाठवतो. हा प्रतिनिधी सर्व माल सोडवून घेतो व मालधारकांचे निर्यातपत्रावर आमच्या प्रतिनिधीकडून बटवडा घ्यावा असा शेरा असतो त्यांनीं तें सादर केल्यावर तो ज्याचा माल त्याला देऊन टाकतो. अशी 'प्रतिनिधि निर्यातपत्रें' त्यासंबंधीं खास उल्लेख असल्याखेरीज व बँकांना मजूर असल्याखेरीज, हमीपत्राखालीं त्या तीं स्वीकारीत नाहींत.

## चार्टरपार्टी निर्यातपत्र :

ज्या वेळेला एखादा मात्र मोठ्या प्रमाणावर आयात निर्यात करावयाचा असतो त्यावेळेला आयात निर्यातदार सबंध जहाजच्या जहाज भाड्यानें घेतात. बोट कंपनी अशावेळीं एक करार करून सर्व बोटीच्या बद्दल करार करतात. कांहीं वेळा अशी सबंध बोट भाड्यानें घेतल्यावर भाड्यानें घेणारा त्यावून दुसऱ्याचाही माल जागा असल्यास पोटभाडें घेऊन स्वतःचे सहीचें निर्यातपत्र देऊन वाहून नेतो. अशी 'चार्टरपार्टी' निर्यातपत्र हमीपत्राखालीं आयातदाराची खास विनंती असल्याशिवाय व त्याच्याबद्दल भरंवसा असल्याखेरीज बँका सहसा स्वीकारीत नाहींत. कारण पोटभाड्याचा करार हा मूळभाड्याच्या करारापलीकडे जाऊं शकत नाहीं व जहाज भाड्यानें देताना मालकानें काय करार केला आहे, हें 'चार्टरपार्टी' निर्यातपत्र घेणाराला समजणें सुलभपणें शक्य नसतें. कागद, कोळसा, लोखंड, मँगनीज यासारख्या अवजड व मोठ्या प्रमाणावर वाहतुक होणाऱ्या मालाबाबत साधारणतः अशा प्रकारें जहाज भाड्यानें ( चार्टर ) घेतलें जातें.

या प्रकरणात सांगितलेले जहाजाचे हक्क व जबाबदाऱ्या व निर्यातपत्राचा करार या सगळ्या गोष्टींचा विचार करून मग आपल्या हितसंबधाचें संरक्षण करण्यासाठी मालधारक किंवा त्याचा प्रतिनिधी योग्य तो विमा उतरवतो. त्याचा उहापोह पुढील प्रकरणात केला आहे. मात्र जहाजाचे मूळ हक्कास विरुद्ध जातील अशा बाबीबाबत विमा कंपनी संरक्षण देत नाहीं. नाविकनिर्यातपत्रात ज्या धाडसाबद्दल (Adventure) करार केला जातो त्यांतील अनेकविध संभाव्य धोक्यांपासून संरक्षण देणें हें विमापत्राचें काम असतें.

---

## सागरी विमा (Marine Insurance :)

८

व्यापाऱ्याला नाविकपत्रांत जे तीन महत्त्वाचे कागद मिळतात त्यांत विमापत्र (Insurance Policy) हा एक महत्त्वाचा कागद मानला जातो. नौकानयन हें पूर्वीपासून एक प्रकारचें 'धाडस'च समजलें गेलें आहे व आज बोटीनें केला जाणारा व्यापार व प्रवास जरी सर्वसाधारणपणें सुखकर व सुखरूप समजला जात आहे, तरी संरक्षणाचे दृष्टीनें विमापत्र हें ही कुठल्याही निर्यातीचे वेळीं काटली जातेच. कारण मालाची नुकसानी कुठल्या प्रकारें व कधीं होईल हें आजही सागतां येणार नाहीं. पूर्वी मात्र असें संरक्षण देणारा, व्यापाऱ्याला हुडकून काढावा लागे. ज्यावेळेला जहाजानें कांहीं माल योग्य त्या तऱ्हेनें वाहून नेण्याचें बंधन स्वीकारलेलें असतें त्यावेळेला तो तसा नेण्याची जबाबदारी जहाजावर असते. पण एवढ्या जबाबदारीखेरीज अन्य सागरी धोक्यांबाबतची (Marine Risks) खात्री जहाजानें दिली नसते, व त्या धोक्याबद्दल विमापत्र आवश्यक असतें.

### सागरी विम्यांतील तत्त्वें :

कुठल्याही विमापत्रातलें पहिलें तत्त्व हें आहे कीं संपूर्णपणें विश्वासावरच आधारलेला असा तो एक करार आहे आणि या कराराचा भंग बुद्ध्या झालेला आढळल्यास दुसऱ्या बाजूस तो करार बंधनकारक नाहीं असें ती मांडूं शकते. सागरी विमापत्रांतही अर्थातच हे तत्त्व अंतर्भूत आहे. सागरी विम्याबाबतचा असा करार करतांना विमा कंपनी आणखी दोन गोष्टीही अभिप्रेत धरते; त्या म्हणजे ज्या जहाजांतून माल वाहतूक केली जाईल ते नौकानयनास पात्र (Sea-worthy) आहे व त्यांतून केला जाणारा व्यापार हा संपूर्णपणें कायदेशीर आहे. याबाबतचा आणखी उल्लेख पुढें वेगळ्या संदर्भांत येईलच. जहाजानें माल पाठवतांना

उतरताना लागणारा सागरी विमा हा निर्यातदार किंवा आयातदार कुणीही उतरवू शकतो व त्याला ज्या ज्या धोक्यापासून सरक्षण हवें असेल त्या त्या बद्दलचा तो विमा घेऊ शकतो. सर्वसाधारण सागरी विमा-पत्र हें मूलभूत सागरी धोके व युद्ध याचा विमा देते. पण यात अनेक गोष्टींचा अतर्भाव होत नाहीं त्याचा, पाहिजे असल्यास स्वतत्रपणें, विमा उतरवावा लागतो व त्यासाठीं वेगळा आकार असतो. सर्व-साधारण विमापत्र खालील बाबींबद्दल सरक्षण देत नाहीं. चोरी, उचलेगिरी, माल न मिळणें, सप, दगेधोपे, युद्ध, विस्तृत सरक्षण वगैरे, मात्र याबद्दल वेगळ्या अटींचा आकार दिल्यास सरक्षण मिळतें. मालातील तदगभूत अगदोषा (Inherent vices) बद्दल मात्र विमापत्र किंवा नुकसान-भरपाई मिळत नाहीं. किंबहुना तो विश्वासभग समजला जातो.

विमापत्रात ज्या तीन तत्त्वाचा समावेश गृहीत धरला जातो, त्यातील जास्तींत जास्त विश्वासाच्या तत्त्वाचा वर निर्देश झाला आहेच. त्याखेरीजच्या तत्त्वात पॉलीसी घेणाऱ्या विमेदाराला, ज्या मालाचा विमा उतरवला जात आहे त्यात स्वारस्य असावें लागतें हेंही एक महत्त्वाचें तत्त्व आहे.

असें विमास्वारस्य (Insurable Interest) नसल्यास कुणा-लाही विमा उतरवता येणार नाहीं. त्या मालास दुर्दैवानें जी नुकसानी पोंचेल त्यात ज्याचे नुकसान होणार असेल तीच व्यक्ति विमा उतरवू शकते. मालाचा खरेदीदार, विक्रेता, त्यावर पेसे देणारी बँक वा धनको, किंवा ज्याला तो माल विकत घ्यायचा आहे असा व्यापारी, हे सगळे विमेदार होऊ शकतात.

विमा उतरवताना विमा कपनी आणखी एक जें तत्त्व गृहीत धरते तें हें कीं विमेदार विमापत्र फायदा करण्यासाठीं पॉलिसी घेत नाहीं, तर फक्त नुकसान झाल्यास त्यापासून सरक्षण मिळावें याच उद्देशानें घेत असतो. विमापत्रातील सरक्षणाचें तत्त्व हें फार महत्त्वाचें आहे. पॉलिसी देताना, विमा कपनी, विमेदाराला पूर्वस्थितीवर न्यायचें मान्य करते येवढाच त्याचा अर्थ

आहे. अर्थात् मालाच्या किंमतीच्यावर दहा टक्के (सर्वसाधारणपणें) असा संभाव्य नफा घालून व्यापारी घेतात. ती मात्र या तत्वाविरुद्ध धरीत नाहींत तर रूढीप्रमाणें ती सर्वमान्य समजली जाते. कारण या दहा टक्क्या तून हमीपत्र उघडण्याचा क्लिअरिंग एजंट्सचा खर्च वगैरे वरीचशी रक्कम जात असते. तसेंच कांहीं वेळेला अशा मालावर जकातही भरावी लागते तेव्हा त्याचेंही जास्त किंमत घालून विमाकंपनीकडून संरक्षण मिळते. कारण त्यातही विमेदाराला नफ्याऐवजीं, नुकसानीपासून संरक्षण देण्याचीच कल्पना अभिप्रेत आहे.

त्याचप्रमाणे ज्या नुकसानीचें संरक्षण विमापत्रद्वारा कंपनी देते तें नुकसान संरक्षित बाबीच्या प्रकारच्या धोक्यामुळेंच व्हावें लागतें किंवा नुकसानीस कारणीभूत झालेलें तें शेवटचे कारण (Proximate Cause) असावें लागतें. एकादी बोट भोंक पडून व पाणी आत येऊन बुडाल्यास तिची नुकसान भरपाई देण्याचे विमा कंपनीनें मान्य केली असेल तरी टॉर्पेडो लागल्यामुळें जर एकादी बोट भोक पडून व पाणी आत गेल्यामुळें बुडाली व त्यानेंळीं बोट बुडण्याचें शेवटचें खरें कारण पाणी आत शिरणें हेंच होतें व त्यामुळेच ती बोट बुडाली असें सांगितलें गेलें तर कंपनी तें मत ग्राह्य धरणार नाहीं, तर टॉर्पेडो लागणें हेंच बोट बुडण्याचें खरें कारण धरील, व विमेदाराची नुकसान भरपाईची मागणी फेटाळून लावील. ज्या योगें नुकसान पोचले त्या शेवटचे कारणाबद्दलच नुकसान भरपाईची हमी जर विमापत्रानें दिली असेल तरच ती मागणी मान्य होऊं शकते. हे शेवटचें कारण केवळ वेळेच्या अनुक्रमावर अवलंबून नसून तें महत्त्वाचें, खरें व प्रत्यक्ष नुकसानीस कारणीभूत होणारेंच कारण असावें लागतें. म्हणून टॉर्पेडो लागणें व पाणी आत घुसणे यातील वेळेच्या क्रमानें पाणी आत जाणें हें शेवटचें कारण सकृद्दर्शनीं दिसले तरी महत्त्वाचें खरें, प्रत्यक्ष नुकसानीस जबाबदार असें कारण टॉर्पेडो लागणें हें आहे हेंच धरलें जाईल. असें कारण हुडकताना कारणपरंपरा किंवा त्याची साखळी लावून शेवटचें कारण हुडकणें व तें ग्राह्य धरणें यात सर्वसामान्य ज्ञानाचीच कसोटी लावली जा

## सर्वसाधारण संरक्षण अटी :

जहाजाचा मालक मुख्यतः खालील गोष्टींबद्दलची जबाबदारी स्वीकारीत नाहीं व त्यासाठीं विमापत्र आवश्यक ठरतें. सर्वसाधारण विमापत्रांत सामान्यपणें समुद्रप्रवास करीत असतांना होऊं शकणाऱ्या नुकसानीपासून व माल पोंचेपर्यंत युद्धापासून संरक्षण मिळतें. त्यांत खालील गोष्टींचा समावेश होतो.

( १ ) सागराचे धोके ( Perils of the sea )—यांत सर्वसामान्य नुकसानीचा अंतर्भाव होत असला तरी सागरी धोके म्हणजे नक्की कोणते धोके याचे कुठेच खुलासे केले गेलेले नाहींत.

(मात्र यांत नैसर्गिक रीत्या होणाऱ्या वाऱ्यांचे वा लाटांचे परिणामाबाबतचें संरक्षण विमा कंपनीकडून मिळत नाहीं ).

( २ ) जहाजावरील कप्तान, खलाशी यांनीं केलेला कामचुकारपणा, हेळसांड वगैरे.

( ३ ) आग. यांत वस्तूच्या अंगभूत दोषामुळें आग लागल्यास तिचा समावेश केला जात नाहीं.

( ४ ) नौकानयनीय पाणी व समुद्रजल ( Navigable Waters ) मात्र यांत प्रत्यक्ष समुद्रजलाचा मालावर होणारा परिणाम अंतर्भूत नाहीं.

( ५ ) युद्ध.

( ६ ) सार्वजनिक शत्रूपासून होणारे अपाय.

( ७ ) राजेरजवाडे लोकांकडून होणारी अटक किंवा कायद्यान्वयें केलेली धरपकड.

( ८ ) चांचे लोकांपासून होणारें नुकसान.

( ९ ) कप्तानास जरूर वाटल्यास माल समुद्रास्तुप्यन्तु करण्याची जरूरी.

या सर्व बाबींपासून नुकसानभरपाई मिळण्याची सोय विमा कंपन्यांकडे आहे.

याखेरीज अन्य काहीं संभाव्य नुकसानीच्याबद्दलही मालधारकाला संरक्षण मिळवतां येतें. त्या गोष्टी खालीलप्रमाणें आहेत.

( १ ) मालाच्या कारखान्यापासून तें मालधारकाच्या गुदामापर्यंत होणारें वाहतुकींतील कुठलेही नुकसान.

( २ ) जहाजानें आपला मार्ग बदलल्यास व माल वेळेवर न पोचल्यास होणारें नुकसान.

( ३ ) संप, टाळेबंदी, नागरी बंडें वगैरे (Strike, Riots & Civil Commotion)

( ४ ) बंदरात माल उतरल्यावर जहाजाची जबाबदारी काहींही रहात नाहीं, त्यावेळेपासून मालधारक माल उचलेपर्यंत युद्ध सुरू झाल्यास, युद्धजन्य नुकसान.

( ५ ) चोऱ्यामाऱ्या अप्रदान म्हणजेच माल न मिळणें किंवा कमी मिळणें (Theft, Pilferage, Non-Delivery or Short Delivery)

( ६ ) जहाजामध्येंच बिघाड वगैरे झाल्यास, तसेंच खलाशांमध्यें असंतोष पसरल्यास किंवा जहाज वाचवण्यासाठीं कांहीं माल समुद्रार्पण करावा लागल्यास त्यामुळें होणारें नुकसान.

( ७ ) हुक्स, तेल (Oil) स्वच्छ पाणी (Fresh water), चिखल (Mud), इतर मालाच्या संसर्गामुळें होणारें नुकसान (Contact with other Cargo)

उदा. :—चामड्यावर समुद्रपाण्याचा परिणाम होऊन त्याच्या खराबीमुळें त्या जवळचीं फळे खराब झाल्यास किंवा तिथें असलेल्या तंबाखूला ती घाण लागल्यास व त्यामुळे वापरण्यास अयोग्य ठरल्यास होणारें नुकसान.

(८) फुटतूट व गळती.

(९) दोन जहाजाची टक्कर झाल्यास होणारे नुकसान

(१०) उदीर वा अन्य प्राणी, किडे, उष्णतामान, घाम (Rats, Vermins, Heating, Sweat) यापासून होणारे नुकसान.

(११) शीतयंत्रात बिघाड होऊन नुकसानी पोचल्यास

या खास प्रकारच्या संरक्षणाखेरीज आणखी अधिक सरक्षण हवें असल्यास व विमाकंपनी त्याला तयार असल्यास मालधारक तसा विमा उतरवू शकतो

## अंशात्मक व पूर्ण संरक्षण :

विमा उतरवताना वरील प्रकारच्या सरक्षणाचा विचार केल्यानंतर किती प्रमाणात नुकसानीचें सरक्षण घ्यावयाचें हेंही ठरवावें लागतें काहीं काहीं मालाचे बाबतींत नुकसानीची शक्यता कमी असते किंवा काहीं बाबतींत जहाज एका विशिष्ट टक्क्यापर्यंत नुकसानभरपाई देत नाहीं. (उदा० –लोखंडी कांबी, गर्डर्स सारख्या अवजड वस्तू, धान्यें, मासे, साखर, तंबाकू, वाख, कातडीं अशासारख्या वस्तू, अशा वेळीं अंशत सरक्षण घेतलें जातें. (F P A ) पण सर्वसामान्यपणें बहुतेक मालाचे बाबतीत पूर्ण सरक्षण (W A किंवा W P A ) घेतलें जातें). अंशत सरक्षण देणाऱ्या विमापत्राचा सरक्षणाकार अर्थातच थोडासा कमी असतो. या दोन्ही प्रकारच्या सरक्षणातील फरक पुढें दिला आहे. Free of Particular Average तसेच With Average किंवा With Particular Average या शब्दप्रयोगातून पॉलिसींत ॲव्हरेज (Average) हा शब्द वापरला गेल्याचें दिसतें. विम्याबाबत बोलताना General Average हा शब्दप्रयोगही ऐकण्यात येतो. Average म्हणजे सर्वसामान्यपणें नुकसान. या नुकसानीबद्दलही विम्याचें एक तत्त्व आहे. माल जर शंभर रुपयाचा असला आणि विमा जर कमी किंमतीचा म्हणजे पन्नास रुपयापुरता उतरला असला तर अशा वेळीं पन्नास रुपयाचेंच

नुकसान झालें तरी विमेदाराला संपूर्णपणें पन्नास रुपये नुकसानभरपाई मिळत नाहीं. तर त्यानें पन्नास टक्क्यांपुरतेंच संरक्षण मागितलें असें समजून त्याला २५ रुपयेच म्हणजे विमापॉलिसीच्या टक्क्याच्या प्रमाणांतच भरपाई मिळेल. कुठल्याही मालाचा कुठलाही विमा—मग तो सागरी असो किंवा अन्य प्रकारचा म्हणजे आगीचा, चोरीचा वगैरे असो, तो पूर्ण किंमतीइतका म्हणजे १०० टक्क्यांपर्यंत उतरवण्याचें कारण हेंच असतें. विशेषतः सागरी विम्याचे बाबत तर किंमतीपेक्षांही सुमारें सर्वसाधारणपणें १० टक्के जास्त विमा उतरवतात. किंवा आयात मालावर जर कांहीं जकात असेल तर मूळ किंमत आणि जकातीसाठीं तीसचाळीस टक्के जास्त असा खुलासा देऊन विमा उतरवतां येतो.

## सार्वजनिक नुकसान :

ॲव्हरेज बाबत विमापत्रांत दोन गोष्टींचा विचार करावा लागतो. पहिली गोष्ट म्हणजे सार्वजनिक नुकसान (General Average) व दुसरी गोष्ट म्हणजे-विशिष्ट प्रमाण नुकसान (Perticular Average) सार्वजनिक नुकसान ही एक पूर्वापार चालत आलेली प्रथाच आहे, व तिला एक खास स्थान आहे. जहाजास जर एकादे वेळीं कांहीं धोका प्राप्त झाला तर सर्व जहाजाचें, सर्व मालाचें किंवा त्यावरील व्यक्तींचें संपूर्ण नुकसान होऊं नये म्हणून जहाजाच्या कप्तानाला आपण होऊन कांहीं अनपेक्षित खर्च किंवा त्याग जाणून बुजून करावा लागतो व कांहीं माल फेकून देऊन जहाजावरील जास्तींत जास्त मालाची व माणसांची सुरक्षितता वधावी लागते. उदाहरणार्थ, जहाजास आग लागली असल्यास ती वाढूं नये म्हणून ज्वालाग्राही पदार्थ किंवा आगीस बळी पडणाऱ्या वस्तूजवळील माल किंवा पाणी आंत शिरूं लागल्यास वजन वाढूं नये म्हणून अशा वेळीं कप्तानाला योग्य वाटेल तो कुठलाही माल किंवा हातीं लागेल तो माल 'समुद्रास्तृप्यन्तु' करावा लागतो. आणि अशा प्रसंगावधानाचे वेळीं ज्यावेळेला कप्तान असा माल बोटीबाहेर फेंकून देतो तेव्हां त्याला प्रक्षेप (Jettison) असें म्हणतात. अशा वेळीं ज्याचें नुकसान होतें त्याची भरपाई

उरलेल्या मालाच्या मालकांनीं व बोटीच्या व प्रवास भाड्याच्या हक्कदारांनीं करावयाची असते. 'सर्वांच्या हितासाठीं सारखा त्याग' हें तत्त्व या प्रथेमार्गे आहे. संकटांत सांपडलेल्या जहाजाची, त्याला मिळालेल्या प्रवास भाड्याची व जहाजावरील मालाची (The Ship, The Freight, and The Cargo) समजा जर सहा लाख रुपये किंमत असली व असा समुद्रार्पण झालेला माल जर ७५००० रुपये किंमतीचा असला तर त्याच प्रमाणांत प्रत्येकाला तें नुकसान सोसावें लागेल. म्हणजे सहा लाख रुपयांवर ७५ हजारांचा तोटा सारख्या प्रमाणात वाटला जाईल, व या उदाहरणांतील वांचलेल्या सव्वापाच लाख रुपये जिंदगीच्या मालकाकडून ७५००० रुपये किंमतीचें नुकसान पोचलेल्यांना ७/८ इतकी नुकसानभरपाई मिळेल कारण त्यांना स्वतःलाही १/८ इतक्या नुकसानीचा वाटा स्वतःचा म्हणून सोसावाच लागेल. या प्रकारांत कुणालाही फायदा करून घेता येत नाहीं. विम्यांतील मुख्य तत्त्व भरपाई (Indemnity) हें असतें, नफा मिळवणें नसतें, हें इथें दिसून येईल. अशा सार्वजनिक नुकसानीची झालेली ही रक्कम जहाजाचा मालक सगळ्यांकडून गोळा करतो व मग विमा कंपनीकडून प्रत्येकाला आपली रक्कम हक्क शाबीत करून घ्यावी लागते.

## विशिष्ट प्रमाण नुकसान :

*कांहीं वेळा मालाचें कांहीं प्रमाणांतच जें नुकसान होतें व जें वरील* प्रकारच्या नुकसानीसारखें नसतें त्याला विशिष्ट प्रमाण नुकसान म्हणतां येईल. हें नुकसान प्रासंगिक असतें. कित्येकदां हें नुकसान मालाच्या काहीं भागास पोचते, किंवा मालाचा कांहीं भाग संपूर्णपणेंही नष्ट होतो. उदाहरणार्थ दहा पोत्यांतील प्रत्येक पोत्याचें नुकसान १०% प्रमाणात होईल अथवा दोन पोत्यांचें संपूर्णच नुकसान होईल. अशा वेळीं ह्या तऱ्हेचें नुकसान भरून देणारी पॉलिसी असली तर मालकाला नुकसान पोचत नाहीं. सर्व-साधारण पॉलिसीवर ज्या अटी छापल्या असतात त्यात कांहीं टक्क्यापर्यंत अमक्या अमक्या मालाबाबत नुकसानभरपाईपासून मुक्त असें छापलेलें असतें. या तऱ्हेची नुकसानी सहसा मोठ्या (Bulky) मालाबाबत होते, व अशी

अट पॉलिसीवर असल्यास तितक्या टक्क्यांपर्यंत कंपनी भरपाई देण्यास बांधलेली नसते. साखर, चाख, तंबाकू, कातडी वगैरे माल जर पांच टक्क्यापर्यंत विशिष्ट नुकसानभरपाईतून मुक्त असा शेरा विमापत्रावर असेल तर पांच टक्क्याचेपर्यंत मालाचे मालकाला स्वतः नुकसान सोसावें लागेल व विमाकंपनी कांहींही भरपाई देणार नाहीं. पण असें नुकसान जर पांच टक्क्याचेवर म्हणजे समजा ६% झालें तर मात्र त्यांतून ५% वजा करून एक टक्काच नुकसानभरपाई विमाकंपनीकडून मिळेल असें नाहीं तर संपूर्णपणे सहाच्या सहा टक्के नुकसानभरपाई मिळेल त्याचप्रमाणें समजा ५० कापसाच्या गांठी असल्या व त्यांतील एकदोन गांठी. सबंधच्या सबंध ट्रॅन्सशिपमेंट किंवा माल चढवण्या–उतरवण्याचे ( लोडिंगअनलोडिंगचे ) वेळीं हरवल्या किंवा मिळाल्या नाहींत तरीही विशिष्ट प्रमाण नुकसानीच्या अटीप्रमाणें त्या गांठीची नुकसानभरपाई मिळते. म्हणजे असें संपूर्ण नुकसान मग तें एकाचा बोजाचे जरी झालें तरी तें भरून मिळण्याची अंशात्मक संरक्षणाच्या विमापत्रात सोय आहे. तसेंच जहाज मध्येंच कुठेतरी अडकलें ( Stranded ) किंवा बुडालें किंवा जळालें (Sunk or Burnt) तरीही विशिष्ट प्रमाण वगैरे लक्षांत न घेतां या विमापत्रान्वये संपूर्ण संरक्षण व नुकसानभरपाई मिळते. कांहीं कांहीं मालाबाबत विशिष्ट प्रमाण नुकसानी पासून अलिप्त राहिल्याचे विमापत्रान्वयें जाहीर केल्यानें कंपनीला किरकोळ भरपाई हक्काबद्दल फार त्रास घ्यावा लागत नाहीं. अशा विशिष्ट प्रमाणापर्यंत कुठला माल किती मुक्त आहे त्याची नोंद सर्वसाधारण विमापत्रांत शेवटीं केलेली असते व तेंही नुकसान सोसावयाचे नसेल व त्यापासून संरक्षण हवें असेल तर विमेदाराला तशी जादा अट असलेलें विमापत्र मागावें लागतें.

## विमापत्रांतील अन्य अटी :

विमापात्र व्यक्तीला ( अशा संज्ञेत ठिकठिकाणीं संस्थाही अन्तर्भूत समजल्या आहेत ) आपल्या मालाचें कसेंही नुकसान झालें तरी त्याची भरपाई हवी असल्यास सर्वसाधारण विमापत्रा (Standard Policy) शिवाय आणखी कांहीं संलग्न अटी असलेल्या प्रकारचा (Cargo clauses) विमा

घ्यावा लागतो. अशा खास अटींनीं त्याचे हितसंबधाचें नीट सरक्षण होतें. चोरी, उचलेगिरी व अप्रदान (Theft, Pilferage, Non Delivery) संप, दगेधोपे व अतर्गत बडाळी (Strike, Riot and Civil Commotion) युद्धधोका व विस्तृत सरक्षण (Extended Cover) या अटींच्या योगाने त्याचा हा कार्यभाग होऊ शकतो, मात्र यात जहाजावरील नोकर किंवा उतारूकडून चोरी झाल्यास त्याबद्दलचें सरक्षण मिळत नाही. किलेकदा सर्वांगीण धोक्यांचे (All Risks) विमापत्रही मागितलें जातें व असें विमापत्र मागितल्यावर आपणाला ज्ञात, अज्ञात सर्व प्रकारच्या नुकसानीपासून सरक्षण मिळेल अशी विमेदाराची कल्पना होते पण सर्वांगीणधोका हा शब्द गोंधळांत टाकणारा आहे. त्याचा वेगवेगळ्या देशात वेगवेगळा अर्थ होऊ शकतो व त्यामुळें असें विमापत्र सहसा टाळावें व आपल्याला नक्की कुठल्या कुठल्या शक्य वाटणाऱ्या नुकसानीपासून सरक्षण हवे ते सागून त्या तऱ्हेचें विमापत्र मागावें. असे सर्वांगीण अर्थाचे शब्द जेव्हा काहीं विमापत्रांतून वापरले जातात तेव्हा त्याचा खरा अर्थ विमापत्रात दाखवलेले धोके व तत्सम किंवा त्याच प्रकारचे समजले जाऊ शकणारे धोके (Risks of the same type) असा होतो. यानतर विमापत्रात वेगवेगळ्या कुठल्या अटी घालून मागता येतील त्याचा विचार करणें इष्ट ठरेल.

**गुदामापासून-गुदामापर्यंत** (Warehouse to Warehouse clause)

नौकानयनीय मालाचा पूर्वी जेव्हा विमा उतरवला जात होता, तेव्हा जहाज माल भरलेल्या बदरापासून ते माल उतरवला जाण्याच्या बदरापर्यंत पोचेपर्यंत व त्या बदरांत माल सुरक्षितपणें उतरला जाईपर्यंत त्याच्या नुकसानीची हमी घेतली जात होती पण किलेकवेळा आयात दार हा बदरापासून दूर, अतर्गत भागात रहात असेल तर एवढेंच सरक्षण अपुरें ठरतें व अशा वेळीं त्याला त्याच्या निवासस्थानापर्यंत किंवा कारखान्यापर्यंत तो माल पोंचेपर्यंत असें सरक्षण असणें आवश्यक असतें. अशावेळीं 'गुदामापासून ते गुदामापर्यंत' (Warehouse to Warehouse) अशी अट घालून माल तयार करणाराच्या / विकणाऱ्याच्या निघण्याच्या ठिकाणापासून

तें आयातदाराच्या / खरेदीदाराच्या दारापर्यंत, असे सरक्षण त्या मालाच्या नुकसानीबद्दल मिळू शकतें. हल्लीं याच प्रकारचें सरक्षण, विस्तृत सरक्षणाची (Extended Cover) अट घालून घेतात. ज्या वेळेला अशी अट विमापत्रात घातलेली असते त्या वेळेला माल निर्यातीच्या बदरात पोचेपर्यंत व त्यानतर साठ दिवस त्या बदरात सरक्षण मिळतें. गुदामापासून गुदामापर्यंत अशी अट घातलेली विमापॉलिसी असल्यास जहाज बदरात पोचल्यानतर पुढच्या सरक्षणाची मुदत, बदरातच आयातदार रहात असेल तर पधरा दिवस व अतर्गत भागात रहात असेल तर ३० दिवस इतकी असते पण या अटीपेक्षा विस्तृत सरक्षणाच्या अटीनें जास्त सरक्षण मिळतें म्हणून ही अट घालून विमापत्र काढण्याची प्रवृत्ति आता वाढत आहे. मात्र हे सरक्षण केवळ अपरिहार्य परिस्थितीत माल सोडवता न आल्यासच मिळू शकतें. पैसे न भरता, किंवा केवळ दिरंगाई, निष्काळजीपणा, यामुळें माल पडून राहिला व नुकसान झालें तर त्याची भरपाई कपनी देत नाहीं गुदामापर्यंतचे किंवा विस्तृत सरक्षण घेणाऱ्यानें हे लक्षात घेऊन, माल सोडवून घेण्याची नेहमींच त्वरा केली पाहिजे.

## युद्धजन्य संरक्षण :

सर्वसाधारण नाविक-विमापत्रान्वयें जलजन्य व युद्धजन्य नुकसानीबद्दलचें सरक्षण मिळतेंच पण अशा विमापत्रातील युद्धाबाबतचें सरक्षण, जहाज पोचेपर्यंत युद्ध सुरू झाल्यासच असतें. निर्यातीच्या बदरात माल पोचल्यानतर मग युद्धाबाबतचें सरक्षण सपतें. पण जहाज बदरात पोचल्यानतर तो माल तिथेंच पडलेला असता किंवा बदरापासून खरेदीदाराच्या दारापर्यंत जाईपर्यंतही युद्ध सुरू होऊन त्यास नुकसानी पोचणें शक्य असतें. या नुकसानीच्या सरक्षणासाठीं स्वतत्रपणें युद्ध-सरक्षणाची अट (Institute War Clause) घालून विमापत्र घेतात, व या सरक्षणाबद्दल घेतला जाणारा रक्षणनिधी हा वेगळा असतो. विमापत्रासाठीं द्यावा लागणारा सरक्षणाकार (Premium) हा सर्व बाबतींत सर्वसारखा नसून तो प्रत्येक कपनी धोक्याच्या प्रमाणावर

वेगवेगळा ठरवीत असते. मात्र दोन महायुद्धांतील वाईट अनुभवांमुळे सर्वसाधारण विमापत्रावरील युद्धसंरक्षणाबाबत हल्लीं, 'शत्रूपक्षाकडून काबीज केलें गेल्यास वा विध्वंसिले गेल्यास जर नुकसान झालें तर त्यापासून मुक्त' असें कलम असणारी चिठ्ठी त्या विमापत्रावर लावून मूळ विमापत्रांतील ही शर्त जवळजवळ रद्दच केलेली असते. सर्वसाधारण विमापत्र, आंतरराष्ट्रीय ठरावानुसार, अफू व तत्सम, धोक्याच्या वस्तूबद्दलही निर्यातदारानें तसा स्पष्ट व स्वतंत्र उल्लेख केलेला नसल्यास, जबाबदारी घेत नाहीं व असा उल्लेख केला जातो तेव्हां तो निर्यात व्यवहार कायदेशीर होत आहे कीं नाहीं हे बघण्याची विमा कंपनी काळजी घेते.

## यॉर्क-अँटवर्पचे नियम :

नाविक विम्याचा व्यवसाय हा फार पूर्वकालापासून चालत आला आहे. त्यात एकसूत्रीपणा यावा म्हणून जे प्रयत्न केले गेले त्यांत सन १८६४ च्या यॉर्क परिषदेचा उल्लेख महत्त्वाचा ठरेल. या परिषदेने सागरी विम्याबाबत दुमत होऊं नये म्हणून त्यावेळीं सर्वमान्य होतील असे कांहीं नियम ठरवले. पुढें १८९० सालीं ॲंटवर्प येथें याच प्रकारची आणखी एक परिषद झाली व तिनें पूर्वीच्या नियमावरून पुन्हां एकदा हात फिरवल्यानंतर ते नियम यॉर्क-अँटवर्प नियम या नांवानें ओळखले जाऊं लागले. १९२४ सालीं स्टॉकहोम येथें या नियमांत थोडे फेरबदल करण्यांत आले व १९५० सालीं ॲम्स्टरडॅम येथेंही त्यांत दुरुस्त्या करण्यांत आल्या. दोन वा अनेक देशांतील निर्यातव्यवहार सागरमार्गानें करावयाचा असतांना निर्यातपत्रें, विमापत्रें, वगैरे कागदपत्रांबद्दल अशी एकवाक्यता असणें जरूरीचें आहे हें उघड आहे.

## विमापत्रांचे प्रकार :

मालाचें विमापत्र हे निगोशिएबल असतें व एंडॉर्समेन्टनें त्याची मालकी इतर निगोशिएबल दस्तऐवजाप्रमाणें वर्ग होऊं शकते. सागरी विमा पत्राचे दोन प्रकार पडूं शकतील (१) मालाच्या ठराविक किंमतीचे

(Valued) ( २ ) किंमत न ठरवलेले (Unvalued). तसेच एका प्रवासापुरतें (Voyage Policy) दिलेलें विमापत्रही असूं शकतें व अनेक प्रवासांसाठीं संरक्षण देणारें खुलें विमापत्रही असूं शकतें ( Open Cover Policy ). खुली विमा पॉलिसी हा तरल्या विमापत्राचाच (Floating Policy) एक प्रकार म्हणतां येईल. खुले विमापत्र देतांना फक्त संरक्षण दिल्याचें एक करारपत्र दिलें जाते व नंतर वेगवेगळ्या प्रवासाचें संरक्षण जाहीर केले जाते.

निर्यात मालाचें विमापत्र काढीत असतांना बहुधा किंमतीचा उल्लेख असलेलें विमापत्र काढलें जातें. पण प्रत्येक विमापत्र असें किंमतनोंदीचें (Valued) असलेंच पाहिजे असें नाहीं. मात्र ज्यावेळीं किंमतनोंदीचें विमापत्र असेल त्यावेळेला विमेदाराला पूर्वी सांगितलेले अपवाद सोडल्यास मालाच्या किंमतीपेक्षां जास्त किंमतीचा विमा उतरवतां येत नाहीं. कारण ती विमा कंपनीची फसवणूक ठरेल व त्यामुळें तो करार रद्दबातल होण्याचा संभव राहील. मालाच्या शंभर टक्केच विमा उतरवला पाहिजे असेंही बंधन विमेदारावर नाहीं. पण कमी किंमतीचा विमा उतरवल्यास त्यांस नुकसान पोचल्यास टक्केवारीनेंच भरपाई घ्यावी लागते, हें मागें नमूद केलें आहेच.

तरत्या विमापत्रांत विम्याच्या सर्वसाधारण अटी दिलेल्या असतात. अशा विमापत्रांत जहाजाचें नांव, मालाचे वर्णन वगैरे गोष्टी नसतात. असें विमापत्र कांहीं ठराविक रकमेचें वा ठराविक मुदतीचें असते. या मुदतींत त्या मर्यादेपर्यंत माल पाठवून, मग विमा उतरवणारानें जहाजाचें नांव, मालाचें वर्णन व किंमत यांचा तपशील विमाकंपनीस पुरवण्याचें बंधन असतें. असा तपशील आल्यानंतर विमाकंपनीकडून तें जहाज, तो माल व ती किंमत याबाबत संरक्षण दिल्याचें सांगणारें प्रमाणपत्र दिलें जातें किंवा त्या रकमेची व त्या प्रवासापुरती नवीन पॉलिसी दिली जाते.

कित्येकदां अनेक आयातदार १२ महिन्यांचें तरतें विमापत्र काढतात. त्यांत विमाकंपनीनें कुठल्या नुकसानीबाबत संरक्षण दिलें

आहे, याचा उल्लेख असतो. पण प्रत्येक वेळीं माल रवाना झाल्यावर लगेच त्याच्या रवानगीची जाणीव देण्याचें बंधन जिमेदारावर असतें. कित्येक वेळा अशी माहिती प्रत्यक्ष नुकसान झाल्यानंतरही कंपनीला मिळण्याची शक्यता असते. तरी पण ती कंपनीला स्वीकारावी लागते. कित्येकदा अशा विमापत्रांत कुठला माल पाठविला जाईल त्याची नोंद नसल्यानें संरक्षणाकाराबाबतही मोघमच उल्लेख असतो व दरवेळीं मालाचा प्रकार बघून असा संरक्षणाकार आकारला जातो. मुक्त वा तरत्या विमापत्रांत कित्येकदा विमाकंपनी आपल्या हितसंबंधाचे जपणुकीसाठीं एकावेळीं एकाच जहाजातून किती कमाल मर्यादेपर्यंत माल पाठविता येईल त्याची अट घालते. तर कित्येकदा एकाच ठिकाणाहून जास्तींतजास्त किती माल जाईल त्याचेंही बंधन घालते. ( Bottom Clause and Location Clause. ) मात्र निर्यातीचा माल ज्या बंदरात उतरावयाचा आहे त्या बंदरात माल साचला व कमाल मर्यादेबाहेर गेला तर तिथे स्थलनिर्बंध बंधनकारक नसतो तर तो फक्त माल पाठवण्याच्या म्हणजे प्रत्यक्ष निर्यात व्हावयाच्या बंदरापुरताच असतो. त्याचप्रमाणे फ्लोटींग पॉलिसी देताना एका विशिष्ट तऱ्हेच्या जहाजातूनच माल निर्यात झाला पाहिजे, किंवा त्या जहाजाबद्दलची विमा कंपनीची खात्री पाहिजे, अशीही अट विमा कंपनी घालते. उदा असे जहाज, पंचवीस वर्षांपूर्वी बांधलेले नसावें अशा प्रकारची ती अट असू शकते. किंवा लॉईड्स रजिस्टर मध्यें त्या जहाजाची नोंद पाहिजे अशीही ती असू शकते. तसेच फ्लोटींग पॉलिसींत एका वेळेला किती किंमतीचा जास्तींतजास्त माल एका सहलीत पाठवला गेला पाहिजे याबद्दलचेंही बंधन विमाकंपनी नुकसान कमी होण्याचे दृष्टीनें घालू शकते. या दोन्ही प्रकारच्या अटींना Classification Clause व Valuation Clause म्हणतात. या सर्व अटींचा उद्देश विमाकंपनीची जोखीम निष्कारण वाढू नये हाच असतो.

तरत्या विमापत्राप्रमाणें मुक्त संरक्षणपत्र (Open Cover Policy) हाही विमापत्राचा एक प्रकार असतो. या प्रकारात प्रत्येक निर्यात

जाहीर केल्यावर स्वतंत्र विमापत्र दिलें जातें. या प्रकारांत संरक्षणाकार तर त्या विमापत्राप्रमाणें मोघम रहात नाहीं. तर त्याबाबतचा नक्की दर सांगितला जातो. मात्र असा दर विमापत्र काढतेवेळीं ठरवला गेला तरी प्रत्यक्ष संरक्षणाकार मात्र दर निर्यातीचे वेळीं दिला जातो. मुक्त संरक्षण विमापत्रांत कुठून कुठे प्रवास होईल त्याचेही बंधन नसते. पण Bottom, Classification व Location Clauses मात्र त्यांतही नमूद केलेले असतात.

ज्या वेळेला तरतें विमापत्र काढलें जातें, त्या वेळेला तें नाविक दस्तऐवजांना जोडतां येणें शक्य नसतें. अशा वेळीं प्रत्येक निर्यातीचे वेळीं एक विमा जाहीर करणारें प्रमाणपत्र दिलें जातें. मात्र असें प्रमाणपत्र निगोशिएबल नसतें. त्यामुळें अनेकदां हमी–पत्राचे व्यवहारांत त्याचा उपयोग होत नाहीं. त्याचप्रमाणें या प्रमाणपत्रांना तिकिटेंही लावलेलीं नसतात (Unstamped). मात्र अशा प्रमाणपत्रांत मूळ तरत्या विमापत्राचा उल्लेख असतो व तें योग्य अशा अधिकृत व्यक्तीनें सही करून द्यावें लागतें. मोठमोठ्या कपन्यांचे बाबतींत मात्र विम्याबाबतचें असें प्रमाणपत्र चालेल असें आयातदार हमीपत्रांत सांगू शकतो.

किंवा गुदामापर्यंतचें सरक्षण वगैरे घातल्या गेल्या आहेत, व सर्वसाधारणपत्रांतील त्याविरुद्ध असणाऱ्या अटी रद्द केल्या गेल्या आहेत कीं नाहीं हेंही तपासून घ्यावें.

**विमापत्रान्वयें भरपाई घ्यावी लागल्यास हक्कपूर्ति ( Claims ) :**

आपले देशांत व आपले चलनांत व्हावी अशी अट असणें आयातदाराचे दृष्टीनें महत्वाचें असते. त्यामुळें त्याला त्यानें जितकी रक्कम दिली असेल तितक्याची भरपाई मिळून विनिमयांतील धोक्याची झळ लागत नाही. मात्र स्वत:च्या परदेशी चलनातून एखाद्या आयातदारानें मालाची किंमत चुकती केलेली असल्यास त्या विदेशी चलनांत हक्कपूर्ति घेणें योग्य ठरेल.

विमा कंपनी, विमापत्र देतांना, जहाजाचा जो मार्ग त्यांत लिहिला त्या मार्गानेंच जहाज योग्य कालावधींत तो प्रवास करील असें गृहीत धरीत असतें. कुठल्याही योग्य कारणाशिवाय (म्हणजे दुरुस्तीसाठीं, स्वतःच्या किंवा अन्य जहाजावरील मानवी जीव वाचवण्यासाठीं, जहाजाच्या सुरक्षिततेसाठीं किंवा कप्तानाच्या आधीन नसलेल्या अन्य कारणासाठीं सोडून) जर जहाजाचा प्रवास मार्ग बदलला गेला किंवा त्याला प्रदीर्घ कालावधि लागून नुकसान झालें तर विमा कंपनी करार रद्दबातल ठरवूं शकते. त्याच प्रमाणें मालाचा विमा जर ठराविक जहाजापुरता उतरला गेला असला व कांहीं कारणामुळें उदा. ठराविक बंदरापुढें तें जहाज जात नसल्यास, किंवा मूळचें जहाज नादुरुस्त झाल्यास वगैरे तो दुसऱ्या जहाजावर चढवला गेला तर अशा प्रसंगांतून माल चढवायच्या उतरवायच्या वेळीं होणाऱ्या किंवा नंतरच्या नुकसानीसही विमाकंपनी जबाबदार रहात नाहीं. असा वाहनबदल ( Transshipment ) होत असल्यास किंवा होणें शक्य असल्यास विमेदारानें त्याबद्दलची जाणीव कंपनीस देऊन त्याची म्हणजे वाहनबदलांतील संरक्षणाबद्दलची अटही विमापत्रांत घालून घ्यावी. तसेंच असा वाहनबदल, सर्वसाधारणपणें होत असलेल्या व्यवहारांतला असेल तर, गुदामापासून गुदामापर्यंतच्या अटींचे किंवा वाहनबदलांतील सर्व धोका टाळण्यासाठीं विस्तृत संरक्षणाची अट असलेलें विमापत्र घ्यावें. विस्तृत संरक्षणाच्या अटीमुळे

'गुदामापासून गुदामापर्यंतच्या' अटीपेक्षां त्याच तन्हेचें पण जास्त संरक्षण मिळतें. अशा विस्तृत सरक्षणांत वाहनबदल, सक्तीनें माल उतरवला गेल्यास त्यांतील नुकसान, मार्ग बदलल्यास त्यांतील धोका ( Deviation Risk ) तसेंच जहाजास लागलेला दीर्घ कालावधि या सर्वांचा समावेश होतो.

हल्लीं सर्वांगीण ( All risks ) नुकसानीच्या विमापत्राची मागणी पुष्कळदां केली जाते हें मागें एकदां उल्लेखिलें आहेच. माल निर्यात होण्यासाठीं निघाल्यानंतर जें जें नुकसान होईल तें तें भरून मिळण्यासाठीं असें विमापत्र मागण्याची विमेदाराची प्रवृत्ति असते. पण 'सर्वांगीण नुकसान ' ह्या शब्दाचे वेगवेगळ्या प्रकारानें अर्थ लावले जाणें शक्य असल्यानें अशा विमापत्राच्याबाबत भरपाईचा प्रश्न आल्यास कटकटी निर्माण होण्याची शक्यता असते. त्यामुळें कित्येकदां सर्व बाह्य नुकसानीबाबतचे संरक्षण मागण्याची पद्धति अवलंबतात. त्यात चिखल, तेल, स्वच्छ पाणी, कीटक यामुळें होणारें नुकसान, दुसऱ्या वस्तूबरोबर संसर्ग झाल्यानें होणारे नुकसान, गळती, फटतूट उंदीर वा अन्य प्राण्यांमुळें होणारें नुकसान, लाटा, वारे, घाम, उष्णता, घनीभवन, अपुरी डिलीव्हरी, अप्रदान, चोरी, उचलेगिरी, सप, दंगेधोपे, अंतर्गत बण्डाळी यांच्याबद्दलचें संरक्षण मिळतें. लंडन इन्स्टिटयूट ऑफ अंडररायटर्स यांनीं मान्य केलेला All Risks-Institute Cargo Clause हा या प्रकारचा आहे. या अटींत सर्वांगीण संरक्षणाचा जास्तींत जास्त प्रयत्न केला गेलेला आहे. त्याचप्रमाणें कित्येकदां वेगवेगळ्या धोक्याचा निर्देश झाल्यावर विमापत्राचे शेवटीं आणि इतर धोके, नुकसान वगैरे हा असा शब्दप्रयोग घातलेला असतो. अशा शब्दप्रयोगामुळें आपल्याला कुठल्याही नुकसानीबद्दल काळजी करण्याचें कारण नाहीं व विमापत्रानें या शब्दान्वयें संपूर्ण संरक्षण दिलें आहे, असा विमेदाराचा गैरसमज होतो. पण अशा शब्दामुळें सर्व धोक्याबद्दल संरक्षण मिळत नसतें, हें लक्षांत घेतलें पाहिजे, आणि इतर नुकसान असें जेव्हा म्हटलें जातें, तेव्हा ज्या ज्या निर्देशित धोक्यांपासून संरक्षण दिलें गेलें आहे, तशा धोक्यांच्या प्रकारांतीलच, तत्सम इतर पण

न निर्देशिलेले धोके असा त्याचा अर्थ होतो हे विसरून चालणार नाहीं, (म्हणूनच ज्या वेळेला आपल्या मालाला जास्तींत जास्त सरक्षण मिळावें असें आयातदाराला वाटत असेल त्या वेळेला विमेदारानें वर अन्यत्र उल्लेखिलेल्या अटींचें वेगवेगळ्या धोक्याचा स्पष्ट निर्देश करणारें विमापत्र घेणें इष्ट असतें) उदाहरणार्थ एका मालाची आग विझवताना जर शेजारच्या मालावर पाणी पडून नुकसान झालें तर ज्या मालावर पाणी पडले असेल त्याचा आगीचा विमा असल्यास अशा पाण्यापासून झालेले नुकसानही तत्सम नुकसानीत धरलें जाईल, व विमेदाराला त्याबद्दलची नुकसान भरपाई मिळेल.

विमापत्र देताना प्रत्येक विमाकपनी त्या करारासबधी काहीं शर्ती घालते. यातील काहीं शर्ती अभिप्रेत (Implied Warranties) असनात तर काहीं शर्ती स्पष्ट, निर्देशित (Express Warranties) असतात. त्यापैकीं ज्या जहाजातून माल निर्यात होणार आहे तें जहाज 'नयनीय' (Sea-worthy) आहे व केला जाणारा निर्यात व्यापार वैध आहे ह्या शर्ती अभिप्रेत आहेत. म्हणजे विमापत्र देताना विमाकपनी या गोष्टी गृहीत धरून चालते. पण याखेरीज काहीं स्पष्ट शर्तीही (Express) कपनी विमापत्रात घालते. या शर्ती म्हणजे विमेदारानें अमुक गोष्टी करणें या न करणे या प्रकारच्या असतात. विमापत्र म्हणजे त्या अटींवर आधारलेला करार असतो व तो पाळणें दोन्हीं पक्षावर बधनकारक असतें. या शर्ती, जहाजाची निघण्याची तारीख, ठिकाण, मालाच्या पॅकिंगचा प्रकार, वगैरे-बाबत असू शकतात.

प्रत्येक विवक्षित प्रकारच्या मालाबद्दल विमा कपनीनें काहीं विशिष्ट नियम केलेले असतात त्या दृष्टीनेंही मालाचा विमा उतरवणारानें आपलें विमापत्र तपासून घ्यावें. असे नियम व्यवहारातील रूढीप्रमाणें मास, कोळसा, रबर, ज्यूट, धान्य अशा मालाबाबत सर्वसाधारणपणे असतात बाकीच्या मालाबाबत काहीं प्रमाणापर्यंत मुक्त, (F P A) सर्व प्रमाणात लागू (W A or W P. A) किंवा सर्व नुकसानीस जबाबदार (All Risks) अशा प्रकारच्या अटी (Institute Cargo Clauses) घालून

विमापत्रें दिलीं जातात. मात्र कुठल्याही प्रकारच्या मालाबाबत गुदामापर्यंतचें सरक्षण, विस्तृत संरक्षण, जहाज दूर गेल्यास तत्संबंधी निर्माण होणाऱ्या धोक्यांपासून संरक्षण, प्रक्षेपा (Jettison) बाबतचें सार्वजनिक नुकसानी-बाबतचें (General Average) संरक्षण, युद्धसंरक्षण, चोरी वगैरेचे तसेंच संप वगैरेचें संरक्षण विमेदारानें मागितल्यास मिळतेच हें लक्षांत घेऊन त्यानें ज्या मालाबाबत विवक्षित अटी असतात त्यांवरही मात करणाऱ्या वरील अटींचें विमापत्र घेण्याची दक्षता घेतली तर त्याला पस्तावण्याचा प्रसंग येणार नाहीं.

मालाचें विमापत्र काढल्यानंतर नुकसान झालें, तर भरपाई मिळण्यासाठीं विमेदारानें आपला हक्क ताबडतोब शाबीत केला पाहिजे. त्यासाठीं मालाचें बीजक (Invoice), निर्यातपत्र, व विमापत्र हें दस्तऐवज त्यांचीं पहाणी करण्यासाठीं त्याला विमाकंपनीकडे द्यावे लागतात. हें काम अर्थात व्यापाऱ्याचे आयातनिर्यातीचे काम करणारे प्रतिनिधी करतातच. अशी हक्क (Claim) मागणी आल्यावर त्याची रक्कम आयात-दाराला देऊन नुकसानभरपाई करण्यापूर्वीं विमाकंपनीला हक्काबाबतची खात्री करून घ्यावी लागते व नुकसान किती झालें आहे हें नक्की करावें लागतें. या कामीं विमाकंपनीचे अधिकृत प्रतिनिधींकडे नुकसानीची नोंद झाल्यावर ते याबाबत सर्व पहाणी करून आपला अहवाल कंपनीला देतात व नंतर किंमतीचे ज्या प्रमाणांत विमेदारानें विमा उतरवला असेल त्या प्रमाणांत त्याला कंपनीकडून भरपाई मिळते.

दिली आहे. विमापत्र संपूर्ण नुकसानीचें (W. A.; W- P. A.) आहे कां अंशात्मक नुकसानीचें (F. P. A.) आहे हें बघितल्यानंतर बाकीच्या अटी बघाव्यात. इतर खास अटींचे कागद उदा०:—संप, टाळेबन्दी युद्ध, वगैरे लावल्यास सर्वसाधारण विमापत्रांतील कांहीं अटी, रद्द कराव्या लागतात. अशा वेगळ्या अटी, तत्संबंधीच्या वेगळ्या चिठ्या विमापत्राला चिकटवून त्यांत अंतर्भूत केल्या जातात. किंवा मूळ विमापत्रावर रबरी शिक्क्यांनीं, किंवा टंकलिखित मजकुरानें, तर कांही वेळां हस्तलिखित मजकुरानेंही, या मूळ अटींत बदल करून दिला जातो. संपूर्ण नुकसानीच्या विमापत्रांत (W. A.; W. P. A.) मालाचे अगदीं नगण्य नुकसान झालें तरीही भरपाई मिळते, तर अंशात्मक विमापत्रांत ज्या कांहीं विशिष्ट टक्क्या, पर्यंत नुकसानीसंबंधीं उल्लेख असेल तितक्या टक्क्यांपर्यंत मालाचे नुकसानीचा हक्क येत असेल तर भरपाई मिळत नाहीं. ही टक्केवारी मालाचे प्रकारावर अवलंबून असते, व याचा जास्त खुलासा वर दुसऱ्या ठिकाणीं झालेला आहेच.

सर्वसाधारण विमापत्रांतील अटींपेक्षां ज्या कांहीं खास अटी घालून जादा संरक्षण घेतां येतें, त्या अटींचे लंडन इन्स्टिटयूट ऑफ अंडर रायटर्स या संस्थेनें सर्वसाधारण मसुदे ठरवले आहेत. संप, टाळेबंदी, व नागरिकांची अंतर्गत बंडाळी (Strike, Riot, Civil commotion) किंवा चोरी, उचलेगिरी व अप्रदान (Theft, Pilferage non Delivery) किंवा विस्तृत संरक्षण (Extended cover) किंवा अन्य अशा कांहीं खास अटी या मसुद्यानुसार घालावयाच्या असल्यास त्यांचा Institute Cargo Clauses या नांवानें उल्लेख होतो. या अटींचे नमुने सर्वसाधारण विमापत्राच्या नमुन्याबरोबर माहितीसाठीं तसेच्या तसेच शेवटीं परिशिष्टांत दिले आहेत.

विमापत्रांतील आणखी महत्त्वाचे बघावयाचे शब्द म्हणजे 'हरवले वा हरवले नसले तरी (Lost or Not Lost), हे होत. असे शब्द असलेलें विमापत्र घेतल्यास, मालाबाबतचें संरक्षण प्रत्यक्ष विम्याचा करार

होण्यापूर्वी झालेल्या नुकसानीबाबतही मिळते. मात्र अशा नुकसानीची माहिती विमाकंपनी तसेंच संरक्षण घेणारा विमेदार या दोघांना ही नसली पाहिजे. विमेदाराला त्या नुकसानीची माहिति असेल पण त्यानें ती विमाकंपनीपासून दडवून ठेवली असेल तर तें ( जाणून बुजून ) खोटी माहिती देण्याचें कृत्य ठरेल व विमाकरार हा आत्यंतिक विश्वासाचा ( Uberrima Fides ) करार असल्यानें तो रद्द होईल व विमाकंपनीवर बंधनकारक रहाणार नाहीं. तरतें विमापत्र किंवा मुक्तसंरक्षणपत्र घेतले असेल तेव्हां या शब्दांचा समावेश असलेलें विमापत्र घेतलें जातें. हल्लीं बहुतांशीं विमापत्र नुकसानीची शक्यता सुरू होण्यापूर्वीच घेतलें जात असल्याने या शब्दांना महत्त्व राहिलेले नाहीं. पण पूर्वी असे संरक्षण देणारा ( Underwriter ) दुडकाबा लागे तेव्हां त्याचें महत्त्व असाधारण होतें. कांहीं वेळां माल जहाजावर गेला असला तरी जहाजाचा प्रवास सुरू होईपर्यंत संरक्षण सुरू होत नाहीं. अशा परिस्थितींतून सुटका करून घ्यावयाची असेल तर At and From असे शब्द घालून बंदराचे नांव घातलें तर त्या बंदरांत सुस्थितींत जहाज उभें राहिल्यापासून विम्याचें संरक्षण सुरू होतें. कांहीं वेळां From the loading thereof असे शब्द घालूनही विमापत्र दिले जातें.

ज्यावेळेला मालाबद्दल कांहीं विशिष्ट अटी घातल्या जात नाहींत तेव्हां तो माल डेकखालीं किंवा डेकवर कुठेंही ठेवण्याची जहाजाला मुभा असते. पण कांहीं केमिकल्सचा ज्वलनबिंदू कमी असल्याने ती किंवा अशाच प्रकारचा दुसरा माल 'फक्त डेकवरच सांठवावा' अशा अटी घालून

किंवा त्याचे बँकेनें वर्ग केलेली असते किंवा कोरी सही केलेली अशी ( Blank endorsed ) असते.

निर्यात मालाचें विमापत्र वर्ग करताना, वर्ग करणाऱ्याला, त्याबाबतची विमा कंपनीला जाणीव ( Notice ) द्यावी लागत नाहीं. ( अशी जाणीव देणें आयुष्यविम्यात जरूरीचें असतें. ) मात्र मालाचें विमापत्र हें आणणाऱ्यास हक्क देणारे ( Bearer ) अशा स्वरूपात कायद्यानें देता येत नाहीं. तें कुणाच्या तरी नांवानेंच दिलें जातें. कारण तो एक करार असतो व त्याला योग्य तो स्टॅंपही लावावा लागतो. मालाचे विमापत्रातील करारात आत्यंतिक विश्वास, अभय व विमास्वारस्य (Good Faith, Indemnity, insurable Interest) या बाबी अत्यंत महत्त्वाच्या असतात हें विसरून चालणार नाहीं. माल निर्यात झाल्यापासून तो मागविणाराचे प्रत्यक्ष हातात पडेपर्यंत खूप कालावधी जाऊ शकतो व या वेळात, खुद्द जलप्रवासात वा अन्यत्रही, अनेक प्रकारें नुकसान होण्याची शक्यता असते. त्यामुळें विमापत्राचें विदेशव्यापारात बरेंच महत्त्व आहे. मालाची मालकी देणाऱ्या निर्यातपत्राइतकेंच विमापत्राचेंही महत्त्व असतें. कारण निर्यातपत्र दिल्यावर जसा माल मिळतो तसे त्यास नुकसान पोंचल्यास विमापत्रान्वयें त्याची किंमत भरपाई मिळते. व त्या दृष्टीनें आयात निर्यात व्यवहार करणाऱ्या व्यक्तीने त्याची संपूर्ण माहिती घेणें महत्त्वाचें ठरतें.

---

## अन्य दस्तऐवज :

१०

सर्वसाधारणपणें ज्याला नाविक दस्त-ऐवज (Shipping Documents) म्हणतात त्यांत निर्यातपत्र, विमापत्र व बीजक यांचा अन्तर्भाव होतो. विमापत्र व निर्यातपत्र यांची माहिती मागील स्वतंत्र प्रकरणांतून दिलेली आहे. भारतीय व्यापारी हमीपत्रें उघडतात तेव्हां तीं सर्वसामान्य हमीपत्रांप्रमाणें बँकांचे नांवें काढलेलीं नसून निर्यातदाराचे नांवें काढलेलीं असतात, व त्यांत निर्यातदारानें आयातदारावर त्याचे नांवानें हुंडी (Draft) काढावयाची असते. त्यामुळें आपल्याला अशा हुंडीचीही माहिती असणें आवश्यक ठरते. म्हणून या प्रकरणांत हुंडीबद्दलची व बीजक आणि अन्य कांही दस्त ऐवजांचीही माहिती दिलेली आहे. कित्येकदां नौनिर्यातपत्राऐवजीं हवाई निर्यात पत्र किंवा पोस्ट पार्सल पावतीही मिळूं शकते. तेव्हां त्याबद्दल तसेंच आपल्या सोयीसाठीं आयातदार आणखीही कांहीं अन्य दस्तऐवज निर्यातदाराकडून मागवूं शकतो, त्यांची माहितीही इथेंच देणें योग्य ठरेल.

### हुंडी :

अशा हुंडीचा व्यवहार हा बिल ऑफ एक्स्चेंजच्या कायद्यानुसार केला जातो. हुंडी दोन प्रकारानें काढतां येते. ऋणकोनें किंवा खेरेदी-दारानें, ती देखाड होतांच पैसे द्यावयाचे असल्यास तिला दर्शनी हुंडी (*At sight Bill of Exchange, Draft at sight*) म्हणतात. पण खरेदीदाराला जर कांहीं मुदत द्यावयाची असेल तर मुदती हुंडी (Tenor Bill,......Days Sight) काढली जाते. मुदती हुंडी काढल्यासही ती दोन प्रकारानें काढतां येते. पहिल्या प्रकारांत हुंडीच्या दिनापासून इतक्या मुदतीनंतर अशी (......days after date) किंवा दुसऱ्या प्रकारांत देखाड झाल्यानंतर इतक्या मुदतीनंतर...... days after sight अशी हुंडी काढली जाऊं शकते. त्याशिवाय विदेशव्यवहारांत At......days sight after arrival of goods अशीही हुंडी काढली जाऊं शकते. पहिल्या प्रकारांत ती मुदत संपण्याच्या आदल्या दिवशीं देखाड झाली तरी ठरलेल्या दिवशीं तिचे पैसे ऋणकोला द्यावेच लागतात. दुसऱ्या प्रकारांत त्याला ती हुंडी देखाड झाल्यानंतर मुदत मोजण्यास सुरवात होते. मुदती हुंडी देखाड झाल्यावर ती मान्य असल्याची सही करून ऋणको ती बँकेकडे वा धनकोकडे परत करतो. या मुदतीच्या शेवटच्या दिवसानंतरही त्याला तीन दिवस सवलतीचे म्हणून भरणा करण्यासाठीं मिळूं शकतात. उदाहरणार्थ एक हुंडी जर 'तारखेपासून तीस दिवसानंतर' (30 days after date) अशी असेल व तिची तारीख १ जानेवारी असेल तर तिची पैसे भरण्याची खरी तारीख ३१ जानेवारी येईल पण सवलतीचे तीन दिवस वाढवतां, ऋणकोनें ३ फेब्रुवारीला पैसे भरले तरी चालतील. तीच हुंडी जर (30 days after sight) देखाड झाल्यानंतर तीस दिवसांच्या मुदतीची काढली व तिची तारीख जरी एक जानेवारीच असली तरी ती देखाड होऊन ती मान्य असल्याची सही जर ऋणकोनें ५ जानेवारीला केली तर त्या दिवसापासून तीस दिवसांनीं म्हणजे ४ फेब्रुवारीला तिची मुदत भरेल व सवलतीचे दिवस जमेत धरतां ऋणकोला ७ फेब्रुवारीपर्यंतही

पैसे भरण्यास मुदत मिळूं शकेल (अशी हुंडी धनकोसाठीं किंवा अन्य धारण करणारांसाठीं बँकेनें वटविली तरी ती अर्थातच वटावाचे दिवसापासून ते सवलतीचे तीन दिवस संपून येणाऱ्या दिनांकापर्यंत कसर काढून घेईल हें उघडच राहील).

कुठलीही हुंडी काढतांना ती काढणाराला त्यांत कुठल्याही अटी घालतां येत नाहींत. हुंडीच्या कायद्याप्रमाणे हुंडी (Bill of Exchange) ही, ती लिहिणारानें दुसऱ्या व्यक्तीला स्वतःस किंवा तिऱ्हाईत इसमास ठरलेल्या दिवशीं किंवा मुदतीनंतर ठरलेले पैसे देण्याची केलेली, बिनशर्त व लेखी आज्ञा असावी लागते. सर्वसामान्यपणें ती जरी बिनशर्त असावी लागते तरी व्यापाराच्या हुंडींत कांहीं ठराविक अटी व्यापारी रूढीमुळें घातल्या जातात व तेवढ्याने ती रद्दबातल ठरत नाहीं. अशा अटींची जास्त माहिती पुढें येईलच.

अशा अटीमध्यें विशेषतः व्याजाचा दर घालण्याची पद्धत आहे. तसेंच हमीपत्रानुसार ती काटली गेल्यास हमीपत्राचा संदर्भ देऊन ती काढलेली आहे. असें लिहिण्याचाही प्रघात आहे. किंबहुना हमीपत्र उघडणारी बँक तसा संदर्भ घालण्याचीच अट हमीपत्राचे धारकाला हमीपत्रांतून घालते.

सर्वसामान्य व्यवहारांत एकच हुंडी (एक प्रत) काढली जाते पण आंतरराष्ट्रीय व्यवहारांत दस्तऐवज खूप लांबच्या ठिकाणाहून यावयाचे जावयाचे असल्यानें हुंडीच्या अनेक प्रती काढतात व त्या निर्यातपत्र किंवा अन्य कागदपत्रांच्याही अशा द्वितीय किंवा तृतीय असणाऱ्या प्रतीबरोबर पाठविल्या जातात. हुंडीच्या अशा अनेक प्रती काढल्या तरी त्यांचा एकमेकांशीं संबंध उरलेल्या प्रतींच्या उल्लेखानें करतां येतो व त्यांतली जी प्रत आधीं मिळेल वा देखाड होईल त्यानुसारच ऋणको पैसे चुकते करतो व त्यानंतर उरलेल्या प्रती आपोआपच रद्द समजल्या जातात. अशा हुंडीचा प्रकार परिशिष्टांत दिला आहे. पहिली हुंडी मिळालेली असल्यास दुसरी रद्द अशा प्रकारें केलेला हा उल्लेखही एक प्रकारची शर्तच समजली जाईल.

अशा हुंड्या काढताना निर्यातदारानें विशेषत त्या बरोबर काढाव्या लागतात. काहीं वेळा हमीपत्रात, विशेषत कळवणाऱ्या बँकेनें खात्री दिलेली असताना, बॅंका खत वरच हुंडी काढून मागतात तर भारतीय वा पौर्वात्य देशातील हमीपत्रात त्या परस्पर आयातदारावरच काढून मागण्याची प्रथा आहे. अशी हुंडी बरोबर असली तर कागदपत्र वटवताना त्रास होत नाहीं हें निर्यातदारानें विसरून चालणार नाहीं. हुंडी काढताना कुठल्या चुका होतात याची माहिती नाविक दस्तऐवजाची तपासणी करण्याबावत पुढे उल्लेख येईल तिथें दिलेली आहे.

विदेशविनिमयातील हुंड्यामधून व्याजाच्या व अन्य काहीं अटी ( Conditions ) घातल्या जातात हे सांगितलेंच आहे. या अटी, दोन देशातील दोन चलनाची त्यात अदलाबदल होत असते म्हणूनच घातल्या जातात. विदेशविनिमयाच्या व्यवहारात एका चलनाचे दुसऱ्या चलनातील होणाऱ्या रूपांतरात, मध्यें जाणाऱ्या कालावधींत जर दरात बदल झाला तर कुणाचा तरी नफा व कुणाचे तरी नुकसान होण्याची भीति असते. एखादा व्यापाऱ्याने इंग्लंडमधून माल मागितला व १०० पौंडाच्या किंमतीसाठीं ( १०० पौंडाचे परदेशी चलन खरेदी करण्यासाठीं ) आपल्याला १३३७ रुपये लागतील अशा हिशेवानें व्यवहार आखला, ऑर्डर दिली व हमीपत्र उघडलें पण त्या नतर १०० पौंडाचें इंग्लीश व्यापाऱ्याचे विल आल्यानतर त्यावेळीं पौंडाची बदली किंमत जर ब्रिटिश सरकारनें पुनर्मूल्यन केल्यानें वाढली असली तर त्याला त्याच शभर पौंडाचे बिलापोटीं लागणारे शभर पौंड बँकेंतून खरेदी करताना कदाचित् १३३५ रुपयाऐवजीं १३५० रुपये द्यावे लागतील. अर्थात् या मुदतींत जर पौंडाचें अवमूल्यन झालें तर तेच शभर पौंडाचे चलन खरेदी करण्यासाठीं त्याला १३३० किंवा तत्सदृश कमी किंमत द्यावी लागून त्याचा फायदाही होईल ही अनिश्चितता विक्रेता व खरेदीदार यांच्यात ज्या प्रकारें बिल काढलें जाईल त्या प्रकारें कुणाच्या तरी अंगावर पडते. असें बिल ज्याच्या चलनात असतें त्याला ही अनिश्चितता नसते

हा सर्वसाधारण सिद्धांत आहे. वरील उदाहरणांतील भारतीय व्यापाऱ्याला अशा अनिश्चिततेच्या फेऱ्यांत सांपडायचें नसेल तर अनेक मार्ग उपलब्ध असतात. एक म्हणजे त्यानें विक्रीकरार करतांना किंमत भारतीय रुपयांतच पक्की केली पाहिजे. म्हणजे १०० पौंडांचे बीजकाच्या ऐवजीं ब्रिटिश व्यापाऱ्यानें त्याच्यावर १३३५ रुपयांचेंच बिल काढलें पाहिजे. व चलन रूपांतराची जबाबदारी स्वतःवर घेतली पाहिजे. म्हणजे भारतीय व्यापारी त्याला फक्त १३३५ रुपयेच द्यावयाला कबूल होईल. मग त्या रुपयांचें रूपांतर विक्री करून स्वतःच्या बँकेकडून पौंडांत करून घेतांना त्या ब्रिटिश व्यापाऱ्याला १०० पौंड मिळोत, १०२ पौंड मिळोत वा ९८ पौंड मिळोत, भारतीय व्यापाऱ्याला त्याची क्षिती असणार नाहीं. थोडक्यांत तो ही अनिश्चि-

(3) Payable at the current rate of exchange for Dem--and drafts on (London, New York) plus interest @ per cent from the date here of until approximate date of arrival of return remittance in (London, New York etc)

(4) Exchange as per endorsement, अशा चार प्रकारात ढोबळपणें वर्ग करता येतील. त्याखेरीज या शर्तीमध्यें देशकाल-परत्वें किरकोळ बदल होत असतात तसेंच उद्योगधद्याचे विविध स्वरूपामुळेंही त्यात दर वेळेला काहीं बदल असण्याची शक्यता असते. या शर्तीचा अधिक खुलासा खालीं केलेला आहे.

(1) Payable without loss in Exchange अशी शर्त ज्या हुडीवर घातलेली असते ती हुडी काढणाऱ्याला हुडीवर लिहिलेल्या रकमे इतकी सपूर्ण रक्कम मिळत असते अशी हुडी जर मुदती हुडीचे स्वरूपाची असेल तर मात्र ती वटवून घ्यावयाची असल्यास हुडी काढणाऱ्याला त्याचे व्याज द्यावें लागतें. तसेंच परदेशात ती हुडी रुजू होत असेल तर त्याचे पैसे पाठविताना विदेशीय बँक स्टॅप व आपला आकार कापून घेते ही रक्कमही ज्यावर हुडी काढली आहे त्यानेंच द्यावयाची असेल तर Payable without loss of exchange plus interest and all charges अशी शर्त लिहिली जाते मात्र उपरनिर्दिष्ट शर्तींपैकीं कुठल्याही शर्तीची हुडी काढताना ज्यावर हुडी काढावयाची त्याचेकडून त्या शर्तीबद्दलची मान्यता घ्यावी लागते केवळ निर्यातदाराच्या इच्छेप्रमाणें अशी हुडी लिहू शकत नाहीं या गोष्टीही पुष्कळदा विक्रेत्याचा बाजार (sellers' Market) आहे कीं नाहीं त्यावर अवलबून असतात अशी हुडी विशेषत मुदती असल्यावर तिचे पैसे देणाऱ्याला त्याबद्दलचे विदेशी चलन ती हुडी देखाड करणाऱ्या बँकेकडूनच घ्यावें लागतें असें नाहीं हुडीवर Payable by approved bankers sight draft on—for full face value असें कलम असल्यास ऋणको, धनकोस मान्य होऊ शकणारा ड्राफ्ट दुसऱ्या बँकेंतून घेऊनही त्यानें पैशाची पूर्तता करू शकतो या दोन्ही शर्ती व्यवहारात सारख्या अर्थानेंच गणल्या जातात.

२ हुंडीवर Payable at Bankers Selling rate for Demand drafts on......( London/New York/Paris ) अशी शर्त असेल तर धनको ( बिल काढणारा ) चें कांहींच नुकसान होत नाहीं. पण ऋणकोला मात्र ज्या बँकेकडून तें बिल त्याचेकडे येईल तिच्या विदेशचलनविक्रीच्या दरानेंच पैसे द्यावे लागतात, शिवाय त्या बँकेचा कांहीं आकार असल्यास तोही द्यावा लागतो. असे आकार ऋणकोनेंच द्यावयाचे याबद्दल शंका नको असेल तर हुंडी काढणारा with all collection charges अशी शर्त याच शर्तीपुढें घालीत असतो. पहिल्या शर्तीत जर Banks किंवा Bankers Selling rate असे शब्द नसले तर ऋणको बिलाच्या फेडीसाठीं कुठल्याही बँकेकडून विदेशी चलनांतला ड्राफ्ट घेऊं शकतो. तसें इथें होत नाहीं.

३ हुंडी काढतांना वरील शर्तीमध्यें वसुलीच्या आकाराप्रमाणेंच जादा अशी व्याजाबद्दलचीही अट धनकोला घालतां येते. अर्थात असें व्याज देण्याबद्दल ऋणकोनें आधीं कबुली दिलेली असावी लागते. विशेषतः भारतांतील आयातदारांसाठीं जीं हमीपत्रें उघडलीं जातात त्यांत अशी व्याजाची अट असते. ही अट With interest @-% from the date of the draft until approximate date of arrival of return remittance in New York, London, Paris etc.) अशी घातल्यावर आयातदाराला हुंडीच्या काढलेल्या तारखेपासून ते, ती हुंडी, विदेशी चलन खरेदी करून सोडविल्यानंतर, विदेशी चलनाची रक्कम ड्राफ्ट काढणाऱ्याच्या ठिकाणीं पोचेपर्यंतच्या मुदतीचें व्याज द्यावें लागतें. हमीपत्र उघडणाऱ्या बँकेच्या खात्याला ज्या वेळेला हमीपत्राखालीं ती रक्कम नावें टाकून विदेशांतली बँक निर्यातदाराला किंवा हमीपत्रधारकाला लगेच पैसे देते त्या वेळेला ही व्याजाची रक्कम हमीपत्र उघडणाऱ्या बँकेला आपल्या रकमेचें व्याज म्हणून मिळते. अशी व्याजाची रक्कम न घेण्याचीही कांहीं बँकांची प्रथा असते. पण जेव्हां तें व्याज घेतलें जातें तेव्हां अशा हुंडीमधील व्याजाचा दर हा आयातदाराच्या देशांतील कर्जावर घेण्यांत येणारा सर्वसाधारण दर असतो. भारतांतून अमेरिकेखेरीज अन्य देशासाठीं रक्कम भरल्यानंतर सुमारें

१० दिवसाची मुदत परत रक्कम विदेशी पोचण्यासाठीं म्हणून बहुशः धरली जाते तर अमेरिकेसाठीं ही मुदत पधरा किंवा वीस दिवसाची गणली जाते. वसुलीच्या बिलात जर अशी व्याजाची अट असेल तर तें सर्व बँका घेतातच. उदा —एकादी हुडी १ तारखेला काढली असेल पण नाविकनिर्यातपत्र ८ तारखेला हमीपत्रधारकानें लडनच्या बँकेंत दिले असेल व ते दस्तऐवज भारतात १५ तारखेला पोचून आयातदारानें ते १८ तारखेला सोडवले असतील तर विदेशी चलन परत लडनला पोचेपर्यंतची मुदत धरून आयातदाराला २८ तारखेपर्यंत असें २८ दिवसाचें व्याज द्यावें लागेल.

(४) या शर्तीखेरीज Exchange as per endorsement अशा प्रकारची अटही हुडीवर घातली जाते. अशा वेळी हुडी ही निर्यातदाराकडून त्याचे स्वत चे चलनात किंवा अन्य आतरराष्ट्रीय स्वरूपाच्या, स्टर्लिंग पौंड किंवा डॉलर्सचे चलनात काढली जाते पण तिचे प्रदान (Payment) मात्र आयातदाराचे चलनात होते. या प्रकारचें बिल दिल्यावर निर्यातदाराची बँक त्या चलनाचे आयातदाराच्या देशाचे चलनाच्या बदली–परिमाणाचा विचार करून त्या हुडीचे त्या चलनात रूपातर करते व मग त्यावेळेपासून ते स्टर्लिंग व डॉलरमधलें बिल भारतीय रुपया किंवा ऑस्ट्रेलियन पौंड किंवा जपानी येनमध्ये रूपातरित झालेलें बिल ठरतें व त्या रकमेइतकी तद्देशीय रक्कम वसूल करण्याच्या सूचना वसुलीच्या बँकेला दिल्या जातात. ही रक्कम धनकोकडून ऋणकोला कळविली जाऊ शकते. या रकमेचें रूपातर करताना निर्यातदाराची बँक अर्थातच उलट रक्कम येण्यासाठीं लागणाऱ्या कालावधीचें व्याज, परदेशातील स्टॅम्पचे आकार वगैरेचा विचार करूनच बदली–परिमाणाचा दर ठरवते व तो दर त्या बिलावर वसुलीच्या बँकेसाठीं लिहिते. अशा शर्तीमुळें विदेशी आयातदाराला आपल्याला स्वकीय चलन किती द्यावें लागणार आहे हें कळतें व विनिमयातील दराचे अनिश्चिततेचा धोका बिल रूपातरित करणाऱ्या निर्यातदाराच्या बँकेवर पडतो. ती बँक अर्थात् त्यासाठीं या चलन खरेदी विरुद्ध तितकीच विक्री करून आपली परिस्थिति समतोल ठेवण्याचा प्रयत्न करील हें उघड आहे.

अशा हुंड्या भारतीय आयातनिर्यातीच्या व्यवहारांत सहसा दिसत नाहींत, पण इंग्लंडमधून ऑस्ट्रेलिया न्यूझीलंडशीं होणाऱ्या व्यापारांत त्यांचा बराच वापर केला जातो.

**बीजक ( Invoice ):**

निर्यातीच्या दस्तऐवजांत बीजकाचें महत्त्वही मोठें असतें. मालविक्रीच्याबाबत खरेदीविक्रीदारांत पत्रोपत्रीं होऊन होणाऱ्या शेवटच्या करारानंतरचा तो एक महत्त्वाचा दुवा ठरतो. बीजक ही माल विकल्याची नोंद किंवा कबुलीच असते व त्यांत खरेदीदारानें विक्रेत्याकडून कुठल्या तारखेला, कुठला माल काय किंमतीला, रोख वा उधार व कोणच्या अटींवर नेला आहे याची नोंद असते. मूळ बीजकाची प्रत विक्रेत्याकडून खरेदीदाराला दिली जाते व त्याची दुय्यम प्रत विक्रेत्याकडे राहूं शकते. बीजकाचा उपयोग खरेदीदाराच्या खातेवहींत नोंद करण्यासाठीं, जमाखर्चासाठीं, तपासणीसाठीं, किंवा बँकेत माल गहाण ठेवून कर्ज घ्यावयाचे असल्यास त्यावेळीं मालाच्या किंमतीची खात्री करण्यासाठीं होऊं शकतो. तसेंच कस्टममधून माल सोडवितांना, जकात भरतांना अनेक ठिकाणीं बीजक हा एक खात्रीचा पुराव्याचा कागद समजला जातो. हमीपत्रात ज्या वेळेला बीजक मागतात त्यावेळीं त्याच्या किती प्रती हव्या आहेत हें सांगितलें जातें. सर्वसाधारणपणे त्याच्या तीन प्रती मागितल्या जातात, पण खरेदीदाराची खूप मोठी फर्म असेल व एकच कारभार वेगवेगळ्या ठिकाणीं नोंदला जात असेल तर अशा प्रत्येक खात्यासाठीं बीजकाच्या जास्त प्रती असणें त्याला हितावह ठरतें. अशा वेळीं तो अशा किती प्रती पाहिजेत त्याचा स्वतंत्र उल्लेख करीत असतो.

निर्यातीच्या बीजकांमध्ये, नाविकनिर्यातपत्रामध्यें असलेल्या पेट्यावरील निर्यात खुणाही ( Shipping Marks ) दाखविलेल्या असतात. निर्यातदारतें आयातदाराच्या नांवानें स्वतःचें नांव छापलेल्या कागदावर काढतो व पुष्कळ वेळां त्यांत चूकभूल द्यावी घ्यावी असेही शब्द लिहिलेले असतात. बीजक छापलेल्या नांवाचे कागदावर असल्यास त्यांवर निर्यातदाराची सही

असलीच पाहिजे असे नाहीं पण अनेकदा "बीजक सहीचे असावें" अशी अट हमीपत्रातून घातली जाते तेव्हां त्यावर सही असावी लागते. बीजकामध्यें किंमत दाखविल्यावर, विक्री वा. भा. वि. (C. I. F.) प्रकारची असेल तर तसें दर्शविलें जातें व त्याहून वेगळ्या तऱ्हेची असेल तर तसा म्हणजे वा. भा. (C & F) वगैरे उल्लेख केला जातो व पूर्वी करारांत मान्य झाले असल्यास व विमा वा भाडें यांचा खर्च विक्रेत्यानें केला असल्यास तो अलाहिदा दाखवून बीजकाचे शेवटीं ती रक्कम नंतर वाढविली जाते.

बीजकामध्यें पुष्कळदा माल कुठल्या देशांत तयार झाला आहे तेंही दर्शविलें जातें. *म्हणजे बीजक व उत्पादनस्थानपत्र याचा मिळून एकच* दस्तऐवज होतो. ज्यावेळीं असें उत्पादनस्थानपत्र (Certificate of Origin) वेगळें मागितले असतें त्यावेळेला तो उल्लेख गाळला जाऊं शकतो.

## कॉन्सुलर, व्हिसाइ व लीगलाइझ्ड इन्व्हॉईस :

किलेक वेळां काहीं देशांतील कायद्यामुळें आयातदाराला वेगळ्या प्रकारचें बीजक मागवावें लागतें. 'कॉन्सुलर इन्व्हॉईस' हा त्यातलाच एक प्रकार आहे. अशा 'कॉन्सुलर इन्व्हॉईस' मध्यें वेगळ्या प्रकारच्या इन्व्हॉईसवर त्या निर्यातीच्या देशांत असलेल्या, आयात करणाऱ्या देशाच्या कॉन्सुल ऑफिसचा शिक्का व सही लागते. जेव्हां एखाद्या देशात आयातीवर खास नियंत्रणें असतात तेव्हा असा इन्व्हॉईस नसल्यास आयात-दाराला कित्येकदा मालही सोडवून घेता येत नाहीं व हमीपत्रात त्याची मागणी केली असल्यास किंवा विक्रीकरारात त्याचा उल्लेख असल्यास त्याची दखल निर्यातदारानें घेतलीच पाहिजे. नाहींतर केवळ कॉन्सुलर इन्व्हॉईसच्या अभावामुळें आयातदारानें माल न सोडविल्यानें शेवटीं त्याचेंच नुकसान होणार असतें. मात्र असा कॉन्सुलर इन्व्हॉईस काढतांना त्यास कॉन्सुलची फी वगैरे बरीच असल्यानें खर्च खूप येतो व असा खर्च वेगळा आकारला जाईल असें विक्रीकरारात कलम घातलेलें नसल्यास निर्यातदाराला त्यासाठीं बरीच पदरमोड करावी लागते. असा उल्लेख नसल्यास व बिलात

ही रक्कम वाढविल्यास आयातदार बिल सोडवून घेत नाहीं, तसेंच तें हमीपत्रांतील अटींविरुद्ध जात असल्यास कागदपत्र वटवणारी बँकही त्यास हरकत घेते, तेव्हां कॉन्सुलर इन्व्हॉईसचा व्यवहार करताना ही सर्व काळजी विक्रेत्यानें पुरेपूर घेतली पाहिजे.

निगोशिएबल दस्तऐवज नसतो. केवळ सही करून ( Endorsement व हस्तांतर ( Delivery ) करून त्या पावतींतील हक्क दुसऱ्यास तबदील करतां येत नाहींत. कारण अशी पावती हा मालवरील हक्काचा कागद (Document of Title to goods) समजला जात नाहीं. त्यामुळेंच अशी पावती निर्यातदाराचे हुकमाची ( Consignor's order ) अशी न काढतां अशा पावतीवर ज्याला माल पाठवावयाचा त्याचे किंवा ज्या बँकेकडे त्या पार्सलाचे कागदपत्र आयातदाराकडून पैसे घेऊन देण्यासाठीं पाठविले जातात तिचें नांव काढली जाते. अशा पावतींत दुसरा कुठलाही उल्लेख किंवा करार नसतो, व ती रजिस्टर्ड पत्र मिळाल्याच्या पोस्टांतल्या पावती-प्रमाणेच साधी पावती असते.

## हवाई मार्ग पावती :

पार्सल पोस्ट पद्धतीनें जेव्हां माल पाठवतात तेव्हा जशी नुसती माल पावतीच मिळते त्याचप्रमाणें विमानकंपनीकडे विमानानें पोचता करण्यासाठीं जर माल दिला तर ती कंपनीही निर्यातदाराला फक्त माल पोंचल्याची हवाई–मार्ग पावती ( Air-way Bill ) देते. ही पावती सुद्धां पोस्टपावतीप्रमाणें तबदील करतां येणारा कागदपत्र समजला जात नाहीं. ही पावती आयातदाराच्या हातात पडल्यानंतर त्याला माल सोडवून घेण्यासाठीं परत क्लिअरिंग एजंटाला अधिकारपत्र द्यावें लागतें. या पावतीचें वैशिष्टय एवढेंच कीं माल ठरलेल्या विमानतळावर आल्यानंतर मालकाला त्या कंपनीनें माल आल्याची सूचना द्यावीच लागते. नाविक-निर्यातपत्रांत मात्र "सूचना द्यावी" अशी ( *Notify clause* ) अट असली तरी ती कप्तानावर बंधनकारक असतेच असें नाहीं. निर्यातपत्राप्रमाणेंच अशा हवाई–मार्ग पावतीच्या देखील एकाहून अधिक प्रति काढल्या जातात.

## पॅकिंग लिस्ट :

पुष्कळदां खूप माल यावयाचा असेल तर आयातदार पॅकिंग लिस्ट मागतो. ज्यावेळीं जो माल लागेल किंवा पाहिजे असेल त्यावेळीं तोच

माल मिळण्यासाठीं योग्य पेट्या फोडतां याव्यात हा त्यांत उद्देश असतो. एकाद्या मशीनचे वेगवेगळे स्पेअर पार्ट्स् येत असल्यास जर कांहीं विशिष्ट भागच दुरुस्तीचे वेळीं लागला तर त्या एका भागासाठीं केवळ सगळ्या पेट्या फोडून माल उचकटायची जरूरी पॅकिंग लिस्ट असल्यास येत नाहीं व गुदामांत माल सांठवण्याचे दृष्टीनेंही पॅकिंग लिस्टचा फायदा होतो. तसेंच आयातदार ठोक विक्रेता असल्यास व त्यानें सँपलवर किंवा डिझाइनवर किंवा केवळ वर्णनावरही, प्रत्यक्ष माल येण्यापूर्वींच त्यांतील कांहीं माल फुटकळ विकल्यास त्यावेळेसही वेगवेगळ्या खरेदीदारांना तशीच्या तशीच पॅकबंद डिलिव्हरी देतां यावी ही पॅकिंग लिस्ट मागवतांना त्याची भूमिका असते. उदा:—जर एकाद्यानें ५०००० वार रेशमी कापड निळ्या, पांढऱ्या व पिवळ्या रंगात मागितले असलें व त्यांतल्या पिवळ्या ५००० वाराची जर त्यानें लगेच विक्री केली असेल तर पॅकिंग लिस्टच्या संदर्भानें तो योग्य त्याच पेट्या त्या खरेदीदाराला देऊं शकेल. अशी यादी नसेल तर त्याला प्रत्येक पेटी फोडून बघावी लागेल व वेळेचा, पैशाचा निष्कारण अपव्ययच होईल.

## वजनांची यादी (Weight List):

ज्या वेळेला वेगवेगळ्या तऱ्हेच्या पॅकिंगमध्यें माल यावयाचा असतो तेव्हां अशी वेट लिस्ट मागितली जाते. एकच रंग जर पंचवीस किलो, छप्पन्न किलो, सत्तर किलो अशा ड्रममधून येणार असेल तर अशी यादी असणें संदर्भासाठीं केव्हांही सोपें पडतें. वाहतुकीचे वेळीं, उत्पादनाचे वेळीं, गुदामांतून माल काढतांना, व विक्रीचे वेळींही पॅकिंगलिस्टप्रमाणें वजनाचे यादीचा उपयोग होऊं शकतो.

## तपासणीचें शेरापत्रक (Inspection Certificate):

किल्येकदां माल बोटीवर चढण्यापूर्वीं त्याची तपासणी आयातदाराचे तर्फे कुणीतरी करूं शकतो. त्यानें अशी तपासणी करून शेरापत्रक दिल्यास आपणास योग्य माल मिळाला आहे अशी आयातदाराची खात्री होऊं शकते.

एकाद्या वस्तूत जेव्हा काही खात्रीसाठीं अशात्मक तपासणी (Percentage Test) जरूर असते त्यावेळीं निर्यातदाराचे देशात असलेल्या आपल्या प्रतिनिधीला अशी सर्वमालाची किंवा सँपलची तपासणी करण्यासाठीं आयातदार सागू शकतो व त्याप्रमाणें त्याचें शेरापत्रक दस्तऐवजात जोड ण्याची अट तो घालू शकतो कच्चे धातु, अशुद्ध माती, रसायनें, फळफळा-वळ, खाद्यपदार्थ, मशीनरी वगैरे अनेक बाबींसाठीं असें तपासणीपत्रक मागितलें जातें.

## आरोग्यशेरा पत्रक ( Health Certificate )

ज्यावेळेला नाशवन्त असा खाद्यपदार्थ किंवा तत्सम वस्तू आयात केल्या जातात तेव्हा आरोग्याचे दृष्टीनें, निर्यात करताना तो माल खाण्यास अहितावह अशा परिस्थितींत नव्हता हें दाखविणारें आरोग्यशेरापत्रक हजर करावें लागतें.

## उत्पादन-स्थान ( Certificate of Origin )

कुठलाही विक्रेता जगात कुठेंही उत्पन्न झालेला माल विकू शकतो जर्मनीचा माल जपानी व्यापारी भारतीयाला विकेल तर आफ्रिकेचें लोखंड भारतीय व्यापारी जपानला पाठवू शकेल त्यामुळें आपण जो माल मागवीत आहोंत तो ज्या देशाचा पाहिजे आहे त्या देशाचाच आहे किंवा तिथेंच उत्पादन केला गेलेला आहे हें दाखविणारें शेरापत्रक व्यापाऱ्याच्या दृष्टीनें महत्त्वाचें असतें तसेंच विनिमयनियंत्रणामुळें माल किंवा वस्तूचें जिथें उत्पादन झालें आहे ( जिथून तो येत आहे हें महत्त्वाचें नाहीं ) त्याच देशाचे किंवा त्या देशासाठीं भारतीय विनिमयनियंत्रणानें मान्य केलेले त्या विभागातील देशाचे चलनातच त्या आयातीचे पैसे द्यावयाचे हा भारतीय विनिमयनियंत्रणाचा दण्डक असल्यानें असें शेरापत्रक हा हल्लीं एक अपरिहार्य असाच दस्तऐवज आहे. असें नियंत्रण नसलें तरीही उत्पा दन स्थानपत्रक महत्त्वाचें आहेच बेल्जियमची काच प्रसिद्ध असते त्यामुळें कांच सामान घेणाऱ्याला बेल्जमचीच काच हवी असणे न ती

बेल्जममधून यावी म्हणून त्यानें बेल्जयम मध्यें असलेल्या व्यापाऱ्याचे नावानें हमीपत्र उघडलें तरी बेल्जमचा तो व्यापारी दुसऱ्या देशाचा स्वस्त मिळणारा माल वरचें लेबल काढून तो बेल्जममध्यें आणवून तिथून निर्यात करू शकेल, नाहीं असें नाहीं. तेव्हा असें शेरापत्रक असल्यास आयात-दाराची मालाच्या मूळनिर्मितीबद्दल खात्री पटते. अशी खात्री पक्की होण्याकरिता कित्येकदा असें निर्मितीबद्दलचें शेरापत्रक चेंबर ऑफ कॉमर्स किंवा तत्सम प्रतिष्ठित व्यापारी-संस्थेच्या शिक्क्याचें व किंवा सरकारी शिक्क्याचें मागण्याचीही कित्येक ठिकाणीं प्रथा असते. असें शेरापत्रक देताना काहीं वेळेला त्यात अन्य देशाचा कच्चा माल देखील वापरला गेलेला नाहीं असाही शेरा मागितला जातो.

---

## व्यापारी हमीपत्रें ( Commercial Letters of Credit )

११

### हमीपत्राची पार्श्वभूमी :

जेव्हां दोन वेगवेगळ्या देशांत व्यापार-..ार होतो तेव्हा त्यांत कशा गुंतागुंती होतात हें आपण विदेशविनिमयाच्या शास्त्राचा सुरवातीस विचार केला तेव्हां बघितलें आहे. एका देशांतून दुसऱ्या देशांत माल पाठवल्यावर त्याचे व्यवहार निर्यातपत्र व इतर कागदपत्र पाठवल्या-नंतर त्याचे विदेशी चलनांत किंवा ठरल्याप्रमाणें दुसऱ्या चलनांत रूपांतर झाल्यानंतर पुरे होतात. ज्यावेळेला अशा व्यापारांत विक्रेत्याला खरेदीदाराची तो मालाबद्दल कटकट न करतां पैसे देईलच अशी खात्री असते तेव्हां निर्यातदार वेळोवेळीं माल रवाना झाल्यावर त्याचे दस्तऐवज आयातदाराकडे पाठवत जाईल व आयातदार विक्रेत्याला सवडीनुसार, किंवा दरमहा अथवा अन्य ठराविक वेळीं पैसे पाठवील किंवा मालविक्री झाल्यावर पैसे पाठवायचे विक्रेत्याला मंजूर असेल तर तशा विक्रीनंतर योग्य तें चलन खरेदी करून व्यवहार पुरा करील.

विक्रेत्याला खरेदीदाराबद्दलची इतकी माहिती नसेल तर तो आपल्या बँकेला खरेदीदाराची माहिती काढायला सांगेल व मालविक्रीबाबतचा पत्रव्यवहाराने करार करील व माल रवाना केल्यानंतर त्याचें निर्यातपत्र व इतर दस्त ऐवज, खरेदीदारावर काढलेल्या हुंडीसह त्याच्या बँकेकडे देऊन ते आयातदराच्या बँकेकडे वसुलीसाठीं पाठवायला सांगेल. अशा व्यवहारांत विक्रेत्याला खरेदीदाराबद्दल संपूर्ण नसला तरी थोडातरी विश्वास असावा लागतो. कारण पैसे दिल्याखेरीज बँकेकडून खरेदीदाराला जरी दस्तऐवज मिळत नसले तरी निर्यातदाराकडून माल हा रवाना झालेलाच असतो व

बिल वसूल न झाल्यास त्या मालाची विल्हेवाट लावण्याची कटकट त्याच्या-पाठीमागें राहतेच. पण दोनचारदां व्यवहार झालेले असल्यास, किंवा रक्कम लहान असल्यास, किंवा बँकेनें खरेदीदाराबद्दलची माहिती देतांना त्याच्या पतीबद्दल चांगलें मत दिलेलें असल्यास निर्यातदार हुंडी वसुलीला पाठवायचें धाडस करूं शकेल. पण अशा हुंडीची वसुली होईपर्यंत त्याला पैसे मिळत नाहींत व माल सोडवला गेला कीं नाहीं याबद्दलची त्याची काळजीही बरेच दिवस दूर होत नाहीं. यांवर उपाय म्हणून व दोघानांही व्यवहार सुकर व्हावेत म्हणून, दोन वेगवेगळ्या देशांतील व्यापाऱ्यांची जेव्हां एकमेकाला संपूर्ण खात्री नसते त्यावेळेला प्रत्येकाच्या खात्रीच्या अशा बँकेमार्फत व्यापारी-हमीपत्र ( Letter of Credit ) उघडून व्यापार करणें दोघांनाही इष्ट व हितावह असतें. अर्थात् या प्रकारांतही दोघांना एकमेकांवर थोडाफार विश्वास हा ठेवावा लागतोच. पण मागें सांगितल्याप्रमाणें किल्येकदां विक्रेत्याला विश्वास असूनही पैशांची अडचण भासूं नये म्हणून व्यापारी-हमीपत्राचा मार्ग जास्त सोईस्कर वाटतो. अशा हमीपत्रांत विक्रेत्याला जास्त सुरक्षितता असते. कारण हमीपत्रानुसार योग्य ते कागदपत्र त्यानें बँकेला दिले कीं ते वटवणाऱ्या बँकेकडून त्याला लगेच पैसे मिळतात व कागदपत्र वटवणारी बँक मग, ते दस्तऐवज स्वतः किंवा दुसऱ्या बँकेतर्फे आयातदाराला देऊन ते पैसे त्याचेकडून त्याचे, चलनांत, वसूल करते. असें असलें तरी निर्यातदारानें अमुक वस्तू निर्यात केल्या आहेत हे दाखविणारे कागदपत्र जरी दिले व पैसे घेतले तरी प्रत्यक्षांत तोच माल निर्यात केला आहे का ? त्याची तऱ्हा ( Quality ) चांगल्या प्रकारची आहे कां ? याची खात्री निर्यातदाराला माल हातांत मिळेपर्यंत नसते. त्यामुळें शेवटीं व्यापार हा जास्तींत जास्त विश्वासावर अवलंबून असतो या एकाच तत्त्वावर आपल्याला यावें लागतें. तरीपण त्यांतल्या त्यांत व्यापारी हमीपत्रांत ( Commercial Letter of Credit ) विक्रेत्याला खरेदीदाराला योग्य अशा वाटणाऱ्या जास्तींत जास्त संरक्षक अटी निदान घालता येण्याची व दुसऱ्या बाजूला करारानें बांधण्याची शक्यता तरी असते.

व्यापारी हमीपत्राची सर्वमान्य अशी व्याख्या अजून झालेली नाहीं. तरीपण त्याची थोडक्यांत व्याख्या करावयाची झाली तर हमीपत्र म्हणजे " आयातदारासाठीं त्याचे सांगण्यावरून निर्यातदाराला दिलेल्या सूचनानुसार त्यानें कागदपत्र दिल्यास त्याचे पोटीं तावडतोब पैसे देण्याची बँकेनें घेतलेल्या हमीचें करारपत्र" अशी करतां येईल. आयातदारासाठीं असें हमीपत्र उघडणारी बँक तें निर्यातदाराला सरळ पाठवूं शकते. पण पुष्कळदां ह्या हमीपत्राच्या सूचना, निर्यातदाराची बँक वेगळी असल्यास त्या बँकेमार्फत किंवा हमीपत्र उघडणाऱ्या बँकेच्या अन्यदेशांतील प्रतिनिधीमार्फत किंवा आणखी दुसऱ्या बँकेतर्फेही कळवल्या जातात. म्हणजे व्यापारी-हमीपत्रांत ( १ ) आयातदार ( २ ) आयातदाराची हमीपत्र उघडणारी बँक ( ३ ) निर्यातदार व ( ४ ) निर्यातदाराची किंवा त्याला ज्या बँकेमार्फत तें कळवलें जातें ती बँक अशा एकूण चार घटकांचा समावेश होतो. या दोन्ही बाजूसाठीं एकच बँक उघडण्याचें व कळवण्याचें काम करीत असल्यास हे घटक तीन होऊं शकतात.

व्यापारी हमीपत्राचे अनेक प्रकार असूं शकतात. बँकेनें खात्री घेतलेले ( Confirmed ) किंवा बिनखात्रीचे ( Unconfirmed ) व भंग्य ( Revocable ) अथवा अभंग ( Irrevocable ) अशा अनेक प्रकारानीं हमीपत्राचे फरक करतां येतात. असे हमीपत्राचे फरक त्यांत येणाऱ्या दोन बँकाच्या जबाबदारीप्रमाणें खालीलप्रमाणें होऊं शकतात.

| हमीपत्र उघडणाऱ्या बँकेपुरते, (For the Opening Bank) | हमीपत्र कळवणाऱ्या बँकेपुरते; (For the Advising Bank) |
|---|---|
| ( Revocable ) भंग्य | ( Unconfirmed ) बिनखात्रीचे |
| ( Irrevocable ) अभंग | ( Unconfirmed ) बिनखात्रीचे |
| ( Irrevocable ) अभंग | ( Confirmed ) खात्रीचे |

हमीपत्र उघडणाऱ्या बँकेसाठीं भंग्य व अभंग शब्दानें जो अर्थ प्रतीत होतो तोच अर्थ, ते हमीपत्र कळवणाऱ्या बँकेसाठीं, खात्री न दिलेले व खात्रीचे या शब्दानें प्रकट होतो. सर्वसाधारणपणें हमीपत्र उघडणाऱ्या बँकेकडून

भंग्य असणारें हमीपत्र हल्लीं उघडलें जात नाहीं. कारण विक्रेत्याला असें हमीपत्र असलें तरी त्याबाबतची आपली हमी, उघडणारी बँक कधी काढून घेईल याची शाश्वती नसते. तरीपण त्यांतील फरक समजून घेणें जरूर आहे.

**अभंग व भंग्य हमीपत्र :**

हमीपत्र ह्मणजे आयातदारांच्या सूचनेची त्याच्या बँकेतर्फे दिली जाणारी जंत्री, सूची असते. पण कित्येक वेळां परिस्थिति बदलली तर त्यावेळीं आयातदार ह्या सूचना, या पुढें रद्दबातल समजाव्या असें कळवूं शकतो व ही गोष्ट निर्यातदाराला कळवली गेली कीं मग त्यापुढील मालाबद्दल खरेदीदार बांधलेला रहात नाहीं. अशा प्रकारच्या हमीपत्राला भंग्य (Revocable) हमीपत्र म्हणतात. भंग्य हमीपत्र ह्मणजे ज्यामधील सूचनांचा कुणीही नोटीस देऊन भंग करूं शकतो असें हमीपत्र होय. अशा प्रकारचें हमीपत्र जर आयातदार शहाजोग असेल तरच विक्रेता स्वीकारतो. पण सर्वसाधारणपणें अशा हमीपत्राऐवजीं तो अभंग (Irrevocable) म्हणजे कुठल्याही परिस्थितींत ज्यांतील अटी त्याच्या कबुली खेरीज मोडतां येणार नाहीत अशा स्वरूपाचें व शेवटपर्यंत बंधनकारक असणारें हमीपत्र पसंत करतो. अर्थात अशा अभंग हमीपत्रांतील अटीही निर्यातदाराच्या संमतीनें आयातदाराला बदलतां येतात. पण केवळ खरेदीदाराच्या इच्छेप्रमाणें त्यांत बदल होऊं शकत नाहीं. अशा अटी बदलावयाच्या असल्यास त्याला संबंधित सर्व बँकांची व दोन्ही व्यापाऱ्यांची संमती लागते. दोन्हीही बाजूंची संमती असेल तर कुठल्याही प्रकारचा करार बदलतां येतो किंवा संपुष्टात आणतां येतो.

भंग्य हमीपत्र जेव्हां उघडलें जातें तेव्हां तें केव्हांही रद्द करण्याचें बँकेचे आधीन असलें तरी तें उघडणारी बँक, 'असें हमीपत्र रद्द झालें' हें, तें निर्यातदाराला कळवणाऱ्या बँकेला कळवीपर्यंत, त्यावरील तिनें अन्य बँकानी वटवलेलीं कागदपत्रें व दस्त ऐवज स्वीकारण्याला बांधलेली असते. मग असे दस्तऐवज जरी हमीपत्र रद्द झालें हें कळवल्यानतर आले तरी चालतात. मात्र असें हमीपत्र रद्द झाल्याचें कळवितांना,

ते उघडणारी बँक, कळवणाऱ्या बँकेनें रद्बातलपणाचें टपाल मिळण्यापूर्वी कांहीं दस्तऐवज वटवले आहेत कां याची उलट टपाली माहिती मागवीत असते. दोन्ही बँकांकडून भंग्य असणारी हमी पत्रें हल्लीं दिसूं शकत नाहींत पण उघडणाऱ्या बँकेचे अभंग खात्रीपत्र आपली खात्री न घालतां कळवणारी बँक ते कळवूं शकते. अशा प्रकारची हमीपत्रें बरीच असूं शकतात. अशा हमीपत्रांची माहिती कळवताना कळवणारी बँक " सदर हमीपत्र, उघडणाऱ्या बँकेपुरतें अभंग असलें तरी आम्हांला त्यावर आमची खात्री घालण्याच्या सूचना नाहींत. सबब त्यावरील कागदपत्र वटवण्याचे आमच्यावर बंधन नाहीं पण त्यांत नमूद केल्याप्रमाणें बरोबर व योग्य ते सर्व दस्तऐवज आल्यास आम्ही तें वटवूं " असा मजकूर धारकाला पत्रानें कळवते.

भंग्य (Revocable) हमीपत्राची सवलत फक्त पहिल्या प्रतीच्याच आयातदाराचे बाबतींत कुठलाही निर्यातदार देऊं शकेल. पण मग अशा खरेदीदाराला माल पाठवून मग हुंडी वसुलीला पाठवता येणार नाहीं कां , असा प्रश्न निर्माण होईल. अशा सवलतींत व वसुलीला पाठवलेल्या बिलांत फरक येवढाच कीं पहिल्या प्रकारांत बिल व निर्यातीचे दस्तऐवज तयार झाल्यावर ते आयातदाराकडे पाठवण्यासाठीं तयार झाले कीं त्यावेळीं हमीपत्र उघडणाऱ्या बँकेनें हमी काढून घेतलेली नसल्यास निर्यातदाराला तावडतोब, व्याज भरावें न लागतां दस्तऐवजाचे कागद वटवले जाऊन रक्कम मिळूं शकते. या उलट वसुलीला पाठवलेल्या बिलांत आयातदाराला बिल पोचून नंतर त्यानें पैसे भरल्यावर ते परत निर्यातदारापर्यंत येईपर्यंत, त्याचे पैसे अडकून राहतात.

असें भंग्य हमीपत्र उघडलें गेलेलें असल्यास माल निर्यात करतेवेळीं, तें चालू आहे कीं नाहीं याची खात्री करून घेणें निर्यातदाराचें महत्वाचें कर्तव्य ठरतें. अर्थात हमीपत्र उघडणाऱ्या बँकेनें तें 'भंग्य' असें उघडल्यास, ते कळवणारी बँक त्यावर आपली खात्री घालूं शकत नाहीं, हे उघडच आहे. कारण अशी खात्री घालणाऱ्या बँकेला, उघडणाऱ्या बँकेचा पाठिंबा नसतो. कित्येकदां हमीपत्र उघडणाऱ्या बँकेनें तें 'अभंग' आहे असें कळविलें तरी

ही कळवणारी बँक त्यावर आपली खात्री घालीत नाहीं तेव्हां तें हमीपत्र त्या कळवणाऱ्या बँकेपुरतें भंग्य समजतात. इंग्रजींत ( Revocable ) हा शब्द किल्येकदां Unconfirmed अशा अर्थीही वापरला जातो तेंव्हां घोटाळा होण्याची शक्यता असतें म्हणून या शब्दांचे स्पष्ट अर्थ सुरवातीस दिलेले आहेत. याबाबत जेव्हां उघडणाऱ्या बँकेचें हमीपत्र अभंग असतें व कळवणारी बँक आपली खात्रीही त्यावर घालते तेव्हां तें अभंग व खात्रीचे ( Irrevocable & Confirmed ) असें होतें व हा प्रकार सर्वोत्कृष्ट समजला जातो. त्यानंतर अभंग पण बिनखात्रीचें हमीपत्र चांगलें असतें व भंग्य तसेंच खात्री न दिलेले हमीपत्राचा शेवटीं असा अनुक्रम लागेल. पहिल्या प्रकारचें म्हणजे अभंग व खात्रीचें हमीपत्र हें विशेषतः विक्रेत्याला जेव्हां खरेदीदाराची कांहींच माहिती नसते व बाजार विक्रेत्याचा असतो (Sellers' Market) म्हणजे माल पुरवठा कमी पण मागणी जास्त असते त्यावेळीं खरेदीदाराला तें खूप खर्चिक वाटलें तरी विक्रेता आपल्या अटीनुसार असें हमीपत्र उघडण्याचा करार त्यांवर लादू शकतो. विशेषतः दुसऱ्या महायुद्धानंतर राष्ट्राराष्ट्रांतील पूर्वीचे व्यापारी संबंध जेव्हां तुटलेले होते, सर्वत्र मालाची चणचण भासत होती व खरेदीदारविक्रेत्यांचे संबंध विश्वास ठेवण्यासारखे जुळलेले नव्हते तेव्हां बँकांकडून अभंग व खात्रीचीं अशीं हमीपत्रें बरीच उघडलीं जात होतीं. पण दिवसेंदिवस परिस्थिति पालटूं लागली आहे. युद्धानंतर पंधरा वर्षे गेल्यामुळें पूर्वींची चणचण आतां तितकी राहिली नसून बाजार कांहीं बाबतींत खरेदीदाराचा ( Buyers' Market) होऊं लागला आहे. तसेच पहिल्या अनुभवावरून एकमेकातील विश्वास वाढत जाऊन खरेदीदाराबद्दल खात्री येऊ लागल्याने व संबंध जुळूं लागल्यानें दिवसेंदिवस हमीपत्रांचें प्रमाण कमी होत चाललेलें आहे, व निर्यातदाराला जिथें पैशाची चणचण भासत नसेल तिथें वसुलीला पाठवल्या जाणाऱ्या बिलाचें प्रमाण वाढूं लागलें आहे.

हमीपत्र म्हणजे बँकेनें निर्यातदाराला आयातदाराच्याबरोबर त्याच्या झालेल्या विक्रीकरारानुसार कळवलेल्या सूचना असतात, व या सूचना-

धरहक्कम विक्रेत्यानें कागदपत्र दिलें तर त्याचे पैसे देऊं अशी त्यांत हमी असते. आयातदाराच्या बँकेची अशी हमी ही निर्यातदाराला सर्वसामान्यपणें पुरेशी असते. पण कित्येकदां आयातदाराप्रमाणें त्याची बँकही निर्यातदाराला माहितीची असणें शक्य नसते, किंवा त्रिलांत कांहीं चुका राहिल्यास त्या चुकांबद्दल पत्र येईपर्यंत थांबणें शक्य नसतें, व त्यामुळें परदेशांतील बँकेच्याच हमीपत्रावर माल पाठवायला तो तयार होत नाहीं. शिवाय बिनखात्रीच्या, म्हणजेच कळवणाऱ्या बँकेनें स्वतःची जादा खात्री न दिलेल्या हमीपत्रां ( Unconfirmed Letter of Credit ) मध्यें आयातदाराच्या बँकेची जरी 'अभंग' अशी हमी असली तरी निर्यातदाराच्या देशांतील बँकेवर मात्र त्या कागदपत्रांच्या बदलीं त्या निर्यातदाराला पैसे दिलेच पाहिजेत असें बंधन नसतें. म्हणजेच असे व्यापारी हमीपत्र निर्यातदाराकडे पाठवितांना ती बँक दुसऱ्या देशांतील बँकेची हमी घेत नाहीं तर त्या बँकेच्या सूचना फक्त जशाच्या तशा कळवते. त्यामुळें अशा प्रकारच्या हमीपत्रांत निर्यातदाराला संपूर्ण सुरक्षितता वाटत नाहीं. अशा वेळीं अशा हमीपत्रांचे बाबतींत तो आपल्या देशांतील म्हणजेच पर्यायानें त्याला माहीत असलेल्या बँकेची खात्री मागतो, व अशी खात्री त्या हमीपत्राचे बाबतींत दिल्यावर, त्यांत लिहिलेले दस्तऐवज दिल्यास त्याचे पैसे देण्यास निर्यातदाराच्या देशांतील बँक बांधली जाते. तात्पर्य आयातदाराच्या बँकेला थोडक्यांत ती विदेशांतली बँक जामीन राहते. अर्थात अशा प्रकारच्या व्यवहारासाठीं ती बँक आपला वेगळा आकार लावते. विशेषतः खात्री दिलेल्या हमीपत्रांतील हुंडी अनाधार ( Without Recourse ) असली, तर तिचे पैसे मिळाले कीं निर्यातदार सर्व जबाबदारींतून सुटतो. अशा खात्रीचा आकार हा हमीपत्राच्या रकमेवर अवलंबून असतो, व हमीपत्राच्या कालमर्यादेप्रमाणें तो वाढत जातो. तसेच हा आकार सहसा खरेदीदाराच्याच अंगावर पडतो; कारण त्यानें तो न दिल्यास पुऱ्या खात्रीचे अभावीं परदेशी विक्रेता माल विकायला कबूल होत नाहीं. अशा प्रकारच्या हमीपत्राला खात्रीचें ( Confirmed ) हमीपत्र म्हणतात. व ज्यांत परदेशांतील बँक आपल्या

खात्रीची भर घालत नाहीं त्याला बिनखात्रीचें हमीपत्र ( Unconfirmed ) म्हणतात. मात्र हे दोन्ही शब्द कित्येकदा ( Revocable ) किंवा ( Irrevocable ) यासाठींही हमी उघडणारी बँक वापरते, तेव्हा ते उघडणाऱ्या बँकेतर्फे भग्य व अभग अशा अर्थाचे समजावेत.

व्यापारी हमीपत्राचे याखेरीज आणखीही काहीं वेगळे प्रकार आहेत उदा –पॅकिंग क्रेडिट, रेडक्लॉज किंवा इन्व्हॉईस ॲंड अडरटेकिंग असलेलें हमीपत्र, ट्रॅन्स्फरेबल क्रेडिट, बँक टु बॅक क्रेडिट वगैरे वगैरे, अशाबद्दल पुढे स्वतंत्र उल्लेख केला आहेच. व्यापारी हमीपत्रात बँका फक्त दस्तऐवजाच्याच व्यवहाराबद्दल बांधील असतात म्हणून त्याना दस्तऐवजीं हमीपत्रें ( Documentary Letters of Credit ) अशीही संज्ञा दिली जाते.

दस्तऐवजी हमीपत्र उघडताना आयातदाराच्या बँकेला अनेक बाबींचा विचार करावा लागतो. ज्या आयातदाराचेसाठीं आपण असें हमीपत्र उघडणार आहोत, त्याची पत–प्रतिष्ठा काय आहे, तो किती सचोटीचा आहे, त्याचा व्यवहारातील अनुभव काय आहे, तो कुठल्या प्रकारचा, कुठून व किती माल मागवीत आहे याचा बॅक जरूर विचार करते. कारण एकदा हमीपत्र उघडल्यावर व मग बिल आल्यानतर आयातदार ते कागद सोडवून घेवो अगर न घेवो, हमीपत्र उघडणाऱ्या बँकेला आपल्या हमीप्रमाणें निर्यातदाराला पैसे द्यावेच लागतात, व वेळ पडली तर आयात माल विकून आपले पैसे वसूल करून घ्यावे लागतात. अशा विक्रीची वेळ येईपर्यंत मालाचे भाव जर खालीं गेले असतील किंवा निर्यातदारानें लबाडी करून, चागला माल पाठवला नसेल तर बँकेला ठोकर खावी लागते, तसेंच अशा विक्रीआधी माल सोडवण्यासाठीं, तो साठवण्यासाठीं व त्याच्या सुरक्षिततेसाठींही बराच खर्च करावा लागतो. तेव्हा अशा व्यवहारात आयातदाराकडून आपल्याला धोका पोंचणार नाहीं, कागदपत्र आल्यावर तो ते पैसे भरून नक्की सोडवून घेईल अशी बँकेची खात्री असेल किंवा त्याबाबतच्या आर्थिक व्यवहारात माल तारण ठेवून त्यावर नतर कर्ज देण्याचें बँकेनें कबूल केलें असेल तरच बॅक असें हमीपत्र उघडतें

## अंतर (Margin):

वरील विवेचनावरून हमीपत्र उघडण्याचे वेळीं बॅकेच्या दृष्टीनें तें 'संभाव्य कर्जच' होतें हे लक्षांत येईल व त्यासाठींच बँका सर्वसाधारण माल-तारणावरील कर्जाचें वेळीं जसें कांहीं टक्के अंतर (*Margin*) ठेवतात तसेच हमीपत्राचे वेळीं आयातदाराकडून कांहीं रक्कम अंतर (*Margin*) म्हणून घेतात. कांहीं वेळेला खातेदार जर चांगला असेल तर अंतराबद्दलचा निर्बंध घातला जात नाहीं. म्हणजेच असें अंतर शून्य ते शंभर टक्क्यापर्यंतही असू शकतें व ही टक्केवारी खातेदाराची पात्रता, त्याचे बॅकेशीं असणारे संबंध, व मागितल्या जाणाऱ्या मालाला असलेला बाजार, मालाच्या किंमतींत होणारा संभाव्य, अकल्पित चढउतार व विक्री करावी लागल्यास येऊं शकणारी अंदाजें घट याचा विचार करून ठरवली जाते. साखर, कागद वैगेरे सारखा नेहमींच्या व्यवहारांतला, ज्याला कायम बाजार आहे व ज्याच्या भावांत फारसा चढउतार एकदम होत नाहीं अशा प्रकारच्या मालासाठीं सहसा १० ते १५ टक्के अंतर घेतात. तर कांहीं वेळेला खास प्रकारची मशिनरी, विशिष्ट रासायनिक द्रव्यें असा माल आयात करावयाचा असल्यास ५० ते १००% ही अंतर घेतलें जातें. हल्लीं कित्येकदां केवळ आयातदारानें आपल्यातर्फे हमीपत्र उघडावें म्हणून कांहीं वेळेला बँका अनिष्ट स्पर्धेच्या मोहाला बळी पडून अंतराची अट रद्द करतात पण त्यांतील तत्त्व लक्षांत घेतां, तसें करणें योग्य नाहीं. कित्येकदां आयातदारही आजतर बँकेला नुसतेंच पत्र पाठवावयाचें आहे, प्रत्यक्ष बँकेला पैसे द्यावे लागतील तेव्हां आम्हीही लगेच पैसे भरूं; आज आमच्याकडून अंतर कशाला घेतां अशी पृच्छा करतात. कारण अशी अंतराची रक्कम त्यांच्या दृष्टीनें नुसतीच अडकून पडत असते. पण व्यापारी-हमीपत्रें म्हणजे अप्रत्यक्षपणें मालावर दिलेलें कर्जच ठरतें म्हणून हें अंतर आवश्यक असतें हें ध्यानांत ठेवल्यास अशी चौकशी होणार नाहीं.

## आयात परवाना :

हमीपत्र उघडण्याचे वेळीं भारतांत व कांहीं देशांत जिथें जिथें विनिमय-नियंत्रण आहे व व्यापारनियंत्रण आहे तिथें, आयातदाराचे हातांत त्याचे नांवाचा किंवा त्याला आयातीचा अधिकार देणारा अधिकृत सरकारी परवाना (Import Licence) आहे कीं नाहीं हेंही बँका बघतात. आयातपरवाना मिळाला कीं त्याच आधारावर विदेशीचलन खरेदी करण्याचाही परवाना आपोआप मिळाला आहे असें कांहीं देशांत समजलें जातें तर कांहीं देशांत आयात परवाना एका खात्यांतून मिळतो व तो मिळाला तरी त्यासाठीं योग्य तें विदेशी चलन खरीदण्याचा परवाना मध्यवर्ती विदेश विनिमय नियंत्रणखात्याकडून वा मध्यवर्ती बँकेकडून घ्यावा लागतो. भारतांत आयातदाराला आयात परवान्याच्या दोन प्रती मिळतात. एक कस्टममधून माल सोडवण्यासाठीं व दुसरी योग्य तें विदेशी चलन अधिकृत प्रतिनिधीकडून विकत घेण्यासाठीं. यांतील विनिमय-नियंत्रण प्रत, अधिकृत प्रतिनिधीं म्हणून काम करणारी बँक आयातदाराकडून मागून घेते. कुठलेंही हमीपत्र उघडतांना या परवान्यातील कुठल्याही बाबींचा भंग होत नाहीं ना हे बघण्याची जबाबदारी बँकेवर व आयातदारावर असते. पूर्वी कांहीं प्रकारची आयात सर्वसाधारण मुक्तपरवान्यावर (Open General Licence) करता येत होती. पण आतां ही पद्धत जवळ जवळ काढून टाकली आहे. व बहुतेक आयातीला आयातदाराचे नांवाचा वेगळा परवानाच हल्लीं व्यापारनियंत्रण खात्याकडून दिला जातो.

आयात परवान्यावर हमीपत्र उघडतांना बँका परवान्याची संपूर्ण तपासणी करतात. त्यांतली रक्कम, मालाचें वर्णन, त्याची मुदत वगैरे बाबींची टिपणी केल्यावर तो योग्य अधिकाऱ्यानें सही केलेला आहे कीं नाहीं, जिथें खोडाखोड झाली आहे तिथें नियंत्रणाधिकाऱ्याची सही आहे ना, परवान्यावर नियंत्रणकचेरीचें सील लावलें आहे कीं नाहीं वगैरे गोष्टींची नोंद घेते. नंतर परवान्यांत कांहीं बंधनात्मक अटी आहेत का याचाही तिला विचार करावा लागतो. उदा:—या परवान्यांतील १० टक्क्यापर्यंतच स्पेअरपार्ट्स

मागवतां येतील, किंवा परवान्याच्या पन्नास टक्क्यापर्यंत किंमतीचीच आयात पहिल्या सहामाहींत करतां येईल व वृत्तपत्राच्या खपाबद्दलचें योग्य सर्टिफिकेट सादर करून पुढील सहामाही करतां उरलेल्या भागाचे नूतनीकरण करून घ्यावें लागेल; किंवा अमुक अमुक उत्पादक किंवा प्रतिनिधीच्याच नावें, हमीपत्र उघडण्यासाठीं तो दिलेला आहे; किंवा या आयातपरवान्यांतील कांहीं रकम जहाज भाड्यासाठीं वापरण्यापुरत्या रकमेचाच हा परवाना विदेशीचलन बाहेर पाठवण्याबाबत वैध व चालू आहे, वगैरे. आयात परवान्यावर हमीपत्र उघडल्यानंतर ती अधिकृत बॅंकही त्या परवान्याची संयुक्त धारक (Joint Holder) होते. परवान्यावरील माल जकातखात्याकडून सोडवण्याचा फक्त धारकालाच अधिकार असतो व या नियमामुळे खातेदारासाठीं किंवा त्याने पैसे न भरल्यास स्वतःच्या सुरक्षिततेसाठीं जकात भरून बॅंक तो माल सोडवून घेऊं शकते.

बॅंकेंत आलेला आयातदार हा हमीपत्र उघडण्यास लायक आहे ना याची बॅंकेनें खात्री करून घेतल्यानंतर व वरील परवानाप्रत घेतल्यानंतर बॅंक त्याच्याकडून एक करारपत्र लिहून घेते, व आयातदारास निर्यातदारानें कांहीं अटी कळवल्या असल्यास किंवा अदाज बीजक (Proforma Invoice) पाठवला असल्यास तोही मागून घेते. आयातदारानें माल मागवण्यापूर्वी विक्रेत्याकडे किंवा त्याच्या प्रतिनिधीकडे कांहींतरी पत्रव्यवहार केलेला असतो किंवा आपली ऑर्डर दिलेली असते. त्या दोघांमधील खरेदीविक्री हा एक प्रकारचा करारच असतो. या पायावरच हमीपत्राची पुढील इमारत उभी रहाते. तेव्हा त्यांत मागाहून फारसे बदल होऊं नयेत यासाठीं या विक्रीकराराकडे (Contract of sale) जर बॅंकेला नजर टाकायला मिळाली तर खरेदीदारालाच त्याचा फायदा होऊं शकतो. हमीपत्र उघडावयास सांगतांना, त्यांत कुठल्या सूचना असाव्यांत त्याची जर संपूर्ण माहिती विक्रीकरारांत असेल तर बॅंक व खरेदीदार या दोघांचेंही काम सोपें होतें. ती नसली तर बॅंक खालील गोष्टींची माहिती मागते. ही माहिती त्या हमीपत्रांत अंतर्भूत करावयाची असल्यानें खरेदीदारानें ती बरोबर दिल्यास

हमीपत्रात मागाहून बदल करावे लागत नाहींत असे बदल मागाहून कळ-वल्यास त्याचा आकार आयातदारासच भरावा लागतो व दुसरे म्हणजे हमीपत्र अभग ( Irrevocable ) असेल तर धारकाच्या ( Beneficiary ) विरुद्ध जाणाऱ्या गोष्टींतील बदल हें त्याच्या समतीखेरीज करता येत नाहींत, व अशी समती मिळण्यासाठीं कित्येकदा कालापव्यय होऊन व्यवहाराचा खोळंबा होतो.

धारक ( Beneficiary ):

हमीपत्र उघडताना धारकाचें नाव व पत्ता हा बरोबर द्यावा लागतो. पत्ता किंवा नाव चुकीचे अथवा अपुरे असल्यास हमीपत्र वेळेवर पोंचू शकणार नाहीं. धारकाच्या बरोबर खरेदीदाराचा जरी विक्रीकरार झालेला असला तरी धारकाची पत पहाणेंही बँकेला आवश्यक असते कारण बँक हमीपत्राचे बाबतींत फक्त दस्तऐवजासाठींच जबाबदार असते, माला-साठीं वा अन्य गोष्टींसाठीं नाहीं, हे जरी हमीपत्रातील मूलतत्त्व असलें तरी देखील, आयातदारानें दस्तऐवजाची सोडवणूक करून न घेतल्यास बँकेला मात्र पैसे द्यावे लागून, मालाची सोडवणूक करून घेऊन तो विकावा लागतो व धारकानें लबाडीनें वाईट माल पाठवला असल्यास बँकेला खोट बसण्याचा संभव असतो धारकाच्या नावानें हमीपत्र उघडताना बँक या गोष्टीचा जरूर विचार करते. वेगवेगळ्या बँकाचें माहितीखातें या साठीं स्वतंत्रपणें काम करीत असतें. ज्या वेळेला आयातदारालाही धारकाची संपूर्ण माहिती नसते त्यावेळेला त्यानें बँकेतर्फे अशी माहिती काढून घेणें त्याच्या दृष्टीनें हितावह असते.

धारकाचा पत्ता दिल्यानतर, त्याची जर एकादी बँक असेल व त्या बँकेतर्फेच हमीपत्र कळवले जावे अशी त्याची अट असेल तर त्या बँकेचा पत्ताही हमीपत्र उघडणाऱ्या बँकेला द्यावा लागतो. अशा बँकेचें नाव दिलेलें नसल्यास हमीपत्र उघडणाऱ्या बँकेला आपल्या निदेशातील बँक प्रतिनिधी-तर्फे असे हमीपत्र कळवता येते. तसेच धारकानें बँकेचें नाव कळवलें तरीही अशा प्रतिनिधीमार्फत तें त्या बँकेतर्फे कळवलें जाऊ शकतें.

## आयातमाल :

हमीपत्रांत मालाबाबतच्या आपल्या ज्या अटी असतात त्या आयातदाराला बँकेस सांगाव्या लागतात. मालाची आयात करताना भारतांत आयातपरवाना बहुतेक बाबींत आवश्यक असतो. ह्या आयात परवान्यावर मालाचें जें वर्णन दिलेलें असते त्यापेक्षां वेगळें वर्णन सहसा हमीपत्रांत देऊं नये. त्यामुळें कस्टममधून माल सोडवितांना त्रास होण्याचा संभव असतो. अर्थात कांहीं वेळा मालाचें तांत्रिक वर्णन हे वेगवेगळे असूं शकते. व्यवहारांतले मीठ शास्त्रीय परिभाषेंत सोडियम क्लोराईड असते. तेव्हां अशी माहितीही बँकेच्या अधिकाऱ्याला असणें पुष्कळदां आवश्यक असते. पण आयातदारानें देखील त्यांत जर फरक असेल तर बँकेच्या अधिकाऱ्याला त्याप्रमाणें माहिती द्यावी. अर्थात्, वर सांगितल्याप्रमाणें बँक फक्त आयातदारानें मागितलेले कागदपत्र बरोबर मिळतात कीं नाहीं हें बघण्यासच बांधलेली असते, व म्हणूनच मालाचे हमीपत्रांतील वर्णनांत व परवान्यांतील वर्णनांत तफावत आढळणार नाहीं हें बघणें आयातदाराचेंच हिताचें असतें. बॅंकेवरही परवान्यांत लिहिलेल्या मालाचेच कागदपत्र येतात कीं नाहीं हें बघण्याची जरूरी असल्यामुळें अशा वर्णनांत फरक आढळणार नाहीं याची बॅंकही काळजी घेत असते. हमीपत्र म्हणजे संभाव्य कर्ज असतें व त्या कर्जाचें तारण हें त्या हमीपत्रावर येणारा माल असतो ही गोष्ट बँकेला कधींही आड करून चालत नाहीं.

पूर्वीं आयातपरवाने देताना कुठल्या प्रदेशांतून ( Soft or Hard Currency ) माल आणला पाहिजे तेंही त्यांत लिहिलेलें असे. हल्लीं त्यांत फरक ठेवलेला नसल्यानें आयातदाराला ( पोर्तुगाल व दक्षिण आफ्रिका सोडून ) कुठूनही माल आयात करतां येतो. मात्र अशी आयात एकाच परवान्यावर पण अंशतः एका देशांतून व अंशतः दुसऱ्या देशांतून करावयाची असेल तर हमीपत्र उघडतांना कुठल्या देशासाठीं किती चलन वापरायचें आहे तें सांगावें लागतें.

मालाचें वर्णन हमी–पत्रांत देतांना आणखी एक पथ्य पाळावें लागते तें म्हणजे मालाचें वर्णन बरेंच मोठें असूं नये. हमीपत्रानुसार बँक फक्त योग्य त्या कागदपत्रांची हमी घेत असते. त्यामुळें खरेदीदार व विक्रेता यांच्यांत मालाची ठराविक वर्गवारी, गुणवत्ता, प्रकार, कंपनी, या बावत बऱ्याच अटी ठरल्या असल्यास त्या ज्यानुसार ठरल्या असतील त्या ऑर्डरचा किंवा अंदाज–बीजकाचा ( प्रोफर्मा इन्व्हॉईसचा ) क्रमांक व दिनांक दिल्यास हमीपत्रांतील बरेंच घोटाळे पुढें टळूं शकतात. जितकें मोठें वर्णन तितकें त्याचे दस्तऐवज तयार करतांना अनवधानानें विक्रेत्याच्या चुका होण्याचा संभव असतो व मग कांहीं वेळेला किरकोळ चुकांसाठीं ही अन्यराष्ट्रांतील प्रतिनिधी बँकेला आयातदाराच्या बँकेकडे केवल करून दस्तऐवज स्वीकारावयाचे काय अशी विचारणा करावी लागते व त्याचा खर्च बहुशः निर्यातदाराच्या चुका झाल्यानें त्यानें सोसला तरी कांहीं अंशतः आयातदारालाही उत्तर देतांना तरी सोसावा लागतो. कारण या बाबतींत नडित असा तोच असतो. हमीपत्रावर विक्री करण्याचें जेव्हां निर्यातदार कबूल करतो तेव्हां अप्रत्यक्षपणें आयातदारच अडलेला असा असतो. पुष्कळ वेळां ज्याला विक्रेत्यांचा बाजार (Sellers' Market) म्हणतात, तशी परिस्थिति असते तेव्हां विक्रेता सांगील त्या अटी खरेदीदाराला गरज असल्यामुळें मान्य कराव्या लागतात. या उलट खरेदीदारांचा जेव्हां बाजार असतो ( Buyers' Market ) पण विक्रेत्याला विक्रीची घाई उत्सुकता किंवा गरज असते तेव्हां खरेदीदार आपल्या अटी त्यांवर घालूं शकतो. असें जरी असले व वर्णन शक्यतो थोडे असावें असें असलें तरी अशा मालाचे वर्णन देतांना महत्त्वाच्या गोष्टींचा अन्तर्भाव करण्यास मात्र कधींही विसरूं नये.

याची काहीं उदाहरणें खालीं दिली आहेत.

निर्यात होणाऱ्या मालाचें वर्णन :—( अ ) अंदाजें पण जास्तींत जास्त १७.५ मेट्रिक टन पांढरा छापण्याचा कागद – रीळांचे स्वरूपांत, ८४ सें. मी. आकाराचा, वॉटरमार्क नसलेला, व ७० टक्यांचें खालीं

यांत्रिक प्रकारचा लाकडाचे तंतु,नसलेला, व स्क्वेअर मिलीमीटरला ५० ग्रॅमचे खालीं वजन नसलेला.

( ब ) रोटरी प्रिंटिंग मशीनसाठीं 'क्यू' टाईपचे दोन रबर रोलर्स

( क ) एक मोनोटाईप सुपर कास्टर, सर्व किरकोळ व सहाय्यक वस्तूंसह

( ड ) आम्लमुक्त, संपूर्ण ब्लिच केलेला, पांढरा शुभ्र टिश्यू कागद दिनांक १२ एप्रिल १९५९ च्या इंडेंट नंबर ४४ प्रमाणें

( ग ) २६ गेजचे ८ फूट × ३ फूट मापाचे गॅल्वनाईज केलेले पत्रे–सुमारे दोन लाँग टन

( म ) दिनाक ४ मे १९६२ च्या अंदाज बीजकाप्रमाणें रेफ्रिजिरेटरचे सुटे सामान

( भ ) तेरा किंवा त्यापेक्षा जास्त टक्के कोबाल्टसह टंगस्टन असलेले हायस्पीड स्टील सुमारें पण जास्तींत जास्त १.५ टन

( न ) लॅटेक्स स्वरूपांतलें रबर – ५० टन.

मालाच्या वर्णनाबाबत लक्षात ठेवण्याची दुसरी एक बाब म्हणजे ज्या वेळेस व्यवहारांत ठराविक मालाची विक्री होईलच असें ठरलेलें नसतें तेव्हा 'अंदाजें' 'सुमारें' असे शब्द घातले म्हणजे विक्रेत्याला बराच वाव मिळतो. कागदाची आयात करताना पांच टन कागद ४८० च्या रिमामध्यें बांधलेल्या पॅकिंगमध्यें असें म्हटलें तर कदाचित् पांच टन कागद पुरा करायचाच असेल तर शेवटचें रिम ४८० कागदाचें भरेलच असें नाहीं. ज्या वेळेला विशिष्ट परिमाणें, उदाः–लांबीरुंदी दिलेली असतात किंवा दोन चार प्रकारच्या तऱ्हा मागितल्या असतात, पण विक्रेत्याला त्यांत कुठली तऱ्हा किती पाठवायची या बाबत किमान बंधन घालून बाकीची सवलत दिलेली असते, त्यावेळेला अशा शब्दामुळें त्याला ती सवलत मिळते. हमीपत्रांत असे शब्द असले तर १० टक्के कमी किंवा जास्त माल पाठवण्याची व त्याप्रमाणें कमी जास्त किंमत आकारण्याची त्याला मुभा मिळते. अर्थात् नियंत्रणानें जेव्हां

कमाल माल वा किंमत यांची मर्यादा घातलेली असते तेव्हां, सुमारें पण च्या पेक्षां जास्त नाहीं (about...but not exceeding) अशी अट घालून कमाल–मर्यादेबाबतचें स्वातंत्र्य काढून टाकलें जातें. मालाचे वर्णन दिल्यानंतर हमीपत्रांत त्या मालाची नगाला कांहीं ठराविक किंमत ठरली असेल ती द्यावी व ती किंमत कुठल्या कुठल्या प्रकाराचे आकारसहित आहे तें द्यावें. कुठलाही माल परदेशीं निर्यात करतांना त्यावर सहा तऱ्हेचा खर्च असतो (१) कारखान्यांतील पॅकिंगखर्च, (२) कारखान्यापासून रेल्वेपर्यंत नेण्यासाठीं लागणारी वाहतूक, (३) रेल्वे भाडें (४) स्टेशनपासून बंदरापर्यंतचा वाहतूक खर्च, (५) बोटीचे भाडें (६) विमा. हा खर्च विक्रेत्यानें द्यायचा कीं खरेदीदारानें द्यायचा हें विक्रीकरारांत ठरलेलें असतें.

## वेगवेगळ्या करारांचे प्रकार :

**वा. भा. वि.** (Carriage Insurance & Freight):

ज्या वेळेला करार वा. भा. वि. (C. I. F.) तऱ्हेचा असतो त्यावेळेला हा सर्व खर्च विक्रेत्यानें सोसावयाचा असतो व तो हा अंदाज धरूनच आपली किंमत विक्रेत्याला अर्थात् सांगत असतो. हे सर्व आकार त्या त्या कराराप्रमाणें मालाच्या फॅक्टरीमध्ये विकावयाच्या असलेल्या किंमतींत वाढवले जातात. वा. भा. वि. म्हणजे वाहतूक, जहाज भाडें व विमा. (Carriage, Insurance & Freight). कित्येकदां यांतील विम्याचा खर्च खरेदीदार स्वतः सोसतो. त्याचा स्वतःचा या तऱ्हेचा खूप व्यापार असेल किंवा त्याला वेगवेगळ्या तऱ्हेचा विमा उतरवायचा असेल व विक्रेता त्यानें कळवलेल्या किंमतींत सर्व प्रकारचें संरक्षण देऊं शकत नसेल तर, अथवा आपल्या देशांतील विमाकंपनीला व्यवहार देऊन त्याला विदेशी चलनात बचत करायची असेल तर तो अशा तऱ्हेचा विमा उतरवण्याचे स्वतः अंगिकारतो. या तऱ्हेच्या कराराला वा. भा. (C & F) प्रकारची विक्री म्हणतां येईल. वा. भा. म्हणजे फक्त वाहतूक व जहाजभाडें (Carriage & Freight) होय.

यानतरच्या पुढच्या प्रकारात बोटीचें भाडेंही खरेदीदाराच्या अगावर पडतें. म्हणजे विक्रेत्यानें तो माल फक्त बोटीवर चढविण्याची जबाबदारी घेतलेली असते. या प्रकाराला आनौक करार (Free on Board F O B) म्हणतात. अशा करारात फॅक्टरीपासून तें बोटीपर्यंत माल पोंचवण्याचा सर्व खर्च विक्रेता करतो व जहाजाचे भाडें व विमा हे खर्च आयातदार करतो.

सर्वसाधारणपणें मालाची खरेदी विक्री वा. भा. वि. (C I F) वा. भा. (C & F) व आनौक (F O B) या तीन प्रकारापैकीं कुठल्यातरी प्रकारानें होते. पण कित्येकदा जहाजावर माल चढवण्यापूर्वी पडणारे जे खर्च असतात ते म्हणजे जहाजापर्यंत रेल्वेनें माल पोचवताना द्यावें लागणारें भाडें, रेल्वेच्या स्टेशनवर माल आल्यापासून तो बंदरात पाठवीपर्यंत द्यावा लागणारा वाहतूकखर्च व यापेक्षाही फॅक्टरीपासून माल रेल्वेत नेण्यासाठीं करावा लागणारा पॅकिंगचा खर्च हे ही खरेदीदाराला सोसावे लागतात. अर्थात् या खर्चाची जबाबदारी खरेदीदारावर टाकायची असेल तर विक्रेत्याला त्याप्रमाणें विक्रीकरार करावा लागतो. ज्यावेळेला विक्रेता आहे तसाच माल कारखान्यातून नेण्यासाठीं खरेदीदाराला सांगतो त्यावेळेला त्या कराराला स्थानीय (Loco) करार म्हटलें जातें. माल पॅकिंग करून जेव्हा विक्रेता तो खरेदीदाराच्या हातात ठेवतो व पुढे तो माल रेल्वेपर्यंत व तेथून बोटीवरही नेण्याची जबाबदारी खरेदीदाराची असते तेव्हा त्याला कारखान्याबाहेरचा (Ex-Factory) करार म्हणतात. त्यानंतर तो माल रेल्वेपर्यंत पोचवण्याचा खर्च विक्रेता करतो तेव्हा आग्निरथ (F O R, Free on Railway) करार होतो. यापुढें जाऊन रेल्वेचें भाडेंही विक्रेता भरतो व माल समुद्र किंवा नदीकिनाऱ्यापर्यंत आणून टाकतो तेव्हा त्याला "आतीर" (Free Alongside, F A S) करार म्हणतात

थोडक्यात वा भा. वि. करारात सर्व जबाबदारी व खर्च विक्रेत्याला असतो तर स्थानीय विक्री करारात सर्व जबाबदारी खरेदीदार स्वीकारीत असतो.

वरील सात प्रकारांपैकीं कुठल्या प्रकारानें आपण माल घेतला आहे हें हमीपत्रांत नोंदण्यासाठीं बँकेला सांगितलें म्हणजे हमीपत्रानुसार जे कागद येतील त्यांत विक्रेत्यानें योग्य ते आकार लावले आहेत ना याची बँक आयातदारासाठीं खात्री करून घेते.

वरीलपैकीं कुठल्याही अटीवर हमीपत्र उघडायचें असलें तरी एक महत्त्वाची गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे. ती म्हणजे भारतसरकारनें दिलेला आयातपरवाना वा. भा. वि. रकमेसाठींच दिलेला असतो. त्यामुळें बोटीचें भाडें किंवा विमा याची खर्च खरेदीदारानें सोसण्याचे अटीवर विक्रीकरार झाला असेल तरी त्यायोगें किंमतींत पडणाऱ्या फरकांमुळें आयातदाराला आयातपरवान्यांतील वा. भा. वि. करारांतील भाडें व विमा यांची रक्कम वजा देतां उरलेल्या कमाल मर्यादेच्या पलीकडे जाऊन माल आयात करतां येणार नाहीं. परवान्याप्रमाणेंच विक्रीकरारही वा. भा. वि. ( C. I. F. ) पद्धतीचा असला तर हमीपत्र, परवान्यांत दिलेल्या संपूर्ण रकमेपुरतें उघडतां येते. पण माल जर वा. भा. ( C & F ) पद्धतीवर मागवला जात असेल तर विम्यासाठीं प्रत्यक्ष जितके पैसे आयातदारानें विमाकंपनीला संरक्षणाकार म्हणून दिलेला असेल तितका वजा करून उरलेल्या रकमेपुरतेंच हमीपत्र बँका उघडतात किंवा असें विमापत्र, उघडण्याचे वेळीं बँकेचे हातांत नसल्यास किंवा बँकेलाच असा विमा उतरवायाला सांगितला असल्यास, बँका सुमारें एक टक्का रक्कम संरक्षणाकारासाठीं ( जरी तो भारतीय रुपयांत भारतांतच दिला गेला तरी ) वजा करून उरलेल्या रकमेचें हमीपत्र उघडतात. तसेंच करार जर आनौक ( F. O. B ) पद्धतीवर असेल तर विम्यासाठीं एक टक्का वा प्रत्यक्ष संरक्षणाकाराची रक्कम व बोटीच्या शेवटच्या बंदरांत धात्रयांच्या भाड्यासाठीं ( Freight ) १० टक्के अशी रक्कम बाजूला ठेवून हमीपत्र उरलेल्या रकमेपुरतें उघडलें जातें. उदाहरणार्थ, १००० रुपयांचा परवाना असल्यास बँक १००० रुपयांचें वा. भा. वि. अटीचे किंवा ९९० रुपयांपर्यंत वा. भा. अटीचे किंवा ८९० रुपयांपर्यंत आनौक अटीवरचें हमीपत्र उघडील.

या तीन्ही प्रसगात परवान्यावर नोदताना मात्र सपूर्ण १००० रक्कम खर्ची टाकली जाऊन उदाहरणार्थ ८९० रुपयाचें हमीपत्र उघडलेल्या शेवटच्या बाबतींत ११० रुपये शिल्लक अशी दाखविली न जाता शून्य अशी दाखवली जाईल

एकदा परवान्यावर अशी रक्कम हमीपत्र उघडल्यावर नोंदली गेली कीं परकीय चलनाची विक्री खरोखरींच रद्द झाल्याखेरीज ती नोद, रद्द करता येत नाहीं. अशी नोद रद्द करून परवान्यावरील उपलब्ध रकमेची शिल्लक वाढवून पूर्ववत् करताना बॅंकेला त्या व्यवहाराच्या रद्दबातलपणाची सपूर्ण खात्री करून घ्यावी लागते विशेषत परवान्यातील रकमेपैकीं अशत रकमेचे हमीपत्र उघडल्यानतर नतर काहीं कारणामुळें निर्यातदार माल पाठवू शकला नाहीं किंवा त्याबाबत त्यानें काहीं कळवलेंही नाहीं तर मालाच्या आवश्यकतेमुळे आयातदार हमीपत्रातील कराराची तारीख उलटली कीं लगेच बॅंकेकडे ती नोंद उलटवण्याची विनती करण्यासाठीं येतो पण त्यावेळीं किंवा त्या तारखेनतर जवळजवळ पधरा दिवस, अमेरिकेसारख्या ठिकाणाहून तर महिनाभर उलटून जाईपर्यंत बॅंकेला अशी नोद सामान्यपणे उलटविता येत नाहीं कारण या अवधींत कदाचित् शेवटच्या दिवशीं वटवलेले कागदपत्र त्या देशातील कुठल्यातरी बॅंकेकडून येण्याची शक्यता असते हमीपत्र ही बॅंकेनें निर्यातदाराला दुसऱ्या बॅंकेतर्फे आपली खात्री दिलेली हमी असते, त्यामुळे परदेशातील या दोन्ही पक्षानीं काहींही कळवल्याखेरीज केवळ आयातदाराच्या सागण्यावरून किंवा त्याला आलेल्या पत्रावरून तें रद्द झालें असें बॅंक समजू शकत नाहीं तेव्हा अशा परिस्थितींत बॅंकेनें आपल्या प्रतिनिधी बॅंकेकडे विचारणा करून त्याचें उत्तर येईपर्यंत जाणारा कालावधी टाळावयाचा असेल तर खात्रीचा मार्ग म्हणजे आयातदाराचें विक्रेत्याला पत्र लिहून बॅंकेचें हमीपत्र प्रतिनिधी बॅंकेकडे रद्द करण्यासाठीं देण्यासाठीं व तसें तें रद्द केल्याचें प्रतिनिधी बॅंकेकडून आपल्या बॅंकेस कळवण्यासाठीं विनति करणें ही होय विशेषत असें मूळ हमीपत्र प्रतिनिधी बॅंकेकडे परत झाल्याखेरीज बॅंक नोंद उलटवायला बहुधा तयार नसते कारण वगैराची

सवलत ज्या बँकेतर्फे हमीपत्र पाठवलें जातें तिच्याच तर्फे दिली असल्यास हमीपत्र उघडणाऱ्या बँकेला, त्या बँकेला निदान लिहून तरी तिनें शेवटच्या दिनांकापर्यंत असे कागदपत्र वटवले आहेत कां याची चौकशी करतां येते. पण वटावाचे बाबत अशी निर्बंधित सवलत नसल्यास निर्यातदार तें हमीपत्र कुठल्याही बँकेकडे दाखवून त्याबरहुकूम असलेले कागदपत्र वटवून घेऊं शकतो. अशी बँक, हमीपत्र, उघडणाऱ्या बँकेची प्रतिनिधी असेलच असेंही नाहीं. पण त्या उघडणाऱ्या बँकेचें नांव माहीत असल्यानें व तिच्याकडे मागणी केल्यावर आपले पैसे मिळतील अशी वटवणाऱ्या बँकेची त्या हमीपत्र उघडणाऱ्या बँकेबद्दल (व आपल्या निर्यातदाराबद्दलही) खात्री असल्यानेंच ती त्याबरहुकुम पैसे देऊन वटावाचा व्यवहार करणें शक्य आहे. त्यामुळेंच हमीपत्र उघडणाऱ्या बँकेला कुठल्या बँकेकडून कागदपत्र येतील हें माहीत असणें संभवनीय नसल्यानें व कुठल्याही बँकेनें योग्य कागदपत्र दाखल केल्यास त्याचे पैसे देण्यास ती बांधलेली असल्यानें ती वटावाच्या दिनांकानंतरही वरील उल्लेखाप्रमाणें वटावाच्या शेवटच्या दिलेल्या तारखेच्या पुढें सुमारें अर्धा ते एक महिन्याचा काळ सुरक्षिततेसाठीं जाऊं देते, व नंतर न पटलेली शिल्लक,' हमीपत्रांतील न वापरलेली रक्कम म्हणून परत आयात परवान्यावर पुढील मार्गदर्शक रक्कम काढण्यासाठीं नोंदली जाते. फक्त रकदांच

कांहीं एका विशिष्ट अटींचें पालन करण्याची बँकेनें निर्यातदाराला दिलेली लेखी हमी असते व अशा हमीमध्यें बँकेला, अशा बदलानें धारक व स्वतःचें हितसंबंध यांस बाध येत नाहीं हें बघितल्याखेरीज, बदल करतां येत नाहीं. खात्रीच्या हमी-पत्राबाबत तर बँकेला तें निर्यातदाराची बँक व तो स्वतः यांनीं मान्यता दिल्याखेरीज त्यांत कुठलाही बदल करतां येत नाहीं.

## हमीपत्रान्वयें लागणारे दस्तऐवज :

नंतर आयातदारानें आपल्याला हमीपत्रांत कुठले कुठले कागदपत्र विक्रेत्याकडून हवे आहेत यांची नोंद द्यावी. हें कागदपत्र हाच मुळीं हमी पत्राचा गाभा असतो. कारण व्यापारी-हमीपत्र हें खऱ्या अर्थानें दस्त-ऐवजी हमीपत्र असतें. त्यांत केवळ 'नेहमींचे निर्यात कागद' असा उल्लेख करूं नये व बँकही तेवढ्या मोघम शब्दावर हमीपत्र उघडायला कबूल होणार नाहीं. नेहमींच्या नाविक दस्त ऐवजांत (१) निर्यातपत्र, (२) विमापत्र, (३) बीजक हे तीन कागदपत्र सर्वसामान्यपणें येतातच. त्याखेरीज कॉन्सुलर इन्व्हॉईस किंवा इंपीरिअल प्रेफरन्स इन्व्हॉईस, वजनाची नोंद असलेली यादी, पॅकिंगचीं माहिती असलेली यादी, मालाचे संपूर्ण वारकावे देणारी यादी, आपल्या प्रतिनिधीचे किंवा अन्य प्रतिनिधीचे माल तपासल्याबद्दलचे खात्रीपत्रक, माल कुठें तयार झाला ते दर्शविणारे म्हणजे उत्पत्तिस्थानाबद्दलचें निर्यातदाराचें किंवा तद्देशीय व्यापारी संस्थेचें पत्र वगैरे कागद जर पाहिजे असतील तर त्याप्रमाणें उल्लेख करावा लागतो. हमीपत्रान्वयें नेहमींचे जे दस्तऐवज येतात त्यांचेविषयींच्या खुलाशाप्रमाणें सर्वसाधारण नाविक दस्तऐवजांतल्या कागदपत्राबाबतही आयातदाराला खुलासे द्यावे लागतातच. त्यांत बीजकाच्या किती प्रती असाव्यात, निर्यातपत्र एका विशिष्ट देशाच्या जहाजाचेंच हवें कां, तें निर्दोष व 'ऑनबोर्ड किंवा 'शिपूड' असावें का, 'चार्टरपार्टी, व 'रिसीव्हड फॉर शिपमेंट' पद्धतीचें चालेल, निर्यात-पत्र नाविक असावे कां हवाई-निर्यातीची किंवा पोस्टपार्सलची पावती चालेल, नाविक-निर्यातपत्रांत माल आल्यावर आयातदाराला त्याची सूचना द्यावी अशी अट (Notify Clause) पाहिजे कां वगैरे खुलासे

करावे लागतात. हुंडीबाबत ती मुदती असावी व किती मुदतीची असावी कां दर्शनी असावी, ती मालाच्या संपूर्ण किंमतीची कां ऐंशी नव्वद अशा अंशतः टक्क्याचीच असावी याचे निर्देश जरूर असतात. विमापत्राचे बाबत ते पॉलिसीचे स्वरूपातच हवे कीं सर्टिफिकेट असलें तरी चालेल, ते उत्कृष्ट अशा ठराविक कंपन्यापैकींच पाहिजे का ?; त्यात कुठले कुठले धोके सरक्षित केलेले असावेत, हुंडीच्या रकमेच्या पेक्षा किती टक्क्यानें जास्त असावे, त्याची हक्कपूर्ति नुकसानभरपाईचा हक्क शाबीत करावा लागल्यास कुठे व्हावी, या सूचना आयातदाराला द्याव्या लागतात. अर्थात वा. भा. वि. प्रकारचा करार असेल तेव्हाच विम्याबाबतच्या सूचना द्याव्या लागतात. अन्य प्रकारच्या करारात विमा आपण उतरणार किंवा उतरविला असल्याचें बँकेला सांगावें लागतें व विमापत्र बँकेकडे तिनें मागितल्यास सुपूर्द करावें लागतें. विमापत्र बँकेने काढावें अशी इच्छा असल्यास वरील माहितीच हमीपत्रात घालण्यासाठीं म्हणून नव्हे तर बँकेच्या माहितीसाठीं द्यावी लागते व त्याचा संरक्षणाकार, अंतराची रक्कम वगैरेबरोबर भरावी लागते किंवा खात्यास नावें टाकण्यासाठीं बँकेला लिहून द्यावे लागते. वरील सर्व दस्तऐवज—सर्वसाधारण नाविक दस्तऐवज व खास दस्तऐवज—सकृद्दर्शनीं बरोबर असल्यास त्याच्या अस्सलपणाच्या खात्रीविषयीं वा अन्य बाबी-बाबतही बँकेची काहीं जबाबदारी असणार नाहीं असेंही या कागद-पत्राच्याबाबतच्या सूचनाचे अखेरीस, लिहून द्यावें लागतें.

## बंदराचीं ठिकाणें :

त्यानंतर मालाची निर्यात कुठल्या बंदरांतून केली पाहिजे व तो कुठल्या बंदरांत उतरवला पाहिजे याचीही माहिती द्यावी लागते. ज्यावेळेला एखाद्या राष्ट्राला किनारा नसतो त्यावेळेला निर्यातदाराला कुठलें बंदर जवळ पडेल याची माहिती त्यानें कळवलेली असते. त्या बदरांतून निर्या-तीची परवानगी त्याला हमीपत्रांत द्यायला लागते. या बदराचा उल्लेख ज्यावेळेला वा. भा. वि. ( C. I. F. ) पद्धतीचा करार नसतो त्यावेळेला खरेदीदाराचे दृष्टीनें महत्त्वाचा असतो. पण वा. भा. वि. करारांत

मात्र विक्रेत्याला स्वातंत्र्य द्यायला कांहींच हरकत नसते. कारण खरेदीदाराचे दारांत इतर कुठलाही खर्च न पडतां माल पडावयाचा असतो पण इतर करारांत निर्यातीच्या वेगवेगळ्या बंदरांमुळे भाड्यांत पडणाऱ्या फरकामुळें आयातदाराला कमी जास्त झीज बसण्याची शक्यता असतें.

### हमीपत्राची मुदत :

हमीपत्राचें बाबत तें हमीपत्र किती मुदतीपर्यंत चालू ( Valid ) रहायचें आहे तेंही सांगावे लागतें व ही तारीख कुठल्या ठिकाणासाठीं आहे हेंही महत्त्वाचें असतें. कारण एक हमीपत्र जर लंडन या ठिकाणीं एकतीस डिसेंबरपर्यंत चालू ( Valid ) असेल तर निर्यातदाराला लंडनमधील बँकेंत त्या तारखेपर्यंत कागदपत्र हजर करून पैसे घेता येतील पण तें जर मुंबई या ठिकाणीं त्या तारखेपर्यंत चालू असेल तर निर्यातदाराला तें कागदपत्र मुंबईत ३१ डिसेंबरपर्यंत पोंचतील अशा दृष्टीनेंच लंडनमधील बँकेंत हजर करावे लागतील; म्हणजेच ती बँक लंडन येथें जास्तींत जास्त २४–२५ तारखेपर्यंतच कागदाचा स्वीकार करील. बहुधा निर्यातदार आपल्या गांवींच शेवटच्या तारखेपर्यंत हमीपत्र चालू रहावें अशी विनंती खरेदीदाराला करीत असतो. हमीपत्राचा धारक बहुधा निर्यातीनंतर दुसऱ्यातिसऱ्या दिवशीं नाविक दस्तऐवज बँकेंत देऊं शकतो. पण या मुदतीपर्यंत जर निर्यातदाराला माल रवाना करून त्याचे कागदपत्र हजर करतां येत नसतील तर कित्येक वेळां माल निर्यात करण्याची तारीख व कागदपत्र दाखल करण्याची तारीख अशा दोन तारखा हमीपत्रांत देतात ( Last Date of Shipment & Date of Negotiation ) भारतांतून उघडल्या जाणाऱ्या बहुतेक सर्व हमीपत्रांत असे दोन दिनांक देण्याची पद्धत आहे. मात्र या दोन तारखांतील अन्तर १५ दिवसांचेवर जास्त देत नाहींत. माल निर्यात केल्यानंतर बोटीच्या मालकाकडून निर्यातपत्र मिळायला व त्यानुसार त्यावरील खुणा वगैरेचे उल्लेख करून बीजक, तपासणीपत्रें वगैरे दस्तऐवज तयार करण्यासाठीं निर्यातदारास कांहीं मुदत लागते म्हणूनच ही सोय केली जाते. विशेषतः निर्यातदाराचें ठिकाण व निर्यातीचें बंदर यांत अंतर असेल तर अशी मुदत

आवश्यक असते. किलेकदां या दोन्ही तारखांतील अंतर माल आयातीच्या बंदरांत कधीं पोहोंचेल त्या मुदतीवर अवलंबून ठेवतात. कारण कुठल्याही परिस्थितींत मालाचे कागदपत्र बोट पोचण्याच्या आंतच आयातदाराचे हातांत पाहिजेत. माल जर बंदरांत आधीं उतरला तर विलंब दंड (Demurrage) सुरूं होऊन आयातदाराला निष्कारण भुर्दंड बसेल व यासाठींच निर्यातदाराकडून योग्य ते कागदपत्र त्याला बोट बंदरांत यायचे आधींच मिळाले पाहिजेत.

## हमीपत्र कसें कळवतात ? :

निर्यातदाराच्या नांवानें हमीपत्र उघडतांना त्याचा माल तयार आहे कीं नाहीं, त्याला माल कधी व कसा पाठवतां येणें शक्य आहे, माल तयार असून तो केवळ हमीपत्राठीं वाट बघत आहे काय वगैरे बाबी विक्रीकरार करतांना खरेदीदाराला माहिती झालेल्या असतात. त्यानुसार तें 'हमीपत्र किती महिने वा दिवस चालूं (Valid) राहील तो काळ घालणें आवश्यक असतें. हा काळ दिल्यास अर्थातच अखेरची तारीख (Expiry Date) सांगतां येते. किंवा हमीपत्रांतील अखेरच्या तारखा सांगितल्या तर हा कालावधी बँक घालूं शकते.

हमीपत्राचा कालावधी थोडा असेल तर हमीपत्राच्या सूचना आयात दाराला विदेशी तारेनें (Cable) पाठवाव्या लागतात.' केबलनें संदेश पाठवतांनाही दोन प्रकार असतात. एक प्रकार म्हणजे पूर्ण आकाराची केबल व दुसरी स्वस्त दराची. स्वस्त दराच्या केबलला लेटर टेलिग्रामही म्हणतात. या केबलचा दर पूर्ण आकाराच्या केबलपेक्षां निम्मा असतो. पण तो कमींत कमी २२ शब्दांसाठीं आकारला जातो. मात्र पूर्ण दराची केबल ही लगेच पाठवली जाते. लेटर टेलिग्राम हा सर्व महत्त्वाच्या तारा संपल्या नंतर अखेर जातो. किलेकदां अशा तारांना कांहीं देशांतून Night Telegrams म्हणूनही संबोधलें जातें. ज्यावेळेला हमीपत्राची मुदत अगदीं थोडी असेल, माल तयार असेल आणि एका ठराविक बोटीनें पाठवण्यासाठीं निर्यातदार हमीपत्राचीच वाट पहात असेल त्यावेळेलाच

केवलने हमीपत्र पाठवतात. पण इतर वेळीं हल्लीं सर्वसामान्यपणें हवाई टपालानेच अशा सूचना पाठवतात. कारण बहुतेक देशांतील महत्त्वाच्या ठिकाणीं हल्लीं हवाई टपाल योजना असते व एक ते तीन दिवसांत असें टपाल पोचूं शकते. हमीपत्राच्या सूचना या पद्धतीपैकीं कुठल्या पद्धतीनें पाठवाव्यात हेही त्याबाबतच्या सूचना देण्याच्या अर्जावर आयातदाराला लिहावें लागतें.

## हमीपत्रांतील हुंडी :

हमीपत्रात आणखी एका महत्त्वाच्या गोष्टीचा उल्लेख करावयाचा असतो व तो म्हणजे निर्यातदाराने कशा पद्धतीची हुडी काढावयाची आहे याबद्दल असतो. ज्यावेळेला आयातदारानें कागदपत्र मिळताच पैसे द्यावयाचे असतात त्यावेळेला दर्शनी हुडी काढण्याची सूचना तो देतो. ( At Sight ) पण कित्येकदा आयातदाराला पैसे देण्यासाठीं थोडी मुदत हवी असते. त्यावेळीं विक्रीकरारात तो पधरा, तीस, साठ, नव्वद किंवा एकशेंवीस दिवसांनीं पैसे देण्याचें कबूल करून घेतो. अशा करारामुळें मग हमीपत्रात तो तितक्या दिवसाची मुदती हुंडी काढण्यासाठीं निर्यातदाराला विनंती करतो. अशी मुदती हुडी काढल्यानंतर निर्यातदाराने आपले कागदपत्र तिच्यासह वटविण्याऱ्या बॅंकेकडे दिले तरी त्याला त्यावरील पैसे पाहिजे असल्यास ती हुडी वटवून मिळूं शकतात. भारतातील आयातदारासाठीं उघडल्या जाणाऱ्या हमीपत्रांत अशी हुडी बॅंकेवर न निघता आयातदारावरच काढली जात असल्यानें त्याबाबतींत, अशी हुडी म्हणजे खरें पाहिलें तर आयातदार व त्याची बॅंक याच्यातीलच तेवढ्या मुदतीचा व्यवहार ठरतो. म्हणजे अभंग हमीपत्रान्वयें अशा अटीला मान्यता देणारी बॅंक अप्रत्यक्षपणें आयातदाराला पैसे भरण्यासाठीं तेवढी मुदत देत असते. ज्या वेळेला हुडी बॅंकेवर काढलेली असते, त्यावेळेला निर्यातदाराला पैसे घेण्याची घाई नसेल तर तो सही करून मान्य केलेली हुडी ( Accepted Bill ) तशीच ठेऊ शकतो. नतर त्यानर त्याला पैसे पाहिजे असल्यास कुठल्याही बॅंकेकडून ती हुडी वटवून ते मिळूं शकतात. मात्र अशा

हुंडीचे पैसे देतांना हमीपत्रावर जेव्हां परदेशांतील बँक आपली खात्री घालते तेव्हां ती दर्शनी हुंडीप्रमाणें पैसे न देतां ती हुंडी वटवल्याचा वेगळा व्यवहार करते. म्हणजे हमीपत्रापुरता व्यवहार हुंडी स्वीकृत झाल्यानंतर त्या बँकेतर्फे संपलेला असतो. पण अशा हुंडीवर हमीपत्र उघडणाऱ्या बँकेची सही किंवा खात्री असल्यानें तिला ती हुंडी वटवण्यांत कांहींच धोका नसतो. २००० पौंडांचे हमीपत्रांतील हुंडी दर्शनी असतां ही बँक त्या हुंडीवरचे २००० पौंड निर्यातदाराला लगेच देईल. पण तीच ३ महीने मुदतीची असेल तर हमीपत्र उघडणाऱ्या बँकेकडे त्या हुंडीसह सर्व कागदपत्र परदेशांतील बँक पाठवेल व आयातदाराचे बँकेवर काढलेली हुंडी स्वीकृत होऊन आल्यावर ती निर्यातदाराला देईल. पण पैशाच्या जरूरीमुळें त्यानें ती स्वीकृत होऊन आल्यावर जर लगेच वटवली व वटवण्याचे वेळीं इंग्लंडमधली अशा हुंडीसाठीं वटावाची कसर वार्षिक ४% असली तर त्याला ते बिल वटवणारी बँक, ते वटवून देतांना तीन महिन्यांची कसर वीस पौंड कापून घेऊन उरलेली खात्यांत जमा देईल किंवा त्याबद्दल आपला १९८० पौंडांचा चेक देईल. मात्र अशी वटावयाची कसर आयातदारानेंच द्यावयाची असते असा हमीपत्रान्वयें निर्यातदार व आयातदार यांच्यांत पूर्वी किंवा हमीपत्रांतून करार झालेला असल्यानें कापलेल्या २० पौंडाच्या कसरीसाठीं ती खात्री देणारी बँक हमीपत्र उघडणाऱ्या बँकेच्या खात्याला २० पौंड नावें टाकून त्या रकमेचा दुसरा चेक त्या निर्यातदाराला देईल. म्हणजेच निर्यातदाराला १९८० अधिक २० पौंड मिळून त्याच्या हुंडीइतकी रक्कम मिळतेच; मात्र हमीपत्र उघडणाऱ्या बँकेचे नावें हुंडी वटवल्यावर २० पौण्ड व हुंडीची मुदत भरेल त्या दिवशीं हुंडीची संपूर्ण रक्कम म्हणजे २००० पौण्ड अशी एकूण २०२० पौण्ड रक्कम नावें पडते व पर्यायानें ही रक्कम हमीपत्र उघडणारी बँक, आयातदाराकडून त्याचप्रमाणें वसूल करते. म्हणजेच आयातदाराला हुंडीची रक्कम भरण्यासाठीं मुदत मिळते. पण त्यासाठीं व्याज हें द्यावेंच लागतें. त्याच्या सुदैवानें स्वीकृत हुंडी निर्यातदारानें न वटवतां मुदत भरेपर्यंत तशीच ठेवली तर मात्र त्याला व्याज भरावें न लागतां फक्त हुंडीची रक्कमच भरावी लागेल.

## न उलटणारें हमीपत्र ( Without Recourse )

निर्यातदारानें ( किंवा वसुलीच्या बिलें देणाऱ्यानें ) कागदपत्र दिल्यावर ते त्याच्यासाठीं कुठल्याही बँकेनें वटवलें तरी, शेवटीं आयातदारानें ( किंवा बिल ज्यावर काढले आहे त्यानें ) पैसे देईपर्यंत ती बँक निर्यातदाराला जबाबदारींतून मुक्त करीत नाहीं. वटवलेल्या बिलाचे पैसे योग्य मुदतींत आयातदाराकडून न आल्यास त्या दरम्यान दोघात तटा उत्पन्न होऊन हुंडी तशीच पडल्यास, किंवा हमीपत्र उघडणारी बँकच अडचणींत आल्यास ते निर्यातदाराकडून परत मागण्याचा हक्क, वटवणाऱ्या बँकेला राहतो. म्हणजेच आयातदारानें हुंडी वटवली ही माहिती मिळेपर्यंत मिळालेले पैसे केव्हांही परत करावे लागतील हा धसका निर्यातदाराला असू शकतो. हमीपत्रात याबद्दलची एक अट घाइन निर्यातदार त्यातूनही आपली सुटका करून घेऊ शकतो. ती म्हणजे न उलटणाऱ्या प्रकारचें ( Without Recourse ) अभग हमीपत्र मागणें ही होय. अशा हमीपत्रान्वयें मागितलेले कागदपत्र बरोबर दाखल केल्यास, कळवणाऱ्या वा खात्री दिलेल्या बँकेनें ते कागदपत्र वटवल्यानतर निर्यातदाराची जबाबदारी सपूर्णपणें सपते. म्हणजेच तें बिल त्याचेवर परत पैसे देण्यासाठीं उलटू शकत नाहीं. अशा हमीपत्राच्या दस्त-ऐवजाचे पैसे वटवणाऱ्या बँकेनें दिले कीं ती तें हमीपत्र उघडणाऱ्या बँकेकडून वसूल करू शकते, निर्यातदाराकडून नाहीं आणि आयात-दाराकडून शेवटी पैसे मिळाले नाहींत तर अशा दुर्घटनेंत तें हमीपत्र उघडणाऱ्या बँकेला भरावे लागतात म्हणूनच असें न उलटणारें हमीपत्र उघडताना बँका हा व्यवहार खूप काळजीपूर्वक करीत असतात. अशी अट नसल्यास तें हमीपत्र उलटू शकणारें ( With Recourse ) असें समजले जाईल भारतीय आयातदाराना उघडावीं लागणारीं हमीपत्रें बहुधा न उलटणारींच असतात.

हमीपत्र न उलटणारें असलें तरी त्यावरील दस्तऐवज जर योग्य व अटीप्रमाणें नसतील तर तें वटविण्याचें बधन हमीपत्र कळविणाऱ्या बँकेवर नाहीं किंवा ते स्वीकारण्याचे व पैसे देण्याचें बधनही हमीपत्र

उघडणाऱ्या बँकेवर वा आयातदारावर नाहीं. असें सदोष किंवा अपुरें दस्तऐवज वटवण्याचा व्यवहार केल्यास तो करतांना वटवणारी बँक निर्यातदाराकडून एक अभयपत्र घेते व त्या अन्वयें त्या बँकेला पैसे न मिळाल्यास उलट जाऊन ते निर्यातदाराकडून मागण्याचा अधिकार प्राप्त होतो. म्हणजेच या अभयपत्रानें वटवलेल्या हुंडीचे बाबत निर्यातदारावर न उलटण्याची अट रद्द होते व हमीपत्रांतील ती हुंडी व्यवहारातः उलटणारी ( With Recourse ) अशी होते. अशा सदोष व/वा अपुऱ्या दस्तऐवजांच्या हुंड्या वटवतांना घेतल्या जाणाऱ्या अभयपत्राचा नमुना, पुढें विदेशी हुंड्या व दस्तऐवजांच्या वसुली व वटवण्याबाबत जिथें माहिती दिली गेली आहे तिथें आटळेल.

## अंशतः निर्यात व बदली प्रवास :

हमीपत्रांत आणखी दोन गोष्टींबाबत सूचना देणेंही जरूरीचें असतें. त्या म्हणजे सर्व माल एकाच बोटीनें यावयाचा ( In one shipment ) कां जमेल तसा थोडा थोडा माल आला तरी चालेल ( Partial shipments ) व येणारा माल निघणाऱ्या बंदरांतून ज्या बोटीने निघेल त्याच बोटीनें थेटपर्यंत शेवटच्या उतरण्याच्या बंदरांत यावयाचा कीं मध्यें कारणपरत्वें बोटी बदलल्या तरी चालतील ( Transhipment ) ह्या होत. ज्यावेळेला मालांत एकादें सबंध मशिनच असेल किंवा पूरक ( Complementary ) वस्तू सारख्या वस्तू असतील तेव्हां तो एकाच बोटीनें येणें इष्ट असतें. कारण थोडा थोडा येऊन त्याचा उपयोग होत नाहीं. पण माल एकाच प्रकारचा असेल तर तो थोडा थोडा आला तरी व्यापार किंवा उत्पादनांस त्यानें मदतच होऊं शकते. उदा.—५०००० वार कापड आयात करावयाचें असेल तर सर्व मालाचे उत्पादन होऊन तो एकदम पण बऱ्याच कालावधीनंतर येण्यापेक्षां, ५००० वाराच्या लॉटमध्ये आला तर व्यापाऱ्याला लगेच बाजारांत विक्री करण्याचा मोका मिळतो, सर्व भांडवल एकदम गुततही नाहीं व बाजारपेठही साधते. किंवा १०००० गॅलन कच्चें रसायन किंवा अशा प्रकारचें ॲसिड वगैरे कच्चा माल असेल तर तो थोडा थोडा आला तरी ही कारखान्याचें

उत्पादन चालू राहू शकते, व पर्यायानें माल साठवण्यासाठीं गुदामाच्या लागणाऱ्या सोयी किंवा द्यावें लागणारें भाडें यासारख्या दुसऱ्या चिंतेंतून व्यापाऱ्याची वा कारखानदाराची सोडवणूकच होते. बहुधा सर्व साधारणपणें एका बोटींत एकदा भरलेला माल एकाच जहाजानें / प्रवासानें येतो. पण काहीं कारणामुळें तें जहाज कुठें अडकल्यास, थांबल्यास, नादुरुस्त झाल्यास, युद्ध वगैरे सुरू झाल्यास दुसऱ्या जहाजानें तो माल पाठविला जाऊ शकतो. किंवा कित्येकदा माल निघण्याचे ठिकाणापासून ते पोंचण्याच्या बंदरापर्यंत प्रवास करणारें एकच जहाज संपूर्णपणें तो प्रवास करणाऱ्या बोटी नसल्यानें मिळणें अथवा असल्या तरी तावडतोब मिळणें शक्य नसतें. त्यातील अर्ध्या प्रवासानंतर असलेलीं बंदरें घेणारीं जहाजें असलीं व जिथपर्यंत त्याना ती वाहतूक करणें शक्य आहे तिथपर्यंत त्यानीं ती करावी अशा उद्देशानें निर्यात झाली तर पुढील प्रवासासाठीं बदली प्रवासा ( Transhipment ) ची संमती द्यावी लागते. मात्र ती देणे अपरिहार्य नसल्यास ती सवलत द्यायची कीं नाहीं हें आयातदारावर अवलंबून असतें. बदली प्रवासामध्यें मालाची नासधूस, नुकसान होण्याचा किंवा तो हरवण्याचा धोका जास्त असतो म्हणून पुष्कळदा ती दिली जात नाहीं. दिल्यास त्याबद्दलचें योग्य संरक्षण विमापत्रात घ्यावें लागतें

## हुंडी खरेदीचा अधिकार ( वटावी हमीपत्र ) :

ज्यावेळेला एकादी बँक हमीपत्र उघडते तेव्हा त्याबाबत ती आर्थिक जबाबदारी स्वीकारत असल्यानें त्या हमीपत्रावरील दस्त ऐवजात निर्यातदाराला ती स्वत वर हुंडी काढावयास सांगते. जिथें परदेशातील बँक आपली खात्री घालते, तिथें खात्री देणारी बँक स्वत वर ती हुंडी काढावयास सांगते तर काहीं बँका ती काढावयास सांगत नाहींत व योग्य ते कागदपत्र दाखल झाल्यावर, हमीपत्र हा करार असल्यानें हुंडी असली किंवा नसली, तरी ते वटवतात भारत आणि काहीं पौर्वात्य राष्ट्रांतील बँका मात्र हमीपत्र उघडताना थोड्या वेगळ्या पद्धतीचा अवलंब करतात. अशा हमीपत्रातून हमीपत्र उघडणाऱ्या बँकेवर किंवा खात्री देणाऱ्या बँकेवर हुंडी ( ड्राफ्ट )

काढण्याऐवजीं निर्यातदाराला मूळ आयातदारावर हुंडी काढावयास सांगितली जाते. तसेंच असें हमीपत्र उघडतांनाही तें ज्या बँकेतर्फे कळवलें जातें तिच्या नांवें हमीपत्र न लिहितां खुद्द निर्यातदाराचे नांवाचेंच हमीपत्र तें उघडणारी बँक लिहिते व ज्या बँकेमार्फत तें परदेशांत कळवायचें असेल त्या कळवणाऱ्या बँकेला मूळ हमीपत्र व त्याची एक प्रत पाठवून, त्यांतील मूळ हमीपत्रच जसेंच्या तसें किंवा त्यावर आपली खात्री घालून निर्यातदाराकडे पाठवण्यास सांगते. असें हमीपत्र काढल्यामुळें तें कळवणाऱ्या बँकेला हमीपत्राच्या दस्तऐवजांबद्दल रक्कम देण्याच्या (Paying against Credit documents) ऐवजीं हुंडी आयातदारावर काढली गेल्यानें ती फक्त वटविण्याचा (Negotiation Authority to Purchase) अधिकार मिळतो. त्यामुळें, असें हमीपत्र निर्यातदाराकडे पाठवणाऱ्या (कळवणाऱ्या) बँका—विशेषतः अमेरिकन बँका—असें हमीपत्र मूळ धारकाकडे तसेंच पाठवतांना त्याचे सोबतचे पत्रांत, आम्हाला फक्त या हमीपत्रांत मागितलेले दस्त ऐवज वटविण्याचा अधिकार दिला गेला आहे असें लिहितात व त्या पत्राची प्रत, हमीपत्र उघडणाऱ्या बँकेला पाठविली जाते त्यांतही तेंच नमूद करतात. अशा मर्यादेमुळें त्या बँकावर दस्तऐवज वटवलेच पाहिजे असें बंधन राहात नाहीं. अशा हमीपत्रांतील हुंडी ही बँकेऐवजीं आयातदारावर काढली जात असल्यानें व त्याची पत, स्थैर्य, सचोटी या बद्दल कांहींच माहिती नसल्यानें अशी हुंडी बँकेवरील हुंडीपेक्षां कमी प्रतीचीच समजली जाते. बँकेवरील हुंडी ही सगळ्यांत उत्तम दस्त ऐवज असतो. अशी हुंडी जर मुदतीची असेल तर निर्यातदार ती कुठल्याही बँकेकडून घेऊन गेला तरी त्यावरील स्वीकाराची सही दुसऱ्या एका बँकेचीच असल्यानें त्याला वटावाचा दर जास्त चांगला मिळतो. तितका चांगला दर ती हुंडी मूळ आयातदारावरच असेल तर मिळणार नाहीं हें उघड आहे. कारण जितकी हुंडी चांगली तितका दर चांगला (Better the bill, batter the rate) हा व्यापारी व्यवहारांतला महत्त्वाचा नियम आहे. उपरिनिर्दिष्ट वटावी हमीपत्राचे बाबतींत (Negotiation Credit) तें कळवणाऱ्या बँकेला कागदपत्र वटवायचे नसल्यास त्या बाबत निर्यातदाराला कारणें द्यावीं लागत नाहींत.

हमीपत्र उघडताना बँक तें उघडण्याची विनंती करणाऱ्या खातेदाराची पत, आर्थिक सचोटी याचा विचार करतेच, त्याचप्रमाणें तें ज्या धारकाचे नांवें उघडलें जाणार आहे, त्याच्याही पतीबद्दल व प्रामाणिकपणाबद्दल चौकशी करीत असते. कारण आयातदारानें माल सोडवून घेतला नाहीं तरी बँकेला मात्र दस्तऐवजाचे पैसे द्यावेच लागतात व निरुपाय म्हणून त्या खालीं येणारा माल हा त्या प्रदानासाठीं तारण म्हणून समजावा लागतो. हमीपत्र न उलटणाऱ्या हुंडीच्या प्रकारचें असेल व कागदपत्र अगदीं बरोबर सादर करून निर्यातदारानें फसवाफसवीच्या उद्देशानें कमी प्रतीचा किंवा कमी किंवा वेगळाच माल पाठविलेला असल्यास तो विकताना बँकेला लाखाचे बारा हजारच घ्यावे लागतात व आयातदारावर तुटीसाठीं फिर्याद करूनही पैसे वसूल होण्यासारखे नसल्यास तोटा सहन करावा लागतो. काहीं वेळा खोटीं नावें धारण करून व खोटे आयात-परवाने सादर करून हमीपत्र उघडण्यास सांगणाऱ्या ठकांमुळें बँकेला नुकसान पोहोचण्याचा संभव असतो. केवळ पूर्वीच्या काहीं व्यवहारात योग्यवेळीं कागदपत्र सोडवले एवढाच अनुभव पुढील व्यवहाराबाबत उपयोगी पडत नाहीं कारण मागील व्यवहारात तांत्रिकदृष्टया दोषी असलेले कागद सोडवून घेतले तरी पुढील व्यवहारात अगदीं तशीच क्षुल्लक तांत्रिक चूक असल्यास आयातदार त्याचा फायदा घेऊन कागदपत्र सोडवण्याचे नाकारू शकतो. हमीपत्र म्हणजे अप्रत्यक्षपणें दिलें जाणारें (माल गहाण) कर्जच होय. असें असल्यानें बँकांनीं हमीपत्र उघडणाऱ्या आयातदाराची कसून चौकशी करणें स्वाभाविक आहे व त्याचेसाठीं केवळ परवाना आहे येवढ्यावरच समाधान न मानता बँक त्या आयातदाराच्या संपूर्ण व्यवहाराची, व सर्व आर्थिक उलाढालींची चौकशी करते व ती तशी केल्यास, आयातदाराने फक्त हमीपत्र उघडण्यासाठीं येवढा खटाटोप का व चौकशी का अशी भूमिका न घेता बँकेला आपल्या व्यवहारासंबधीं संपूर्ण माहिती विश्वासानें देऊन तिचेशीं सहकार्य केलें पाहिजे. कारण बँकेची खात्री पटणें म्हणजे व्यवहार सुलभ होणें हें त्यानें ध्यानात ठेवलें पाहिजे. त्याचप्रमाणें हमीपत्र उघडताना

बँका, फक्त आयातदार सांगेल त्याप्रकारचे दस्तऐवजांचेबद्दल निर्यातदाराला विदेशांत पैसे देण्याची हमी स्वीकारतात व अशा रकमेपोटीं हमीपत्रांत मागितले गेलेले असे योग्य दस्तऐवज दिल्यानंतर त्यांचे आयातदाराबद्दलचे कर्तव्य संपतें. मालाची प्रत, प्रकार, वजनमाप, पॅकिंग, याबद्दल त्यांची कांहीही जबाबदारी नसते. हमीपत्रान्वये बँका फक्त कागदपत्रांचा व्यवहार करतात, मालाचा नव्हे हें हमीपत्रांतील मूलभूत तत्त्व आहे. तसेंच ह्या कागदपत्रांचा खरेखोटेपणा पाहाण्याचें बंधनही हमीपत्र उघडणाऱ्या व । वा कळवणाऱ्या बँकेवर नसते. या सर्व बाबीसाठीं आयातदाराला बांधून घेण्यासाठीं प्रत्येक बँक करार लिहून घेत असते. कांहीं बँका सर्व हमीपत्रांसाठीं लागूं होणारा असा एकच करार लिहून घेतात. या कराराचा सर्वसाधारण नमुना खालीं दिलेला आहे.

## अभंग, न उलटणारें हमीपत्र उघडण्यासाठीं अर्ज.

मॅनेजर,........ .......बँक यांस,

कृपया तारेनें । हवाईमार्गानें आपल्या.........येथील प्रतिनिधींचे द्वारा...........या धारकांचे नांवानें अभंग व न उलटणारें हमीपत्र खालील सूचनांचा अंतर्भाव करून उघडावें. सदर हमीपत्रांवर आपल्या प्रतिनिधि बँकेला स्वतःची खात्री घालण्यास सांगावी. हमीपत्राची रक्कम...........असावी, व त्या अन्वयें.......... हा माल ( अंदाजें ) निर्यात व्हावा. त्याची आमचेवर काढलेली हुंडी दर्शनी ।...........मुदतीची असावी, व ती बीजकाच्या .........टक्के रकमेची असावी. माल............बंदरांतून.........या बंदरात येण्यासाठीं निर्यात व्हावा, व तो एकाच जहाजानें एकदम यावा । अंशतः वेगवेगळ्या वेळीं आल्यास चालेल. मालाचें उत्पादन.........इथें झालेलें असावें. बदलीप्रवास संमत आहे । नाहीं.

वरील हमीपत्रांत वर्णन केलेल्या मालाबद्दल खालील प्रकारचे दस्तऐवज हवेत.

( १ ) सही केलेलें बीजक–दोन । तीन प्रतींत.

( २ ) निर्दोष, स्वच्छ, नौकास्थित ( Shipped ) प्रवासाकार ( Freight ) दिलेलें । द्यावयाचें, निर्यातदाराचे हुकुमानुसार किंवा त्याची कोरी सही असलेलें किंवा.........बँकेचें किंवा तिच्या प्रतिनिधीच्या नांवे केलेल्या नाविक निर्यातपत्राचा संपूर्ण संच. माल विमानानें किंवा पोस्टपार्सल पद्धतीनें निर्यात व्हावयाचा असल्यास निर्यातपत्रा-ऐवजीं हवाईमार्गपावती किंवा पोस्टपार्सलपावती, चालेल.

( ३ ) पहिल्या प्रतीच्या................विमाकंपनीचे पॉलिसी । सर्टि-फिकेटचे स्वरूपांतील, खालील संरक्षण देणारे, बीजकाच्यावर किमान...........टक्के असलेले, हक्कपूर्ति................या ठिकाणीं होणारें, विमापत्र दोन प्रतींत. संरक्षणाच्या बाबी—गुदामापासून गुदामापर्यंत, दूरान्वित संरक्षण, सर्वांगीण संरक्षण, संपूर्ण किंवा अंशात्मक ( W. A. or F. P. A ), युद्ध, संप, टाळेबंदी, नागरिक-वेंडाळी, चोरी, उचलेगिरी, अप्रदान, बदलीप्रवास, शुद्ध जल, चिखल, हुक्स, तेल, उंदीर या तत्सम प्राण्यापासून होणारें नुकसान-विमापत्रातील अटी इन्स्टिट्यूट कार्गोच्या संमत शब्दानुसार असाव्यात.

### किंवा

विक्रीकरार हा वा. भा. वि खेरीज अन्य प्रकारचा म्हणजे वा. भा. । आनौक...........पद्धतीचा असून विमापत्र आम्ही काढलें आहे । काढत आहोंत. आमचेसाठीं बँकेनें वरील अटींचे पैकीं...... या अटींचे विमापत्र काढावे व त्याचा संरक्षणाकार आह्मी देऊं.

( ४ ) उत्पादनस्थान पत्र.

( ५ ) अन्य लागणारे दस्तऐवज. ( १ )..........( २ )..........
वरील कागदपत्रांच्या खरेपणाबद्दल वा त्यांतील मजकुराच्या खात्री-बद्दल, ते दस्तऐवज सकृद्दर्शनीं बरोबर दिसल्यास, बँक जबाबदार नाहीं.

सदर हमीपत्र उघडण्यासाठीं मालाच्या रु.........च्या किंमतीसाठीं मर्यादिलेला, क्रमांक.........दिनांक...........चा आयातपरवाना सोबत,

जोडला आहे. या हमीपत्रान्वयें ज्या हुंड्या काटल्या जातील त्यांवर या हमी पत्राचा क्रमांक असला पाहिजे. तसेच सदर हमीपत्र..........या बँकेतर्फे कळवलें जावें.

या हमीपत्रान्वयें माल निर्यात करण्याचा शेवटचा दिनांक........व कागदपत्र वटवण्याचा शेवटचा दिनांक........हा राहील.

सदर हमीपत्र उघडण्याचे बँकेनें कबूल केल्यामुळे व त्यानुसार आपल्या शाखेला विदेशी प्रतिनिधीबँकेला हमीपत्रांत लिहिलेले दस्तऐवज वटवण्यास सांगितल्यामुळें आम्हीं असा करार करतो कीं,

( १ ) सदर हमीपत्रान्वयें येणाऱ्या सर्व हुंड्या आम्ही स्वीकारूं व त्याचे पैसे मागितले गेल्यावर। या हुंड्या देखाड झाल्यावर । मुदत भरल्यावर लगेच भरूं.

( २ ) सदर हुंड्यांचे पैसे तुमचे कचेरींत, त्या चलनाचे चालू विक्रीचे परिमाणानें व वटवण्याच्या दिवशीं असलेल्या तुमचे व्याजाचे दरानें, ( सदर रक्कम परदेशात पोंचती होण्याच्या सभाव्य दिनांकापर्यंत व्याजासह व तत्संबंधी ) तुम्हास कागदपत्र वा माल यासाठीं द्याव्या । कराव्या लागलेल्या सर्व खर्चासह भरू.

( ३ ) विदेशी चलनाचे परिमाणाबाबत, हुंड्यांची मुदत ज्या दिवशीं भरेल त्या दिवशींचा दर किंवा ज्या दिवशी हुंड्याची रक्कम प्रत्यक्ष भरली जाईल त्या दिवशीं चालू असलेला दर किंवा या हुंड्याबाबत कोर्टकचेऱ्या झाल्यास तत्संबंधी कोर्टाचा हुकूमनामा ज्या दिवशीं होईल त्या दिवशीं चालू असलेला दर यांतून तुम्हांस योग्य वाटेल त्या दरानें पैसे भरण्याचें आम्ही मान्य करतो.

( ४ ) सदर हमीपत्र उघडण्यासाठीं तुम्ही मागाल तेव्हा तुमचें कमिशन त्या संबंधी वेळोवेळीं ठरवल्या जाणाऱ्या दराप्रमाणें, त्या दिवशीच्या चालू दरानें, हमीपत्राच्या संपूर्ण रकमेवर, तदनुषंगिक पोस्टेज, विलस्टँप वगैरे आकारांसह देऊं.

( ५ ) सदर हमीपत्रासाठीं तुमचे प्रतिनिधीस यावे लागणारे खर्च, आणि दर्शनी हुंडयांची रक्कम, व्याज, वगैरे बाबत सर्व रकमा वाटल्यास बँकेला आमचे खातीं नांवें टाकण्याचा अधिकार आहे व अशी रक्कम नावें टाकल्याचें कळवलें जातांच, आम्ही खात्यांत शिल्लक नसल्यास त्या रकमेचा लगेच भरणा करूं.

( ६ ) सदर हमीपत्रान्वयें आमचेबद्दल तुम्हांस जे जे खर्च करावे लागतील वा आम्ही ज्या रकमेसाठीं तुमचे आज वा यापुढें ऋणको राहूं त्याबद्दल, या आमच्या अन्य हमीपत्रांवरील येणें असलेल्या किंवा अन्य खात्यांवरून येणें असलेल्या रकमेबद्दल सदर उघडल्या जाणाऱ्या हमीपत्रान्वयें येणारा सर्व माल व / वा त्याचे दस्तऐवज अशा येण्या-बद्दल आपणाकडे तारण म्हणून राहील, मग तो आम्ही नुसता अगर विश्वास पत्रान्वयें सोडवलेला असला तरी बँकेच्या या हक्कास बाध येणार नाहीं. तसेच अशा मालाच्या विक्रीमुळें येणाऱ्या रकमेवर वा त्याच्या अन्य व्यवहारामुळें निर्माण होणाऱ्या दस्तऐवजावर बँकेचा अधिकार राहील.

सदर मालाचा ताबा घेण्याचा अधिकार बँकेच्या अधिकाऱ्यास वा प्रतिनिधीस वाटल्यास केव्हांही राहील. तसेच तत्संबंधीच्या विमापत्रावर वा त्यांमुळें मिळणाऱ्या नुकसानभरपाईच्या रकमेवरही आमचेंकडून कुठलेंही येणें असेपर्यंत बँकेचे हक्क राहातील, व बँकेला ते पैसे वसूल करण्याचा व त्यांची योग्य ती विल्हेवाट लावण्याचा संपूर्ण अधिकार राहील.

( ७ ) या हमीपत्रावर येणाऱ्या कागदपत्राशिवाय व मालाशिवाय, जास्त तारण जरूर आहे असें बँकेला वाटल्यास आम्ही तें देऊं. तसेंच बँकेच्या ताब्यांत किंवा अन्य खात्यांतून आमचें जें कांहीं तारण असेल तें व वसुलीचीं असलेलीं बिलें वगैरे हे सर्वही बँकेस, येण्यापोटीं तारण राहील.

( ८ ) या हमीपत्राची हुंडी योग्यवेळीं पटवली न गेल्यास, कुठल्याही तऱ्हेची जाहिरात किंवा संदर्भ न देता बँकेला त्या हमीपत्रान्वये येणारा माल सर्व अगर थोडा थोडा जाहीर लिलावानें अगर खासगी सौद्यात विकण्याचा अधिकार राहील किंवा अशा लिलावांत व सौद्यांत स्वतः बोलून तो खरेदी करण्याचा हक्क राहील. ही विक्री, माल, आल्यावर किंवा येण्यापूर्वी देखील करतां येईल; त्याबद्दलच्या हिशोबाची तक्रार न सांगतां आम्ही तो मान्य करूं.

( ९ ) सदर हमीपत्रासाठीं दिलेल्या आयातपरवान्याच्या अस्सलपणाबाबत आह्मी जबाबदार आहोत. तसेच त्यानुसार येणाऱ्या मालाची गुणवत्ता, प्रकार, तऱ्हा, खात्री, वजनमाप याबाबत किंवा त्याच्या कागदपत्रावरील केलेल्या वर्णनात व प्रत्यक्ष मालांत तफावत पडल्यास त्याच्याबद्दल बँकेस दोष देणार नाहीं वा तोशीस लागूं देणार नाहीं. तसेच हमीपत्रावरील सकृद्दर्शनी बरोबर असलेल्या दस्तऐवजाचा खरेखोटेपणा, त्यांतील दोष, लांडीलबाडी, मामटेगिरी, नक्कल किंवा मालाबाबतचे निर्यातीची वेळ, प्रकार, पद्धत, तो बदरांत बरोबर येणें न येणें याबद्दलही सर्वस्वी आह्मीच जबाबदार राहूं. जहाजाच्या अनियमितपणाबद्दल, उशीराबद्दल, ते वाहवत गेल्यास, अडकल्यास, नष्ट झाल्यास त्याबद्दल, किंवा दस्तऐवज उशीरा आल्यास त्याबद्दल बँकेची जबाबदारी नाहीं. तसेंच बँकेनें अगर बँकेच्या प्रतिनिधींनीं दैनंदिन व्यवहारातील सद्भावास धरून ( In Good Faith ) कुठलेंही कृत्य केलेलें असल्यास त्यापासून काहीं इजा, अपाय, वा नुकसान पोचल्यास त्याबद्दल बँकेला अभय दिलें गेलें आहे. या हमीपत्रानुसार, मागितलें गेलेलें दस्तऐवज सकृद्दर्शनीं बरोबर येत आहेत येवढेंच बघण्याची बँकेची जबाबदारी आहे.

( १० ) हमीपत्र आमच्या सागण्यानुसार जर तारेनें उघडलें गेलें तर अशा तारेंत ती साध्या वा साकेतिक भाषेंत असली तरी, ती पाठवतांना कांहीं गफलत, दोष राहिल्यास, तिचा चुकीचा अर्थ लावला गेल्यास, तिच्या-

तील शब्द वगळले गेल्यास वा ती कळवतांना, पोचतांना उशीर झाल्यास अथवा न पोचल्यास, अथवा गैरसमज उत्पन्न झाल्यास अशी तार आमचे विनंतीनुसार, आमच्या जबाबदारीवर जात असल्यानें आम्हीं बँकेला त्यापासून होणाऱ्या कुठल्याही नुकसानीस जबाबदार धरणार नाहीं.

(११) या हमीपत्रावरील हुंड्या सोडवून घेतल्यानंतर आमचे, बँकेविरुद्ध कुठलेच हक्क, हितसंबंध वा आक्षेप रहाणार नाहींत. तसेंच या हमीपत्रान्वयें येणाऱ्या मालाची जकातखात्यांत अडवणूक झाल्यास किंवा कुठल्याही सरकारी कायदेकानू, वटहुकूम वा नियमामुळें वा युद्ध प्रसंगामुळें, ते उतरवण्यास मनाई झाल्यास त्याची सर्व तोशीस आम्ही घेऊ.

(१२) या हमीपत्रांत कांहीं 'शोध' करण्यास आम्हांकडून सांगितलें गेलें तर त्याचा योग्य तो आकार आम्ही देऊं आणि हा करार मूळ हमीपत्राप्रमाणेंच त्याच्या पुढील शोधाबाबतही करार आहे असें समजले जाईल.

आपले

(अर्जदाराची सही)

शोध ( Amendments ):

हमीपत्र जेव्हां खात्रीचें (Confirmed) असें उघडलें जातें तेव्हां त्यांतील अटी बदलतांना निर्यातदार या आयातदार यांतील एकाच्याच इच्छेप्रमाणें त्या बदलल्या जाऊं शकत नाहींत. तर या दोन्हीं बाजूंची व त्यांच्या दोन्ही (वा अनेक) बँकांचीही त्याला संमती लागते. सर्वसाधारणपणें आयातदार जेव्हा आपल्या बँकेकडे असे शोध देण्याची विनंति करतो तेव्हां ते शोध जर निर्यातदाराला अनुकूल असतील तर त्याच्या किंवा त्याच्या बँकेचा विरोध येणारच नाहीं हे गृहीत धरून हमीपत्र उघडणारी बॅंक तो शोध निर्यातदाराला कळविते. पण असे शोध निर्यातदाराला प्रतिकूल असतील ( म्हणजे हमीपत्राची रक्कम कमी होत असेल, माल निर्यातीची मुदत कमी होत असेल, मालाची प्रत, प्रकार बदलत असेल, तर, तो शोध निर्यातदाराला मंजूर असेल तरच कळवण्याची व तो मान्य झाला असे धरण्याची परदेशांतील बँक, जबाबदारी घेते. असा शोध निर्यातदाराला कळवतांना ती बँक त्यांतील एका प्रतीवर त्याची संमती कळवण्याची अट घालते व ती संमती आल्यावरच ती अट ( किंवा शोध ) सर्वसंमत समजली जाते. असा शोध कळवलेला प्रत्येक कागद हा हमीपत्राचा अंतर्गत व अविभाज्य भाग समजला जातो व निर्यातदाराला तो मूळ हमीपत्राला जोडून ठेवावा लागतो.

अनेकदां विक्रीकरार काय आहे न बघतां किंवा निर्यातदाराशी असा करार न करतांच आयातदार हमीपत्र उघडून टाकतो व मग नंतर अनेकदां त्याला निर्यातदाराच्या इच्छेप्रमाणें असे शोध द्यावे लागतात. तेव्हां आधींच या गोष्टीची काळजी घेतली तर असे शोध सारखे द्यावे लागणार नाहींत. अशा प्रत्येक शोधासाठीं बँकेला आकार द्यावा लागतो व कालापव्ययही होतो हा विचार करून आयातदारानें प्रथम विक्रीकरार करून व त्याला अनुसरूनच जर हमीपत्र उघडलें तर त्याचा बराच खर्च वाचेल. असें शोध देतांना ते हवाई मार्गानें द्यावयाचे कां तारेनें द्यावयाचें हें हमीपत्र उघडणाऱ्या बॅंकेला आयातदाराकडून कळावें लागतें.

---

## व्यापारी-हमीपत्र (पुढें चालू)

१२

हमीपत्र उघडण्यासाठीं आयातदार बँकेंत आल्यानंतर बँका त्याच्या परवान्याची संपूर्ण तपासणी करतात. नंतर हमीपत्रांत कुठल्या अटी आयातदार घालूं इच्छितो त्याची माहिती देणारा व त्यासंबंधीं त्याला बांधून घेणारा एक करारवजा अर्ज त्यांचे कडून घेतात, आणि योग्य विचार घेऊन मग तें हमीपत्र एक रजिस्टरमध्यें अनुक्रमानें नोंदवतात. ा अनुक्रमानें केलेल्या नोंदीचा पडणारा क्रमांक ह्याच हमीपत्राचा ांक असतो. (हा क्रमांक एका ठराविक आंकड्यापर्यंत गेला कीं बँका अनुक्रम परत सुरूं करतात.) नंतर परदेशांत कुठल्या बँकेतर्फे ह्मीपत्र कळवावयाचें तिची निवड बँकाबँकांतील अन्योन्य संबंधाचा ार करून हमीपत्र कळवणाऱ्या बँकेतर्फे केली जाते व मग स्वतःच्या त प्रकारच्या तयार केलेल्या फॉर्ममध्यें तें हमीपत्र आयातदाराच्या अटी ून एक जादा प्रतीसह भारतांतील अधिकृत बँक ते परदेशांतील कडे रवाना करिते व आयातदारानें सांगितलेले असल्यास त्या बँकेला ःची खात्री घालून मग तें निर्यातदारास कळविण्यास सांगते. भारतांतील विदेशी निर्यातदारासाठीं हमीपत्र उघडतांना तें त्याच्याच नांवें ून तें ,फक्त विदेशी बँकेतर्फे त्याला देण्यासाठीं रवाना करतात. अन्यथा इतर देशांतून हमीपत्रें हीं परदेशांतील प्रतिनिधी च्या नांवानेंच निर्यातदाराचे खात्यासाठीं द्यावयाची पद्धत रूढ ; व या हमीपत्राचें आधारावर परदेशांतील बँका निर्यातदाराचे नांवें स्वतःचें हमीपत्र काढतात. जेव्हां बँकांचें नांवें हमीपत्र असतें तेव्हां देशांतून हुंडी हा नाविक दस्तऐवजापैकीं एक महत्त्वाचा असा दस्त-समजला जात नाहीं. पण इंग्लिश बँका व इतर ज्या बँका हुंडी

किंवा ड्राफ्ट हें एक बिल ऑफ एक्स्चेंज समजतात त्या मात्र हुंडी हा हमीपत्राखालीं नेहमीं लागणाऱ्या दस्त ऐवजांतला एक महत्त्वाचा कागद समजतात.

हमीपत्र काढतांना दस्तऐवजाबाबतचे स्टँप, बँकांचे आकार हे कुणी द्यावयाचे याचाही कांहीं बँका स्पष्ट उल्लेख करतात. कित्येकदां हा खर्च निर्यातदारही सोसतो. जर या बाबतचा स्पष्ट उल्लेख हमीपत्रांत नसेल तर कांही वेळां All charges for Buyer's A/C असा त्याचा खुलासा करणारे 'शोध' द्यावे लागून आयातदारावर जादा खर्च वाढतो. तेव्हां आयातदारानें शक्य असेल तर त्याचा हमीपत्रांत उल्लेख करण्यास बँकेस सांगावे. कित्येकदां हमीपत्र उघडणाऱ्या बँका, आयातदाराची सोय बघण्यासाठीं असे आकार धारकानें दिल्यास घ्यावेत, पण नाकारल्यास आयातदार द्यावयाला कबूल आहे असा खुलासा विदेशी बँकेला वेगळें पत्र लिहून करतात. हमीपत्रांतील उल्लेखिलेले कागद दिल्यावर परदेशांतील बँक आयातदाराच्या (भारतांतील) बँकेच्या खात्यावर पैसे नांवें टाकते व ते कागदपत्र (भारतांत) हमीपत्र उघडणाऱ्यानें कळविलेल्या देशांत पाठवते. नंतर ते कागदपत्र देखाड होऊन त्यानें पैसे भरल्यानंतर तत्त्वशः ती बँक आपल्या खात्याची शिल्लक पूर्ववत आणण्यासाठीं विदेशी चलन खरेदी करून ते पाठविते व ही रक्कम ज्या दिवशीं परदेशांतील बँकेच्या खात्यांत जमा होईल त्या दिवशीं आयातदारानें विदेशी चलनांत खरे पैसे दिले असें धरलें जातें. त्यामुळें परदेशांत ज्या दिवशीं निर्यातदाराला पैसे दिले जातात त्या दिवसापासून ते वरील रक्कम तिथें जमा होईपर्यंतच्या दिवसांचें व्याज आयातदाराला म्हणजेच हमीपत्र उघडणाराला द्यावें लागतें व त्याचा उल्लेख हमीपत्रान्वयें जी हुंडी काढली जाणार असते त्यावर करण्याची सूचनाही निर्यातदाराला हमीपत्रांत दिली जाते. हें व्याज कां द्यावयाचें याचा खुलासा कांहीं वेळां आयातदार मागतात; पण त्याचें उपरिनिर्दिष्ट कारण लक्षांत आलें कीं वेगळा खुलासा मागण्याची जरूरी राहणार नाहीं.

हमीपत्रात वक आयातदाराच्या इच्छेनुसार लागणाऱ्या कागदपत्राचा उल्लेख करतें हें करारपत्राच्या मागील प्रकरणातील नमुन्यावरून लक्षात आलें असेल. त्यातील मूळ नाविक पत्राबाबत मात्र खुद्द बँकेच्याही काहीं अटी असू शकतात. हमीपत्र हा अप्रत्यक्ष कर्जाचाच व्यवहार असल्यानें तत्संबधीचे कागदपत्र निर्दोष असले पाहिजेत याबद्दल बँकेचा कटाक्ष असतो. बँकेला निर्यातपत्र हें निर्दोष म्हणजेच मालाबाबत कुठलाही दोष दाखविणाऱ्या अटी नसलेलें, निर्यातदाराचे नावाचें असल्यास त्यानें त्यावर कोरी सही केलेले ( Blank Endorsed ) किंवा बँकेचे नावाचे, बोटीवर माल चढला आहे हे दर्शविणारे ऊर्फ नौकास्थित, सनदी नसलेले असेंच असावें लागतें. यातील कुठलीही अट बदलावयाची असल्यास बँक आयातदाराची पत व प्रतिष्ठा किती आहे याचा विचार करूनच ती बदलते.

हमीपत्रात विमापत्राची मागणी करताना त्यात मालास ज्या ज्या प्रकारचा धोका पोचण्याचा संभव असेल त्या त्या धोक्याचे संरक्षण दिलेलें विमापत्र मागितलें गेलें आहे याची बँक खात्री करून घेते. हमीपत्र वा. भा. (C and F) किंवा आनौक ( F O B ) प्रकारचें उघडावयाचें असल्यास लागणारें विमापत्र आयातदारानें काढलेले आहे कीं नाहीं हें बघून तें ही शक्य तर आपल्या जवळ ठेवून घेते. कारण भरपाई वसूल करण्याची वेळ आल्यावर, बँक त्यायोगे ती लगेच वसूल करू शकेल.

त्या नंतर बीजक, पॅकिंग लिस्ट, वजनाचा तक्ता ( Weight Note ), अन्य माहितीचा तक्ता, उत्पादनस्थान-पत्र, प्रतिनिधीचे तपासणी शेरापत्रक, वगैरे कागदपत्राचा हमीपत्रात उल्लेख केला जातो नंतर हमीपत्र उघडणाऱ्या बँकेचे परदेशातील बँकेशीं जसे संबंध असतात त्या प्रमाणें त्या हमीपत्राबरहुकुमचे कागद वटविण्याचा अधिकार त्याच बँकेला कधीं कधीं दिला जातो ( Restricted to Advising Bank for Negotiation ) अशी मर्यादा जर घातली गेली नसेल तर विदेशातील कुठल्याही बँकेला त्या हमीपत्राचे कागदपत्र वटवता येतात. हमीपत्र ज्या बँकेचे नावानें उघडलें गेलें जातें

तिच्या एकाद्या अंतर्भागांतील शाखेच्या ठिकाणीं जर तें हमीपत्र पाठवलें गेलें असेल तर तिथें कागदपत्र वटवावयाचें असल्यास त्या निर्यातदाराला वटवण्याची जी तारीख हमीपत्रांत असेल त्याच्या आधीं सुमारें दोन दिवस त्याची वटवण्याची शेवटची तारीख आहे असें समजावें लागतें. कारण हमीपत्रांतली तारीख ही, जिथें हमीपत्र उघडलें गेलें असेल तिथें किंवा ज्या विदेशी बँकेनें तें आपल्या शाखेंत पाठवलें असेल तिच्या मुख्य शाखेच्या ठिकाणीं कागदपत्र त्या तारखेपूर्वी आलें पाहिजेत अशी अट घालणारे असते. Valid in London Upto 31st. May 1962 असें जर हमीपत्रांत म्हटलेलें असेल व निर्यातदाराला जर मँचेस्टर शाखेला कागदपत्र वटवून हवे असतील तर त्याला ते जास्तींत जास्त २९ तारखेलाच त्या शाखेंत देऊन वटवून घ्यावे लागतील. खात्रीचें हमीपत्र देतांना अशा वेळीं खात्री देणारी बँक, आपल्या हमीपत्रांत आपल्या अन्य शाखेच्या ठिकाणीं वटवण्याची मुदत, दोन दिवसांनीं अशी कमीच घालत असतें. तसेच 'बँक टू बँक क्रेडिट' उघडतांनाही बँका अशीच काळजी घेतात.

**फिरतें हमीपत्र** (Revolving Credit):

अशा फिरत्या हमीपत्र हें ज्याप्रमाणें एका व्यवहाराबद्दल उघडतां येतें त्याचप्रमाणें अनेक व्यवहारांच्या सांखळीसाठींही उघडतां येतें. ज्यावेळेला आयातदाराची आयात एकाच कंपनीकडून व ठरलेल्या अटीवर दीर्घ मुदतीसाठीं असते त्यावेळीं प्रत्येक खेपेला त्याच त्याच अटींचें हमीपत्रासाठीं अनेकदा फॉर्म भरावे लागूं नयेत ह्मणून व इतर सर्व सव्यापसव्य टळावेत ह्मणून आयातदार सर्व व्यवहारसांखळीसाठीं एकच हमीपत्र उघडतो. पण असे संपूर्ण रकमेचें हमीपत्र सुरवातीसच उघडल्यास त्याचा विसार व बँकेचा आकार यापोटीं आयातदाराची खूप मोठी रक्कम अडकते व खर्ची पडते. हें टाळण्यासाठीं फिरतें हमीपत्र उघडून (Revolving Credit) व्यापारी आपली सोय करून घेऊं शकतो. ज्यावेळेला ठराविक मुदतीनें ठराविक आयात व्हावयाची असते त्यावेळेला अशा प्रकारचें हमीपत्र उघडणें सोपें जातें. समजा एकाद्या कंपनीला दुसऱ्या कंपनीकडून दरमहा ५० गांठी-

पर्यंत कापडाचा पुरवठा व्हायचा असला व असा वर्षांत ६०० गाठीपर्यंतचा व्यवहार होणार असला आणि ६०० गाठींची किंमत ६००,००० रुपये असली तर एवढें सहा लाखाचें एक हमीपत्र उघडून विसारादाखल ५% म्हटलें तरी ३०,००० रुपयाची रक्कम बिनव्याजीं गुतवण्यापेक्षा व बँकेचें कमिशन म्हणून एकदम ३७५० रु. देण्यापेक्षा ती कंपनी ५०००० रुपयाचें किंवा फार तर १ लाख रुपयाचें व १०० गाठीपुरतें फिरतें हमीपत्र उघडण्याची बँकेला विनंती करील.

हमीपत्राचा अर्थ बँकेनें एकावेळीं जास्तींत जास्त तितक्या रकमेची हमी दिली आहे असा होतो. नाहींतरी त्या कंपनीचा सहा लाखाचा माल एकदम येणारच नसल्यानें अशी अशत हमी जरी फिरत्या हमीपत्रान्वयें निर्यातदाराला मिळाली तरी चालते. फिरत्या हमीपत्राचा अर्थ त्या रकमेपर्यंतची फिरती अशी जास्तींत जास्त हमी हा होय. समजा उपरिनिर्दिष्ट एक लाख रु. च्या अशा फिरत्या हमीपत्रान्वयें निर्यातदारानें प्रत्येकी वीस हजाराच्या दोन हुंड्या व रुपये तीस हजाराच्या प्रत्येकीं दोन हुंड्या अशा चार हुंड्या काढल्या तरी हमीपत्रानुसार त्याला त्या सर्व हुंड्या वटवून एकूण एक लाख रुपयाची रक्कम मिळेल पण त्याच बरोबर यातली एक किंवा अधिक हुंड्या आयातदारानें सोडवून घेतल्या कीं परत तितक्याच रकमेपर्यंत म्हणजे वीस हजार, किंवा तीस हजारपर्यंत एक वा अनेक हुंड्या निर्यातदाराला परत काढता येतील व अशी हमी दरवेळीं जितक्या हुंड्या वटवल्या जातील तिथपर्यंत कमी जास्त होत राहील, पण ती जास्तींत जास्त एक लाख रुपयापर्यंत फिरती राहील किंवा नवीन होत राहील. अर्थात् हमीपत्रातील दस्तऐवजाच्या अटी निर्यातदाराला दर हुंडीचे वेळीं पाळाव्या लागतीलच असें फिरतें हमीपत्र उघडणारी बँकही सुरवातीस एक लाख रुपयापुरतीच विसार व कमिशनची रक्कम घेते व पुढें दरवेळेला आलेल्या हुंड्या सोडवताना विसार परत करत नाहीं व वेगळें कमिशन आकारून तें हमीपत्र पूर्ववत् मूल्यपदावर आणून ठेवते, म्हणजेच त्याचें नूतनीकरण करतें. अर्थात् अशा हमीपत्रासाठींही आयात परवान्याच्या अन्य निर्बंधाचें पालन

आयातदाराला करावें लागतेंच. फक्त आयातदाराचा दरवेळीं वेगळे फॉर्म भरण्याचा त्रास वाचतो व खूप मोठी रक्कमही गुंतून पडत नाहीं. बँकेच्या दृष्टीनेंही तिचा धोका अशा बाबतच्या हमीपत्रांत बराच कमी होतो.

## विभाज्य व वर्गदायी हमीपत्रें :

हमीपत्रांचे बाबत, विभाज्य व वर्गदायी ( बदली होणारीं ) हमीपत्रें उघडण्याचीही पद्धत असते. परदेशांतील विक्रेता जेव्हां स्वतः माल उत्पादन करणारा किंवा विकणारा नसतो तर केवळ दुसरीकडून माल घेऊन आयातदाराला विकणारा एक दलाल ( Middleman ) असतो त्यावेळेला अशा प्रकारचें हमीपत्र उघडण्यासाठीं तो आयातदाराला विनंती करीत असतो.

असें हमीपत्र उघडतांना तें उघडणारी बँक ज्या बँकेमार्फत तें कळवीत असते तिला त्या हमीपत्राच्या धारकाच्या विनंतीप्रमाणें तें हमीपत्र दुसऱ्याच्या नांवानें करून द्यावयाला परवानगी देतें. अशी मुक्त परवानगी असलेल्या हमीपत्राला बदली करतां येणारे, वर्गदायी हमीपत्र म्हणतात. असें हमीपत्र विभागून अनेक धारकांच्या नांवानें जेव्हां वर्ग केलें जातें तेव्हां तें वर्गदायी व विभाज्य हमीपत्र म्हणतां येईल.

समजा भारतांतील एकाद्या व्यापाऱ्याला आफ्रिकेहून कच्चें लोखण्ड घेऊन तें जपानमधल्या एका खरेदीदाराला विकावयाचे आहे. अशा परिस्थितींत तो मध्यस्थ व्यापारी जपानमधल्या आयातदाराला त्याचे बँकेचे द्वारा भारतांतील अधिकृत बँकेतर्फे त्याच्या नांवानें हमीपत्र उघडावयाला सांगेल. मात्र त्या हमीपत्राचा त्याला आफ्रिकेंतून माल मागविण्यासाठीं उपयोग होणार नाहीं. ( बॅक-टू-बॅक क्रेडिटचा विचार इथें केलेला नाहीं. तो पुढें स्वतंत्रपणें येईल. ) कारण तो भारतीय व्यापारी आपण काय व्यवहार करीत आहोंत हें

परत घेऊन त्याऐवजी त्या आफ्रिकेतील व्यापाऱ्याचें नांवें तें हमीपत्र नांव बदलून देता येईल. असें हमीपत्र कळवलें जात असता बहुधा तें 'खात्रीचें' असावें लागतें. मात्र अशा हमीपत्राचे वेळीं ते वर्ग करणाऱ्या बँकेला मूळ हमीपत्रातील रक्कम आणि मालनिर्यातीची तारीख व दस्तऐवज वटविण्याचा दिनांक या तीन बाबींखेरीज दुसरा बदल करावयाला मूळ धारकाला परवानगी देता येत नाहीं याखेरीज जी चौथी बाब बदलू शकते ती म्हणजे हमीपत्र कुठें चालू ( Live and Valid ) रहावयाचें तें ठिकाण होय. म्हणजे मूळ हमीपत्र एक लाख रुपयाचे असेल व साहजिकच भारतीय व्यापारी तो माल आफ्रिकेतील व्यापाऱ्याकडून त्याहून कमी भावानेच म्हणजे समजा ९५,००० रुपयालाच विकत घेणार असेल तर तो असे हमीपत्र वर्ग करण्यास सांगताना आफ्रिकेतील व्यापाऱ्याच्या नांवें तें फक्त ९५,००० रुपयाचेंच वर्ग करावयाला सांगेल, व आफ्रिकेतील व्यापाऱ्याकडून निर्यातपत्र वगैरे दस्तऐवज आल्यावर त्यानें पाठवलेल्या ९५,००० च्या बीजकाचे बदली तो एकलाख रु. च्या बीजकाच्या प्रती हमीपत्र कळवणाऱ्या आपले भारतीय बँकेला देऊन तेच दस्तऐवज जपानमधल्या बँकेकडे, तिथल्या आयातदारासाठीं पाठवून देण्यास सांगेल हमीपत्र जर संपूर्ण किंमतीचे वर्ग करावयाला सांगितले गेले तर त्याचा अर्थ, आफ्रिकेतील व्यापारी त्याच्या खातीं कमिशनची रक्कम वेळोवेळीं जमा करील किंवा त्याला त्याच रकमेचा स्वतंत्र चेक किंवा ड्राफ्ट पाठवील अशी त्याची व्यवस्था आहे, असा होऊ शकेल. मात्र हमीपत्र तसेंच्या तसेंच वर्ग केल्यास, भारतीय व्यापाऱ्याचा जपानमधील आयातदाराशीं होणारा व्यवहार आफ्रिकन व्यापाऱ्याला कळून पुढील वेळीं तो परस्पर जपानमधील व्यापाऱ्याशींच संधान बांधण्याचा प्रयत्न करणें संभवनीय होते, म्हणून तें शक्यतो तसेंच वर्ग केले जात नाहीं

हमीपत्र वर्ग करताना निर्यातीची व वटवण्याची तारीख देखील थोडी अलिकडे ओढण्याची सावधगिरी मध्यस्थ व्यापाऱ्याकडून घेतली जाते. वरील उदाहरणातच समजा जपानमधील व्यापाऱ्याला माल ३० जून पर्यंत पाठवला जायला हवा असेल तर तो निर्यातीची शेवटची तारीख ३० जून

व वटावाचा दिनांक कदाचित् ५ (ते १५) जुलै पर्यंत घालील. हें कागदपत्र भारतांत येऊन त्या बीजकांचे वदली आपलें बीजक घालण्यासाठीं व वाढत्या विम्याची, (९५००० ऐवजीं १·लाख रु. चे वर दहा टक्याची) सोय करण्यासाठीं अवधि मिळावा म्हणून आफ्रिकन व्यापाऱ्याचे नांवें हमीपत्र वर्ग करतांना थोडी सावधगिरी बाळगण्याचे दृष्टीनें भारतीय व्यापारी निर्यातीची तारीख १५ जून पर्यंत व वटावाची तारीख २० जून (ते जून ३० पर्यंत ही) असावी असा वदल, वर्ग होणाऱ्या हमीपत्रांत करावयाला सांगेल.

अशी वर्गदायी हमीपत्रें कळवल्यानंतर, कळवणाऱ्या बँकेनें ती पुढें कुणाच्या नांवें वर्ग केली आहेत हे उघडणाऱ्या बँकेला कळण्यास मार्ग नसतो, हा त्यांतला दोष आहे. हमीपत्र उघडतांना तें कुठल्या धारकाचे नांवानें उघडलें जातें यालाही महत्त्व असतें हे विशद केलेलें आहेच. त्यामुळें मूळ धारकाचें नांव माहिती असलें व त्याच्या बद्दलची खात्री असली तरी पुढील धारकांबद्दलची खात्री हमीपत्र उघडणाऱ्या बँकेला मिळूं शकत नाहीं, त्यामुळें मूळ आयातदार ह्याच बँकेच्या पुऱ्या माहितीचा व अत्यंत सचोटीचा असेल तरच हमीपत्र वर्गदायी असावें अशी विनंती स्वीकारावयास, बँक तयार असते.

असें वर्गदायी हमीपत्र वर्ग होतांना त्याच चलनांत वर्ग व्हावें लागतें म्हणजेच तें पौंड, डॉलर्स अशा आंतरराष्ट्रीय मान्य चलनांत असलें तरच तें नव्या धारकाला (पहिल्या हमीपत्रांत लिहिलेल्या) त्याच चलनांत चालूं शकेल. असें हमीपत्रधारकाच्या इच्छेनुसार वर्ग करून देण्यापूर्वी बँक त्यांचे-कडून खालील प्रकारचें पत्र लिहून घेतें

## वर्गदायी हमीपत्राचा करार

"आमच्या नांवें आपण आपल्या····च्या दिनांकाच्या पत्राप्रमाणें ········इतक्या किंमतीचें हमीपत्र उघडलें आहे. हें हमीपत्र मेसर्स········यांचे नांवें धारक म्हणून·····किंमतीपर्यंत वर्ग व्हावें अशी आमची इच्छा

हमीपत्र कळविणाऱ्या बँकेचें व हमीपत्रधारकाचें लक्ष लगेच वेधण्यासाठींच हा तांबड्या शाईचा प्रघात पाडला गेला होता. अशा रक्तवर्ण संकेतान्वयें हमीपत्र कळविण्याऱ्या व /वा त्यावरील दस्तऐवज वटवणाऱ्या बँकेला माल खरेदी केल्याबद्दलचे बीजक व तो गुदामात टाकल्याची पावती सादर केल्यावर दर वेळेला ठराविक रकमेपर्यंत धारकाला त्याचे पैसे कर्जाऊ देण्याची परवानगी असते. या कर्जावरील व्याज अर्थात धारकच भरतो व नंतर गुदाम पावती ऐवजीं विश्वासपत्र (Trust Receipt) देऊन मालावर कांहीं प्रक्रिया करावयाच्या असल्यास त्या करून तो निर्यात झाल्यावर त्याचे निर्यातपत्र व अन्य दस्तऐवज बँकेला वटविण्यासाठीं नेहमींप्रमाणें सादर करीत असतो. अशा व्यवहारांत बीजक पाहिल्यावर बँक जेव्हां पैसे देते तेव्हा ती त्याचेकडून फक्त एक पावतीच घेत असते. मात्र काहीं वेळां वटावाच्या बँकेवर धारक हुंडीही काढतो. योग्य ते दस्तऐवज दाखल झाल्यावर ते वटवतांना अशी आधीं दिलेली रक्कम व त्यावरील व्याज काढूनच बँक उरलेली रक्कम धारकाला देते. उच्च प्रतीचा विश्वास संपादन केलेल्या पण अशा मोठ्या व्यापारांत लागणारें प्रचंड भाडवल नसणाऱ्या धारकांनाच किंवा उत्पादक कारखानदार यांच्या साठीं प्रतिनिधींचे काम करणाऱ्यांनाच ही सवलत दिली जाते, व ती देतांना निर्यातदाराचा धारकावर संपूर्ण विश्वास असावा लागतो. अशी सवलत देतांना, हमीपत्र उघडणारी बँक निर्यातदाराकडून एक वेगळें करारपत्र लिहून घेऊन, धारकाला दिलेले पैसे किंवा त्याबाबतचे योग्य नाविक दस्तएवज योग्य वेळेंत न आल्यास निर्यातदाराला जबाबदार धरत असते.

**पॅकिंग क्रेडिट ( Packing Credit ) :**

किलेकदा अशी सवलत मागण्यासाठीं आयावदाराला त्याबद्दलची अट निर्यात पत्रांत घालण्यास सांगून आपली झांकली मूठ उघडून दाखवण्याऐवजीं हमीपत्राचा धारक स्वतःच्या पत प्रतिष्ठेसाठीं आपल्या बँकेलाच त्याचे नांवें उघडल्या गेलेल्या हमीपत्राचे तारणाचे आधारावर कर्ज मागत असतो व खरेदी करावयाचा केलेला माल, निर्यात होईपर्यंत

अशा कर्जासाठीं नजरगहाण लावून देतो व नंतर बँकेच्या देखरेखीखालीं त्यावर प्रक्रिया वगैरे करून बँकेच्या निर्यात प्रतिनिधी (Clearing Agents) तर्फे तो निर्यात करतो. अशा रीतीनें माल भरण्यासाठीं व तो पाठविण्याच्या क्रियेपर्यंत द्याव्या लागणाऱ्या कर्जास पॅकिंग क्रेडिट (Packing Credit) अशी संज्ञा आहे. मात्र या प्रकारचें कर्ज देतांना, फक्त ते देणारी निर्यातदाराची बँकच त्याच्या वसुलीस जबाबदार असते. रक्तसंकेताप्रमाणें हमीपत्र उघडणारी बँक किंवा आयातदार यांचा त्यांत कुठेंही संबंध येत नाहीं व त्यांचेवर पॅकिंग क्रेडिटमध्यें निर्यातदाराला दिल्या जाणाऱ्या कर्जाऊ रकमेची जबाबदारीही पडत नाहीं. निर्यातदाराच्या सचोटीबद्दल बॅकेला शंभर टक्के खात्री असेल तरच ती--अशी सवलत देत असते. मात्र त्यासाठीं निर्यातदाराला योग्य तें नजरगहाणपत्र लिहून द्यावेंच लागतें, व जिथें बँकेच्या दैनंदिन देखरेखीखालीं हा व्यवहार होऊं शकेल तिथेंच म्हणजे शक्य तो निर्यातीची शक्यता असलेल्या मोठ्या बंदरांच्या ठिकाणींच बँका असा व्यवहार करतात.

## सपृष्ठ हमीपत्र (Back-to-Back Credit):

ज्यावेळेला एका देशांतला व्यापारी दुसऱ्या देशांतून माल घेतो व तो तिसऱ्या देशांत विकतो म्हणजेच तो स्वतः कारखानदार किंवा उत्पादक नसतो तेव्हां ज्या देशांतून माल विकत घ्यावयाचा तेथील निर्यातदाराच्या नांवानें त्याला हमीपत्र उघडावें लागतें. हमीपत्र उघडणे हा एक संभाव्य कर्जाचाच प्रकार असल्यानें बँका फक्त सचोटीच्याच खातेदारासाठीं हमीपत्र उघडतात, किंवा त्यासाठीं योग्य तें तारण मागतात. ज्या वेळेला असा व्यापार करणाऱ्याजवळ स्वतः चें असें मोठें भांडवल नसतें त्यावेळेला त्यानें तो माल ज्या देशांत विकावयाचा विक्रीकरार केलेला असतो तिथल्या खरेदीदाराला आपलें स्वतःचें नांवानें हमीपत्र उघडावयास सांगतो व या हमीपत्राचें तारण त्याच्यासाठीं उघडावयाच्या दुसऱ्या देशांतील हमीपत्रासाठीं देऊं करतो. असें हमीपत्राचें तारण घेऊन बँका तो व्यवहार करूं शकतात कारण दुसऱ्या हमीपत्रान्वयें त्यांच्यावर पडणाऱ्या जबाबदारीस पहिल्या हमीपत्रान्वयें आपोआपच छेद जात असतो. योग्य तें

कागदपत्र मिळाल्यावर दुसऱ्या हमीपत्रांमुळें त्यांना जे पैसे द्यावे लागतात ते पहिल्या हमीपत्रान्वयें तेच कागद (खातेदारांकडून वाढत्या किंमतीची हुंडी व दुसरें बीजक घेऊन) दुसऱ्या बँकेकडे पाठवले कीं त्यांना मिळावयाचे असतात. पूर्वीच्या आफ्रिका भारत-जपान यांच्या लोखंडाबाबतच्या व्यापाराचें उदाहरण या संदर्भात लक्षांत घेतल्यास सर्व खुलासा होऊं शकेल. असा व्यवहार करूं इच्छिणाऱ्या व्यापाऱ्याजवळ पैसे कमी असल्यानें बँकेकडून दुसऱ्या हमीपत्रान्वयें आलेले कागद घेऊन पहिल्या म्हणजे त्याच्या नांवानें उघडलेल्या हमीपत्राखालीं तो तें दुसऱ्याच बँकेतर्फे वटवून घेण्याची लबाडी करण्याची शक्यता असतें. म्हणून बँका असें सपृष्ठ हमीपत्र योग्य, होतकरूं खातेदारासाठींच उघडतात व दुसऱ्या हमीपत्राखालीं आलेले नाविक दस्तऐवज हातांतून सोडत नाहींत. अशा व्यवहारात नाहीं म्हटलें तरी धोका असतो. त्यामुळें शक्य असल्यास बँका याच तऱ्हेची सवलत देणारे असें, स्वत:च्या नांवाचें वर्गदायी हमीपत्र उघडून घेण्यासच आपल्या खातेदारांना सांगतात व नंतर ते हमीपत्र विभागून व/वा वर्ग करून दुसऱ्या धारकाला देतात.

' ' सपृष्ठ हमीपत्रें उघडतांना बँकेला त्या व्यापाऱ्याबद्दल संपूर्ण विश्वास असावा लागतो. तो आपलें बीजक व जरूर असल्यास नवीन विमापत्र लगेच देईल याची खात्री असावी लागते. तसेंच त्याच्या नावानें जें हमीपत्र उघडले जातें त्याच अटींचें व अन्य कुठलाही विशेष फरक नसणाऱ्या अटींचेंच हमीपत्र तो दुसऱ्या देशांतील धारकांचे नांवानें उघडायला सांगत आहे याबद्दल काळजी घ्यावी लागते. त्याच्या नांवानें असलेल्या हमीपत्रापेक्षां जास्त रकमेचें हमीपत्र तितक्याच मालासाठीं उघडून चालत नाहीं. तसेंच त्याच्या नांवानें ज्या बँकेनें हमीपत्र उघडलें आहे तीच खरी, पुढील सपृष्ठ हमीपत्रासाठीं जबाबदार आहे हें समजून त्या बँकेची प्रतिष्ठा, स्थैर्य यांचाही विचार करावा लागतो; वर्गदायी हमीपत्राप्रमाणें दुसऱ्या हमीपत्रांतील माल पुरवण्याची मुदतही कमी असावी लागते म्हणजे पहिल्या हमीपत्रांतील आयातदाराला नवीन बीजक व विमापत्रासह कागदपत्र पाठवण्यासाठीं पुरेसा कालावधी मिळतो.

अशीं हमीपत्रें उघडण्यास बँक फारशी उत्सुक नसते हें त्यांच्या स्वरूपावरून सहजच लक्षांत येईल. तसेंच कॉन्सुलर इन्व्हॉईस, व्हिसाड किंवा लीगलाइझ्ड इनव्हॉईस असे कागदपत्र पहिल्या हमीपत्रांत मागितले असल्यास ती अट दुसऱ्या हमीपत्रांत घालतांना अडचण येते म्हणून अशावेळींही सपृष्ठ हमीपत्रें उघडली जाऊं शकत नाहीत.

## हमीपत्राखालीं आलेले दस्तऐवज :

हमीपत्राखालीं दस्तऐवज आल्यावर ते तपासून बँक ते आयातदाराला आले असल्याचे कळवते व ते दस्तऐवज अशी सूचना देऊन किंवा प्रत्यक्ष दाखवून, देखाड केले जातात. अशी सूचना देणाऱ्या पत्रांत तो माल कुठल्या बोटीनें येणार आहे, त्याची रुपयांत किती किंमत देणे आहे व त्याचें आज पर्यंतचें व्याज, व विदेशी प्रतिनिधी बँकेचे किती आकार आहेत याचीही माहिती बँकेकडून दिली जाते. हे पत्र आल्यावर किंवा हुंडी देखाड झाल्यावर त्यात योग्य ते कागदपत्र दिलेले नसल्यास, दस्तऐवज खालील कारणामुळें अपुरे किंवा सदोष असल्यामुळें त्यांचा स्वीकार होऊं शकत नाहीं असें आयातदारानें बँकेला कळवावे लागतें. अन्यथा आयातदाराला त्याने सांगितले असलेले कागदपत्र दिल्यावर त्यानें त्यापोटीं लगेच पैसे भरावयाचे असतात असा हमीपत्राचा अर्थ असतो. तसेंच ज्यायोगें धंद्यांतील नफ्यास वा उत्पादनास खो बसेल असे महत्वाचे दोष जर दस्तऐवजांत नसतील तर क्षुल्लक वा तांत्रिक दोषांसाठीं किंवा अपुरेपणासाठीं आयातदार दस्तऐवज फेटाळून न लावतां त्याचा स्वीकार करतो. बीजकाची एकादी प्रत कमी आहे, नाविकपत्र शिळे झाले आहे असा वटवणाऱ्या बँकेचा शेरा आहे (पण माल बंदरांत उतरलेला नाहीं), विमापत्रांत पॉलिसी ऐवजीं सर्टिफिकेट दिलें गेलें आहे, निर्यातपत्रावर सूचनाशर्त (Notify Clause) नाहीं, दस्तऐवज वटवण्यासाठीं दोनचार दिवस उशीरा दिले आहेत, अशा प्रकारच्या दोषांबद्दल आयातदार दुर्लक्ष करूं शकतो. अर्थात् हें सर्वस्वीं त्याच्या मर्जीवर असलें तरी देखील-

सर्वसामान्य व्यापारी प्रतिष्ठेच्या व भरंवशाच्या तत्वावरच हे व्यवहार चालतात वं दस्तऐवज नाकारले जात नाहींत. म्हणूनच बँकाही मर्यादा (Reserve) घालून कां होईना, ते वटवतात. दस्तऐवजांतील असे दोष व पैसे भरण्याची नाखुषी आयातदारानें बँकेला जर लगेच कळवली नाहीं तर त्याला नंतर कुठलीही सबब सांगतां येत नाहीं. कागदपत्र जर अपुरे, सदोष असले तर वटवणारी बँक बहुधा ते वटवतांना त्यांची जाणीव, निर्यातदाराला व नंतर हमीपत्र उघडणाऱ्या बँकेला ते पाठवतांना देते. ते कागदपत्र आयातदार स्वीकारीपर्यंत त्याची जबाबदारी निर्यातदारावरच असते. पण असे दस्तऐवज आयातदाराकडून स्वीकारले गेले कीं हमीपत्र उघडणारी बँक प्रदानावर तुम्ही घातलेल्या मर्यादा काढून टाका (Lift up the Reserve ) असें विदेशी बँकेला कळवून टाकतें.

हमीपत्राखालीं कागदपत्र आल्यानंतर ते लगेच सोडवावयाचे असतात. वसुलीच्या बिलाप्रमाणें जहाज बंदरांत येईपर्यंत त्याला दिरंगाई लावून किंवा टाळाटाळ करून चालत नाहीं. तरी देखील कांहीं आयातदार अशा हुंड्यांचे पैसे लगेच भरत नाहींत. हमीपत्रातील दर्शनी हुंडयांचे पैसे जर लगेच भरले नाहींत तर सात दिवसानंतर सध्यां शेंकडा $\frac{1}{8}$ टक्का इतकें जास्त कमिशन, अधिक पैसे देण्याच्या दिवसापर्यंत सुमारे सात ते पंधरा जास्त दिवसाचें व्याज( रक्कम विदेशीं पोचण्यासाठीं लागणाऱ्या दिवसापर्यंत ) आयातदाराला भरावें लागतें. भारतांतील विनिमयनियंत्रणाच्या नियमानुसार, हमीपत्राचे सर्व व्यवहार, आयातपरवाना घेऊनच करावे लागतात. असे दस्तऐवज आल्यावर, हुंडी सोडवण्याचे वेळीं बॅंकेकडून आयातदाराला विदेशी चलन खरेदीच्या अर्जाचाही एक फॉर्म दिला जातो (ए किंवा एस्. ए. वन् वगैरे) तो भरून दिल्यानंतर मग बँक आयातदाराला योग्य तें चलन विकल्याच्या नोंदी करून, रुपयांतील रक्कम खातेदाराचे नांवें टाकते किंवा त्याचेकडून रोख घेते. या विकलेल्या चलनाची नोंद आयात परवान्याच्या विनिमयनियंत्रण प्रतीवरही बँकेला करावी लागते. हमीपत्र उघडण्याचे वेळीं त्या प्रतीवर सुरवातीलाच रक्कम राखीव ठेवण्याची नोंद केलेली

असतेच. या दुसऱ्या नोंदीनें त्यातील रक्कम बरोबर किती खर्च झाली तें कळतें. विनिमयनियंत्रणप्रत चलन विक्रीचे दिवशीं बँकेजवळ उपलब्ध नसल्यास योग्य रकमेची नोंद विनिमयनियंत्रणप्रतीवर केली जाईल अशी हमी ए वा तत्सम फॉर्मवर बँकेला रिझर्व्ह बँकेला द्यावी लागते

बिल सोडवण्याचे वेळीं सूचना देताना बँका वापरतात त्या फॉर्मचा नमुना परिशिष्टात दिला आहे. ह्याच फॉर्म वसुलीचे वेळींही वापरला जातो. बिल सोडवल्यानतर परवान्याच्या जकात प्रतीसह ( Customs Copy ) ते कागदपत्र, माल सोडवण्यासाठीं ते काम करणाऱ्या क्लिअरिंग एजंट्सना आयात-दारानें द्यावे लागतात किंवा स्वत तो सोडवून घ्यावा लागतो काहीं वेळ्य असा माल सोडवण्यासाठीं कागदपत्र त्या एजंटाकडे पाठविण्याची जेव्हा आयातदाराकडून बँकेलाच विनंती केली जाते तेव्हा बिलाचा हिशोब झाल्यावर बँक ते दस्तऐवज क्लिअरिंग एजटाचे नावें करून जकातप्रतीबद्दलच्या व माल सोडवल्यानतर तो कसा पाठवावयाचा त्याच्या सूचना क्लिअरिंग एजटकडे पाठवते काहीं वेळ्य अगदीं ल्हानशा रकमेनेच बिलाची रक्कम आयातपरवान्यापेक्षा जास्त होते. अशा वेळीं आयातपरवान्याच्या ५% किंवा ५० रुपये पर्यंतची जास्त अशी रक्कम यांतील जी रक्कम कमी असेल तियपर्यंत अधिकृत बँकाना विनिमयनियंत्रणाची पूर्व परवानगी न घेता मौलिक कागदपत्राच्या पोटीं तेवढ्या रकमेचे जास्त विदेशी चलन विकता येतें. पूर्वी ही रक्कम कितीही लहान असती तरी विनिमयनियंत्रणाची पूर्व समती घ्यावी लागत असे ही रक्कम यापेक्षा जास्त असेल तर कागद मर्यादेखालीच येत असतात व मग अनामत रक्कम ठेऊन घेऊन कस्टमखातें परवानगी देत असेल तर, आयातदाराला माल सोडवण्याची बँक परवानगी देतें व असा माल सोडवला गेल्यानतर त्याचे बीजक व बिल ऑफ एंट्रीचा पुरावा, ए किंवा तत्सम फॉर्मसह विनिमय नियंत्रणखात्याकडे पाठवल्यावर जर तें प्रकरण विश्वासार्ह असेल तर नियंत्रणाकडून त्या चलनविक्रीची समती मिळू शकते.

हमीपत्रावरील कागदपत्र निर्यातदारानें दिल्यानंतर परदेशांतील बँक ते बरोबर असल्यास वटवून त्याचे पैसे निर्यातदाराला देते व कागदपत्र आयातदाराच्या हमीपत्र उघडणाऱ्या बँकेकडे पाठवते हें वर सांगितले आहेच, पण कागदपत्रांत कांहीं वेळां तांत्रिक दोष असतील तर ती बँक ते वटवण्याचे नाकारूं शकते. पण असे करण्याऐवजीं ती शक्यतों निर्यातदाराला मदत करण्याचे दृष्टीनें खालील पैकीं एक मार्ग स्वीकारते. निर्यातदाराची इच्छा असेल तर ती हमीपत्र उघडणाऱ्या बँकेकडे तार करून कागदपत्र वटवायचे कां याची सरळ परवानगी मागते, किंवा दुसरा मार्ग म्हणजे वर अन्यत्र उल्लेखिलेल्या प्रकारचे असे कांहीं क्षुल्लक दोष असतील तर हमीपत्र उघडणारी बँक (वा पर्यायानें आयातदार) कागदपत्र स्वीकारील अशा भरंवशानें ते दस्तऐवज समर्याद, सशर्त वटवते. म्हणजेच निर्यातदाराकडून ती अशा वटवण्याचे व्यवहाराबद्दल अभय मागते. असे दस्तऐवज सशर्त वटवलेले असल्यास ती बँक तसा उल्लेख कागदपत्राबरोबर पाठविल्या जाणाऱ्या पत्रांत करते व आयातदारानें कागदपत्र सोडवून घेतल्यावर त्या मर्यादेची सोडवणूक करून मागते (lifting the reserve). पण निर्यातदाराला तारेचा खर्च करावासा वाटत नसेल आणि अभयपत्र घेऊनही दस्तऐवज वटविणे इष्ट नाहीं असें बँकेला वाटत असेल तर हमीपत्र उघडलेलें असलें तरीही कागदपत्र त्यानुसार नसल्यास, वसुलीसाठीं पाठविलेलें बिल (Bill for Collection). म्हणूनच ते कागदपत्र परदेशांतील बँकेकडून पाठविले जातात.

हमीपत्रांत, बँका वस्तूंचा व्यवहार करत नसून दस्तऐवजांचा व्यवहार करतात, त्यामुळें हे सर्व दस्तऐवज अगदीं काटेकोरपणानें येतात कीं नाहीं हें बघणे त्यांचें कर्तव्य असतें. मालाची प्रत, प्रकार, वर्गवारी चांगलेपणा याच्याशीं बँकेचा संबंध नसतो, तरी पण कागदपत्र योग्य नसल्यास आयातदारानें जबाबदारी टाळली तरी हमीपत्र न उलटणारे असल्यास ते उघडणाऱ्या व कागदपत्र वटवणाऱ्या बँकेला ती टाळतां येत

नाहीं व पर्यायानें खोट खावी लागते, म्हणून अशा हमीपत्राचे व्यवहार करताना बॅंकेच्या अधिकाऱ्याला अस्सत काटेकोरपणेंच वागावें लागते

असे दस्तऐवज आल्यावर ते हमीपत्रावरील अटींशीं शब्दश जुळतात कीं नाहीं याची डोळ्यात तेल घालून बॅंकेला तपासणी करावी लागते व त्यातील कुठले दोष ग्राह्य धरावेत अगर धरू नयेत याचा निर्णय घ्यावा लागतो, व त्यानतर कागदपत्र विनशर्त वटवायचे का सशर्त वटवायचे का तार करून परवानगी घ्यावयाची का ते वसुलीसाठीं पाठवायचें वगैरे बाबींचा विचार करावा लागतो याबाबतची माहिती निर्यात हमीपत्रें किंवा अतर्गत हमीपत्रें (Export letters of Credit, Inward Letters of Credit) या पुढील प्रकरणात दिलेली आहे

हमीपत्रावरील कागदपत्र निर्यातदाराने दिल्यानतर परदेशातील बॅंक ते बरोबर असल्यास वटवून त्याचे पैसे निर्यातदाराला देते व कागदपत्र आयातदाराच्या हमीपत्र उघडणाऱ्या बॅंकेकडे पाठवते हें वर सांगितले आहेच, पण कागदपत्रात काहीं वेळा तात्रिक दोष असतील तर ती बॅंक ते वटवण्याचे नाकारू शकते. पण असे करण्याऐवजी ती शक्यतों निर्यातदाराला मदत करण्याचे दृष्टीनें खालील पैकीं एक मार्ग स्वीकारते. निर्यातदाराची इच्छा असेल तर ती हमीपत्र उघडणाऱ्या बॅंकेकडे तार करून कागदपत्र वटवायचे का याची सरळ परवानगी मागते, किंवा दुसरा मार्ग म्हणजे वर अन्यत्र उल्लेखिलेल्या प्रकारचे असे काहीं क्षुल्लक दोष असतील तर हमीपत्र उघडणारी बॅंक ( वा पर्यायानें आयातदार ) कागदपत्र स्वीकारील अशा भरंवशानें ते दस्तऐवज समर्याद, सशर्त वटवते. म्हणजेच निर्यातदाराकडून ती अशा वटवण्याचे व्यवहाराबद्दल अभय मागते. असे दस्तऐवज सशर्त वटवलेले असल्यास ती बॅंक तसा उल्लेख कागदपत्राबरोबर पाठविल्या जाणाऱ्या पत्रात करते व आयातदाराने कागदपत्र सोडवून घेतल्यावर त्या मर्यादेची सोडवणूक करून मागते (lifting the reserve) पण निर्यातदाराला तारेचा खर्च करावासा वाटत नसेल आणि अभयपत्र घेऊनही दस्तऐवज वटविणे इष्ट नाहीं असें बॅंकेला वाटत असेल तर हमीपत्र उघडलेलें असलें तरीही कागदपत्र त्यानुसार नसल्यास, वसुलीसाठीं पाठविलेलें बिल ( Bill for Collection ) म्हणूनच ते कागदपत्र परदेशातील बॅंकेकडून पाठविले जातात.

हमीपत्रात, बॅंका वस्तूचा व्यवहार करत नसून दस्तऐवजाचा व्यवहार करतात, त्यामुळें हे सर्व दस्तऐवज अगदीं काटेकोरपणानें येतात कीं नाहीं हें बघणें त्याचे कर्तव्य असतें. मालाची प्रत, प्रकार, वर्गवारी चांगलेपणा याच्याशीं बॅंकेचा संबंध नसतो, तरी पण कागदपत्र योग्य नसल्यास आयातदारानें जबाबदारी टाळली तरी हमीपत्र न उलटणारे असल्यास ते उघडणाऱ्या व कागदपत्र वटवणाऱ्या बॅंकेला ती टाळता येत

नाहीं व पर्यायानें खोट खावी लागते, म्हणून अशा हमीपत्राचे व्यवहार करताना बँकेच्या अधिकाऱ्याला अत्सत काटेकोरपणेंच वागावें लागतें

असे दस्तऐवज आल्यावर ते हमीपत्रावरील अटींशीं शब्दशः जुळतात कीं नाहीं याची डोळ्यात तेल घालून बँकेला तपासणी करावी लागते व त्यातील कुठले दोष ग्राह्य धरावेत अगर धरू नयेत याचा निर्णय घ्यावा लागतो, व त्यानतर कागदपत्र विनशर्त वटवायचे का सशर्त वटवायचे का तार करून परवानगी घ्यायेयाची का ते वसुलीसाठीं पाठवायचें वगैरे बाबींचा विचार करावा लागतो. याबाबतची माहिती निर्यात हमीपत्रें किंवा अतर्गत हमीपत्रें (Export letters of Credit, Inward Letters of Credit) या पुढील प्रकरणात दिलेली आहे.

# निर्यात हमीपत्रें

( Export Letters of Credit )

१३

एका व्यापारी हमीपत्राच्या दोन देशांतील आयातदार व निर्यातदार यांच्या दृष्टीनें दोन वेगवेगळ्या तऱ्हा होऊं शकतात. एका बाजूचें आयात हमीपत्र हें दुसऱ्या बाजूचें निर्यात हमीपत्र होत असतें. विशेषतः कळवणाऱ्या बँकेची त्यावर खात्री घातली गेली असल्यास अशा निर्यात हमीपत्रान्वयें निर्यातदार निःशंक होत असतो. हमीपत्र उघडतांना उघडणारी बँक काय करते हें आपण बघितलें आहे, आतां त्यावर दुसऱ्या बाजूस काय प्रक्रिया होतात, हें बघणें मनोरंजक ठरेल.

हमीपत्र उघडणाऱ्या बँकेकडून तें तिच्या विदेशांतील प्रतिनिधीकडे पाठवलें गेलें कीं तें हमीपत्र तसेंच किंवा आपल्या हमीपत्राचे फॉर्मवर खात्री घालून, वा न घालून, ती बँक धारकाला तें कळवतें. असें हमीपत्र जर तारेनें कळवलें गेलें असेल तर तारेनें आजरोजीं आपल्या नांवचें असें हमीपत्र या या अटींचें उघडलें गेलें आहे असें पत्र, कळवणारी बँक धारकाला पाठवते. मात्र या तारेचा हवाई मार्गानें लेखी व पक्का मसुदा हातांत पडल्यावर त्याप्रमाणें शोध देण्याची आम्हाला मोकळीक राहील व तसा पक्का मसुदा (Confirmatian) हातांत पडेपर्यंत दस्तऐवज

## निर्यात हमीपत्रें

( Export Letters of Credit )

१२

एका व्यापारी हमीपत्राच्या दोन देशांतील आयातदार व निर्यातदार यांच्या दृष्टीनें दोन वेगवेगळ्या तऱ्हा होऊं शकतात. एका बाजूचें आयात हमीपत्र हें दुसऱ्या बाजूचें निर्यात हमीपत्र होत असतें. विशेषतः कळवणाऱ्या बँकेची त्यावर खात्री घातली गेली असल्यास अशा निर्यात हमीपत्रान्वयें निर्यातदार निःशंक होत असतो. हमीपत्र उघडतांना उघडणारी बँक काय करते हें आपण बघितलें आहे, आतां त्यावर दुसऱ्या बाजूस काय प्रक्रिया होतात, हें बघणें मनोरंजक ठरेल.

हमीपत्र उघडणाऱ्या बँकेकडून तें तिच्या विदेशांतील प्रतिनिधीकडे पाठवलें गेलें कीं तें हमीपत्र तसेंच किंवा आपल्या हमीपत्राचे फॉर्मवर खात्री घालून, वा न घालून, ती बँक धारकाला तें कळवते. असें हमीपत्र जर तारेनें कळवलें गेलें असेल तर तारेनें आजरोजीं आपल्या नांवचें असें हमीपत्र या या अटींचें उघडलें गेले आहे असें पत्र, कळवणारी बँक धारकाला पाठवते. मात्र या तारेचा हवाई मार्गानें लेखी व पक्का मसुदा हातांत पडल्यावर त्याप्रमाणें शोध देण्याची आम्हाला मोकळीक राहील व तसा पक्का मसुदा (Confirmatian) हातांत पडेपर्यंत दस्तऐवज वटवण्यास आम्ही बांधील राहणार नाहीं असा त्यावर शेरा मारते. त्यानंतर असें हमीपत्र कळवतांना वा त्यावर खात्री घालतांना कळवणारी बँक हमीपत्राचे मुदतीप्रमाणें आपला आकार धारकाकडून । उघडणाऱ्या बँकेकडून वसूल करते, वा हिशोबीं लिहून ठेवते. हें हमीपत्र आल्यावर, त्याप्रमाणें वा तें तपासून पाहिल्यावर कांहीं बदल सुचवल्यानंतर किंवा आयातदाराच्या भावी बेतामुळें त्यांत पुढील येणाऱ्या शोधाप्रमाणें, त्यापोटीं माल निर्यात

करून त्याचे दस्तऐवज वटवण्यासाठीं तें हमीपत्र, एकाद्या बँकेपुरतें निर्बंधित केलेले असल्यास तिच्याकडे किंवा अन्य कुठल्याही बँकेकडे प्रत्यक्ष वा आपल्या बँकेतर्फे दस्तऐवज वटवणें एवढेंच निर्यातदाराचें काम राहतें.

## सदोष दस्तऐवज व अभयपत्र :

वटवण्याचा व्यवहार सकृद्दर्शनीं सोपा वाटतो पण प्रत्यक्षांत तो तसा नसतो. सुधारलेल्या व पुढारलेल्या राष्ट्रांतूनही कागदपत्र वटवावयास येत असतांना त्यांतील ४० ते ५० टक्के दस्तऐवज सदोष वा अपुरे असतात असा बँकांचा अनुभव असतो. असे दस्तऐवज आल्यावर त्यांत दोष आढळून आल्यास आम्ही त्याचे खालील कारणामुळें पैसे देऊं शकत नाहींत असे ती बँक निर्यातदाराला कळवते. अशीं कारणें कळवलीं गेल्यावर ते दोष संपूर्णपणें काढून टाकण्याची जेव्हा शक्यता असते तेव्हां निर्यातदार ते काढून व दस्तऐवज सुधारून देऊं शकतो. पण कांहीं वेळींत्र त्याचा इलाजच चालत नाहीं. ( उदा०निर्यातपत्र शिळें आहे, वटावाची मुदत संपली आहे, निर्यातपत्रावर कांहीं शेरे आहेत, विमापत्र निर्यातपत्राच्या पुढील तारखेचें आहे वगैरे ) अशा वेळीं असे दोष तारेनें कळवून आयातदाराच्या बँकेकडून ते मान्य असल्याची किंवा नसल्याची उलट तार मागितली जाते. किंवा दोष खूप मोठे असतील तर विलवसुलीचा पर्याय स्वीकारला जातो. कांहीं वेळेला या दोन्ही मार्गांऐवजीं, कागदपत्र घेणारी बँक मर्यादा ठेवून ते वटवते किंवा त्यासाठीं निर्यातदाराकडून एक खात्रीपत्र घेते. या खात्रीपत्राचा मसुदा खालील प्रमाणें असतो.

"आमचीं खालील सदोष दस्तऐवजी विलें आपण वटवण्याचें कबूल केलेंत त्याबद्दल आम्ही त्या अन्वये उद्भवणाऱ्या सर्व परिणामाबद्दल, अस्वीकार, पैसे न देणें वगैरे बाबत, आपणांस या पत्रान्वयें विनशर्त खात्री व अभय देत आहोंत. या हुंडीचे दस्तऐवजात खालील चुका, दोष व अपुरेपणा आहे. त्या बाबत आपणांस कुठलीही झळ लागूं दिली जाणार नाहीं.

( १ ) ..................................

( २ ) ..................................

हुंडीच्या ऋणकोला आम्ही ती लगेच स्वीकारावयास | तिचे पैसे लगेच भरण्यास कळवीत आहोंत पण त्यानें वरील दोषामुळें वा अपुरेपणामुळें वा अन्य कांहीं दोष, अपुरेपणा यामुळें दस्तऐवज स्वीकारले नाहींत, पैसे दिले नाहींत तर, तुम्ही मागणी केल्यावर त्यावेळीं चालू असलेल्या विनिमय परिमाण दरानें आम्ही आपणांस पैसे देऊं. तसेच तुम्ही दिलेल्या रकमेच्या दिनांकापासून ती रक्कम आम्ही परत देईपर्यंत, त्यावर तुम्ही सांगाल त्या दरानें व्याज व त्या विलासाठीं तुम्हास सोसावे लागलेले तदनुषंगिक खर्च ही देऊं. ही सर्व रक्कम, व्याज व खर्च आकार तुम्हाला आमचे खातीं नांवें टाकण्याचा अधिकार राहील, व त्यासाठीं लागणारी रक्कम खात्यांत भरण्याची व्यवस्था आम्ही लगेच करूं. जर अशी रक्कम नांवें टाकल्यानें आमचे खात्यावर येणें रक्कम निघूं लागेल तर त्यापोटीं त्यावेळीं अगर तदनंतर बँकेच्या ताब्यांत असलेला माल, कर्जरोखे, शेअर्स, अन्य हुंड्या यांसारखे आर्थिक, मूल्यवान दस्तऐवज, अगर अन्य खात्यांतील शिल्लक रकमा यांवर, इतर कुठल्याही हक्कास बाध न येतां, बँकेस हक्क प्राप्त होतील.

या करारांतील वटवलेल्या बिलाचा तपशील:

बिल नं. ———— दिनांक ———— रक्कम ————

हमीपत्र क्रमांक ———— उघडणाऱ्या बॅंकेचें नांव ———— दिनांक ————

हमीपत्रांत अंतर्भूत झालेला माल ————————

निर्यातदाराची सही.

असें अभयपत्र लिहून घेतल्यावर हमीपत्र अनाधार (Without Recourse) असलें तरी तें आपोआपच तत्त्वतः साधार (With Recourse) होतें. अभयपत्र लिहून घेतांना बॅंक निर्यातदाराला त्या कागदपत्रांतील दोष व अनुल्लेख दाखवते. पण त्याखेरीज इतर दोष व अनुल्लेखही आयातदारानें काढले तरी त्याबद्दलही त्या अभयपत्रान्वये निर्यातदार बँकेला अभय देतो. हे कागदपत्र आयातदाराच्या बँकेकडे पाठवितांना ते कागद पाठवणारी बँक निर्यातदाराला पैसे दिल्याचे कळवणाऱ्या ..पत्रांत, सदर कागद

अभयपत्राखालीं वटवले आहेत असा शेरा मारते. तसेच परदेशांतील बँकेसही, तसें कळवून आयातदारानें कागद सोडवून घेतले कीं तसे तावडतोब कळवण्यासाठीं विनंती करते. अशी माहिती कळवली गेली नाहीं तर तीन अथवा सहा महिन्यावर त्या कागदपत्रांचें बंधन आमचेवर रहाणार नाहीं, असेंही वटवणारी बँक त्या आयातदाराच्या बँकेच्या निदर्शनास आणते. अर्थात ह्या अभयपत्राचा उल्लेख आयातदाराकडे कागद दाखल करतांना बँका बहुधा करीत नाहींत. मात्र सदर कागदपत्रांत खालील दोष आहेत असें त्या सूचनापत्रांत नमूद करतात. आयातदारानें हुंडी स्वीकारली किंवा पैसे दिले तर त्याला ते दोष मान्य आहेत असा अर्थ होतो. अर्थात हमीपत्राप्रमाणें कागद बरोबर आहेत कीं नाहीं हे बघण्याची व त्यातील दोष असल्यास दाखवण्याची जबाबदारी जरी त्याची बँक घेते तरी त्याबद्दल ती बांधलेली मात्र नाहीं. कागदपत्र आपल्याला योग्य वाटतील असे आहेत हें बघून घेण्याची खरी जबाबदारी त्या आयातदाराचीच असते. व एकदा त्यानें कागदपत्र सोडवून घेतले कीं तत्संबंधित सर्व बँकांची कायदेशीर जबाबदारी संपते. असे कागदपत्र सोडवून घेण्यापूर्वी ते तपासून घेण्याची त्याला संपूर्ण मुभा असते व त्याला न पटणारे तांत्रिक दोष त्यांत असल्यास तें नाकारण्याचें स्वातंत्र्यही त्याला असतें. असे कागदपत्र नाकारल्यास बँक अभयपत्रान्वयें विक्रेत्याकडून आपली रक्कम वसूल करते. पण अनवधानानें किंवा चूक न वाटल्यानें तिनें अभयपत्र घेतलें नसल्यास व आयातदारानें किंवा त्याचे बँकेनें वटवलेले कागदाचे पैसे देण्याचे नाकारल्यास बँकेला तो भुर्दंड सोसावा लागतो, म्हणूनच बँका अशा कागदपत्रांची कसोशीनें तपासणी करतात. कागदपत्राची तपासणी करताना बँकानीं दोष दाखवले तरी निर्यातदाराला तें कित्येकदां दोष नाहीत असें वाटते, किंवा बँक उगीचच चिकित्सा करते असें वाटून ते तिला दोष देतात. पण हमीपत्राचा व्यवहार हा कागदपत्रांची हमी देणारा व्यवहार असल्यानें बँकाना अत्यंत क्षुल्लक दोष ही दाखवावे लागतात, कारण आयातदार तेवढ्यानेंही पैसे नाकारूं शकतो हे निर्यातदारानें विसरूं नये.

अशी तपासणी करतांना हमीपत्र उघडणारी बँक खालील गोष्टींचा विचार करते.

## ड्राफ्ट किंवा हुंडी :

(१) ज्याचे नांवानें हमीपत्र उघडलें गेले आहे, त्यानेंच हुंडी काढली आहे ना ? व त्याची त्यावर सही आहे ना ?

(२) हुंडीवर 'अमक्या बँकेचे अमुक क्रमाकाचे अमुक दिनांकाचे हमीपत्राखालीं काढलेली, असा शेरा आहे ना ?

(३) हुंडीवर कुठेही खाडाखोड, बदल नाहींत ना ? असल्यास त्या जागीं हुडी काढणाराच्या सह्या आहेत ना ?

(४) ज्या चलनाचें हमीपत्र उघडलें असेल त्याच चलनांत हुडींतील रक्कम लिहिलेली आहे ना ?

(५) ती रक्कम अंकीं व अक्षरीं बरोबर आहे ना ?

(६) हुण्डीची रक्कम हमीपत्रातील रकमेपेक्षा जास्त होत नाहीं ना ?

(७) हमीपत्रांत लिहिल्याप्रमाणेंच ती मुदतीची किंवा दर्शनी हुडी आहे ना ?

(८) हुंडीस स्टॅंप लागत असल्यास तो योग्यपणें लावला आहे ना ?

(९) हुण्डीची रक्कम बीजकाबरोबर जुळत आहे ना ?

(१०) हुण्डी बॅंकेच्या आज्ञेची काढलेली आहे ना ? किंवा बॅंकेला पैसे देण्याची त्यात विनन्ती आहे ना ? किंवा बॅंकेच्या नांवाने ती एंडॉर्स केलेली आहे ना ?

(११) हुण्डीच्या किमान दोन प्रती आहेत ना ?

(१२) रूपांतराची व व्याजाबद्दलची अट हमी पत्रांत असल्यास ती हुण्डी-वर उल्लेखलेली आहे ना ?

## बीजक :

(१) बीजक निर्यातदाराच्या छापील कागदावर (Letter Head) आहे ना ?

(२) त्यांतील मालाचें वर्णन हमीपत्रांतील वर्णनाबरोबर आहे ना?

(३) हमीपत्रांत उल्लेख असल्यास त्याप्रमाणें त्यांत किंमतीचे बरोबर निर्देश केलेले आहेत ना?

(४) त्यांत वा० भा० वि० किंवा तत्सम अन्य असलेले करार दर्शवणारे (C.I. F., C & F etc) शब्द आहेत ना?

(५) हमीपत्रात लिहिलेल्या इतक्या त्याच्या कमींत कमी किमान प्रती आहेत ना?

(६) बीजकावर आयातदाराचें नांव घातलेले आहे ना?

(७) निर्यातपत्रावरील 'निर्यातीच्या खुणा' त्यावर दाखवल्या आहेत ना?

(८) निर्यातपत्रात व हमीपत्रांत लिहिलेले, मालाचें वर्णनच बीजकामध्यें, बरोबर लिहिलेलें आहे ना?

(९) बीजकांमधील किंमत हुण्डीतील रकमेबरोबर आहे ना? हमीपत्रात किंमतीबद्दल विशिष्ट उल्लेख आहेत का? व ते तसे बीजकामध्यें केलेले आहेत ना?

(१०) बीजकाची रक्कम हमीपत्रापेक्षां जास्त होत नाहीं ना?

(११) बीजक केलेल्या (चालू) निर्यातीबाबत (Current Shipment) आहे कां त्यांत पूर्वीच्या निर्यातींतील किंवा पुढें पाठवल्या जाणाऱ्या मालाबाबत कसर किंवा सूट याबाबत कांहीं कमी जास्त बेरीज वजाबाकी केलेली आहे? असल्यास हमीपत्रान्वये ती संमत आहे का?

(१२) हमीपत्रांत अशा खास बेरीज वजाबाकी बद्दल (Additions, Substractions) उल्लेख नसल्यास त्याबद्दल अधिकृत कागदपत्र, प्रवासाकारपत्र वगैरे (Freight Certificate) जोडलेले आहेत कां?

(१३) हमीपत्रांत उल्लेखिल्याप्रमाणें बीजक सही केलेले आहे ना किंवा योग्य ती खात्री दिलेले आहे ना?

(१४) शक्यतों त्यांत, चूकभूल घावी घ्यावी (E. L. O. E.) असे शब्द आहेत ना?

(१५) बीजकाचा कॉन्सुलर इन्व्हॉईस सारखा कांही विशिष्ट प्रकारचा हमीपत्रांत मागितला आहे कां ?

(१६) बीजकांमध्यें दाखवलेलें वजन, वजनाबद्दलच्या यादीशीं व निर्यात-पत्रांशीं जुळतें आहे ना ?

(१७) हमीपत्रांत आयातपरवान्याचा उल्लेख असल्यास त्याचा क्रमांक बीजकावर घातला आहे कां ?

(१८) बीजकांत उत्पादनस्थानपत्राचा अंतर्भाव आहे का ? नसल्यास उत्पादनस्थानपत्र वेगळें दिलें आहे का ?

**निर्यातपत्र :**

( १ ) निर्यातपत्र स्वच्छ, निर्दोष आहे ना ? ते सदोष किंवा सटीक (Claused) *असल्यास कुठले दोष आहेत ? टीका कुठल्या आहेत ?*

( २ ) निर्यातपत्र शिळें नाहीं ना ?

( ३ ) निर्यातपत्राच्या सर्व प्रती (संपूर्ण संच) दिल्या गेल्या आहेत ना ?

( ४ ) निर्यातपत्र माल बोटीवर चढला आहे (On Board or Shipped) असें दर्शवणारें, नौस्थित, आहे ना ?

( ५ ) निर्यातपत्र कोरी सही केलेले (Blank Endorsed) किंवा बँकेच्या नांवानें एंडॉर्स केलेलें आहे ना ?

( ६ ) निर्यातपत्रावरील खुणा बीजकांवरील खुणाप्रमाणें आहेत ना ?

( ७ ) निर्यातपत्रावरील प्रवासाकाराचे उल्लेख (Freight Paid/ Payable) हमीपत्रानुसार आहेत ना ?

( ८ ) हमीपत्रांत प्रवासाकाराची स्वतंत्र पावती मागितली आहे कां ?

( ९ ) निर्यातीसाठीं जास्तींत जास्त जी शेवटची तारीख हमीपत्रांत घातली आहे त्या आधीची तारीख निर्यातपत्रावर आहे ना !

(१०) हमीपत्रांत, वर्दीची अट (Notify Clause) निर्यातपत्रांत असावी असा उल्लेख असल्यास त्याप्रमाणे निर्यातपत्रांत तिचा समावेश केलेला आहे काय ?

(११) हमीपत्रांत निर्यातपत्राच्या कांही नॉननिगोशिएबल प्रती मागितल्या असल्यास त्या दिल्या गेल्या आहेत काय ? किंवा त्या आयातदार अथवा अन्य कुणांस परस्पर पाठवावयाच्या असल्यास तसा शेरा दिलेलें पत्र जोडलेलें आहे काय ?

(१२) हमीपत्रांत लिहिलेल्या बंदरांतूनच माल निर्यात झाल्याचें, निर्यातपत्रावरून दिसत आहे ना ?

(१३) निर्यातपत्रांतील माल पोचवण्याचें ठिकाण, हमीपत्रांतील लिहिलेल्या अटींप्रमाणेंच दिसत आहे ना ?

(१४) हमीपत्रांत जहाजाच्या प्रवासाचा विशिष्ट मार्ग उल्लेखिला आहे कां ? असल्यास निर्यातपत्र तसेंच आहे ना ?

(१५) हमीपत्रांत बदलीप्रवासाबाबतचे उल्लेख कसे आहेत ? निर्यातपत्र त्या बाबतच्या अटी पाळणारें आहे ना ?

(१६) निर्यातपत्रांत केलेलें मालाचें वर्णन हमीपत्रानुसार व दिल्या गेलेल्या बीजकानुसार आहे ना ?

**विमापत्र :**

( १ ) विमापत्राची व्यवस्था निर्यातदारानें करावयाची अशी वा. भा. वि. (C. I. F.) अट हमीपत्रांत आहे कां ?

( २ ) असल्यास, आयातदारानें कुठलीं कुठलीं संरक्षणें मागितलीं आहेत ? व विमापत्रांत तीं सर्व अंतर्भूत आहेत कां ?

( ३ ) विमापत्र पॉलिसीचे स्वरूपांतलेंच असावें असें बंधन आहे कां, सर्टिफिकेटही चालणारें आहे ? त्यासाठीं विशिष्ट कंपनीचा संदर्भ केलेला आहे कां ?

( ४ ) विमापत्र मालाचे किंमती–इतकें अगर हमीपत्रांत लिहिलें असल्यास त्यापेक्षां जास्त किंमतीचें आहे ना ?

( ५ ) विमापत्रांत हक्कपूर्तीचे पैसे कुठे मिळावेत याचा बरोबर उल्लेख केलेला आहे ना ?

( ६ ) विमापत्र हमीपत्राचेच, चलनांत आहे ना ?

( ७ ) विमापत्र योग्य तऱ्हेनें एंडॉर्स केलेलें आहे ना ?

( ८ ) विमापत्रांत बदली प्रवास ऑन डेक शिपमेंट, वगैरे खास संरक्षणें, आवश्यक असल्यास दिलीं गेलीं आहेत ना ?

( ९ ) विमापत्रांत जहाजाचें संपूर्ण प्रवासाबाबत संरक्षण दिलें गेलें आहे ना ? व योग्य जहाजाचें नांवही घातलें आहे ना ?

( १० ) विमापत्रांत विमाकंपनीनें कांहीं वेगळ्या अटी घालून दिल्या आहेत कां ?

( ११ ) विमापत्राच्या दोन्ही प्रती दिल्या गेलेल्या आहेत ना ?

( १२ ) विमापत्राची तारीख निर्यातपत्राचे आधींची किंवा निर्यातपत्राचीच आहे ना ? ( तारीख नंतरची असल्यास दरम्यानच्या काळांत मालाला कुठलेंही संरक्षण नसतें ).

**सर्वसाधारण :**

( १ ) हमीपत्रांत कांहीं अन्य कागदपत्रांची ( पॅकिंग लिस्ट, वजनयादी इन्स्पेक्शन सर्टिफिकेट वगैरे ) मागणी आहे काय ? व त्याप्रमाणें ते कागदपत्र निर्यातदारानें सादर केलेले आहेत ना ?

( २ ) निर्यात अंशतः असल्यास त्याबद्दल प्रमाणांत ( Pro-rata ) पैसे मागणारे बीजक, हुंडी हे कागदपत्र दिले आहेत कां ? अशी अंशतः निर्यात पूर्वी झालेली असल्यास एकूण निर्यात, हमीपत्रांतील रकमेपेक्षां वा मालाचे उल्लेखापेक्षां जास्त होत नाहीं ना ?

( ३ ) हमीपत्रांत निर्यातीबद्दल महिनेवार, किंवा कमीत कमी अमूक माल प्रत्येक निर्यातींत असावा अशा कांहीं अटी आहेत का ? असल्यास त्या पाळल्या गेल्या आहेत कां ? ( उदा०:–जानेवारी महिन्यांत १०,००० वार कापड व नंतर दरमहा कमींत कमी ५००० वार कापड पाठवलें जावें वगैरे )

(४) वजनयादी (Weight Lists) पॅकिंग लिस्ट वगैरे मागितली असल्यास त्यांतील वर्णन, वजन, निर्यातपत्रांतील व बीजकांतील माहितीशीं जुळतें आहे ना?

(५) वजनयादींतील डागांची संख्या निर्यातपत्रांतील संख्येशीं जुळत आहे ना?

(६) सर्व कागदपत्र (हुंडी, बीजक, विमापत्र वगैरे) एकाच चलनांत काढलेले आहेत ना? त्यांच्या दिनांकांत हमीपत्राविरुद्ध जाण्यासारखे फरक नाहींत ना!

(७) सर्व दस्तऐवजावरील रकमेचे किंवा आंकड्यांचे अंकीं व अक्षरीं उल्लेख बरोबर आहेत ना? व ते दस्तऐवज योग्य अधिकारी व्यक्तींनीं सह्या केलेले आहेत ना?

या सर्व प्रश्नावलीस योग्य उत्तरें मिळून, कागदपत्रांची तपासणी झाल्यावर बँक ते परदेशांतील बँकेकडे पाठवण्यापूर्वीं खालील बाबींचाही विचार करते.

(१) कागदपत्र वटवण्यासाठीं हमीपत्रांत दिलेल्या मुदतींत आलेले आहेत ना? (कांहीं वेळां तपासणीसाठीं वेळ लागल्यानें किंवा काम जास्ती असल्यानें वटवणाऱ्या बँकेकडून परदेशी बँकेस, कागदपत्र, वटवण्याच्या तारखेनंतर पाठवले जातात. अशा वेळीं ह्या कागदपत्रांबरोबर पाठवल्या जाणाऱ्या पत्रांत ती बँक दस्तऐवज वटवण्यासाठीं मुदतींत मिळाले होते असा शेरा मारते.)

(२) भारतांत जर निर्यातबिल वटवलें जात असेल तर दस्तऐवजाबरोबर योग्य तो जी. आर./ई. पी./पी. पी. फॉर्म दिलेला आहे ना?

(३) रिझर्व बँकेकडे पाठवण्यासाठीं बीजकाची एक जादा प्रत निर्यातदाराने दिली आहे ना?

(४) बीजकापेक्षां निर्यातनियंत्रणाच्या जी. आर./पी. पी./ओ. पी. फॉर्ममध्यें दहा टक्के, वीस टक्के अशीं कांहीं राखीव रक्कम आहे

काय? असल्यास उरलेली रक्कम कुठल्या कारणानें नंतर दिली जाणार आहे व ती विनिमयनियंत्रणानें संमत केलेल्या योग्य मुदतींत आणण्याची हमी निर्यातदारानें दिलेली आहे ना!

( ५ ) वटवणाऱ्या बँकेनें, हमीपत्रावर वटवलेल्या हुंडीची रक्कम मांडावी ( Endorse ) अशी सूचना आहे कां? हमीपत्राची मूळ प्रत सर्व शोधासह सादर केलेली आहे कां! तसेच अशी नोंद केल्यास तसा शेरा विदेशी बँकेला हवा आहे काय?

( ६ ) हमीपत्रांत दस्तऐवजाचे कागद दुसरीकडे पाठवावेत असें हमीपत्र उघडणाऱ्या बँकेनें कळवलेलें आहे कां? तसेच असे कागदपत्र पाठवल्यास हुंडी कुठें पाठवावी याविषयीं काय उल्लेख आहेत?

( ७ ) दस्तऐवज हमीपत्र उघडणाऱ्या बँकेकडे पाठवून, त्या कागदांच्या वटवण्याची माहिती दुसऱ्या शाखेला किंवा बँकेला कळवावी व हमीपत्रांखालील कागद सर्व अटींची पूर्तता करणारे आहेत व,........ला पाठवले आहेत असे शेरापत्रक जोडावें व पैसे घ्यावेत ( Get Reimbursed ) असें कळवलेलें आहे कां?

( ८ ) दस्तऐवज वटवणाऱ्या बँकेवर आणखी कांहीं जबाबदाऱ्या आहेत काय? तसेंच हुंडी मुदतीची असल्यास, ती स्वीकारल्यानंतर तिच्याबद्दलच्या, तसेंच वटणावळ व व्याज याबद्दलच्या सूचना काय आहेत?

आलेल्या दस्तऐवजांची अशारीतीनें कडक तपासणी केल्यानंतर कागदपत्रांत दोष वा अपुरेपणा आढळून आल्यानें ते परत करणेंच इष्ट आहे कां अभयपत्र घेऊन ते सशर्त वटवतां येतील याबाबत बँक विचार करते व अभय पत्राखालीं तसें शक्य असल्यास कुठल्या कुठल्या दोषासाठीं अशी गॅरंटी वा खात्री जरूर आहे, याची यादी काढते व त्या प्रमाणें असे खात्रीपत्र घेण्यांत येतें. या खात्रीपत्राचा नमुना मागें दिलेला आहेच. नंतर या कागदपत्रांचे दोन वा तीन संच केले जातात. पहिला संच हमीपत्रांतील इच्छित बँकेकडे हवाईमार्गानें पाठवला जातो व दुसरा कांहीं दिवसांनीं

हवाई / सागरी मार्गानें पाठवण्यासाठीं व्यवस्था केली जाते. हेतु हा कीं, कांहींही झालें तरी एक संच तरी बँकेला मिळावा. ज्या बँकेकडे वटवण्यासाठीं कागद दिले जातात तिच्या ऐवजीं दुसऱ्या बँकेचे नांवानें हमीपत्र मर्यादित (Restricted) असेल तर त्या दुसऱ्या बँकेकडे ते कागदपत्र, निर्यातदाराची बँक ह्मणून पहिली बँक पाठवते व दुसरी बँक ते कागदपत्र वटवते. वर लिहिल्या प्रमाणेंच पहिली बँक हमीपत्र मर्यादित नसेल तर निर्यातदाराला आपल्या इच्छेप्रमाणें हमीपत्र ज्या बँकेनें कळवलें आहे तिच्याकडे कागदपत्र न नेता कुठल्याही बँकेंत वटवण्यासाठीं नेतां येतात, व ते वटवणें त्या बँकेच्या इच्छेवर अवलंबून असतें.

## आंतरराष्ट्रीय व्यापार मंडळाच्या सर्वमान्य रूढी व व्यवहार (Uniform Customs & Practice):

निर्यातीचा व्यवहार करणाऱ्या संबंधितांना आणखी एका गोष्टीची माहिती असावी लागते. ती म्हणजे आंतरराष्ट्रीय व्यापारमण्डळानें (*International Chamber of Commerce*) दस्तऐवजी हमीपत्राबाबत ठरवलेल्या सर्वमान्य रूढी व व्यवहार पद्धती ही होय. हें व्यापारमण्डळ १९१९ सालीं स्थापन झालें व बहुतेक राष्ट्रें त्याची सदस्य आहेत. जगांतील सर्व देशांतून व्यापाराचे वेळीं जे कागदपत्र पाठवले जातील त्यासाठीं एक सर्वसाधारण नियमावली असावी अशा उद्देशानें या मण्डळानें प्रथम १९३३ सालीं तिच्या सातव्या कॉंग्रेसमध्यें कांहीं नियम तयार केले. त्यानंतर युद्ध कालांत बऱ्याच घडामोडी झाल्यानें त्या संहितेची सुधारलेली आवृत्ति जून १९५१ मध्यें लिस्बनला भरलेल्या १३ व्या कॉंग्रेसमध्यें ठरवण्यांत आली. त्यांत हमीपत्रांचे प्रकार, त्यानुसार पडणारी जबाबदारी, दस्तऐवज, शब्दप्रयोगांचे अर्थ, याबाबत खुलासे केलेले आहेत. या संहितेतली कागदपत्राबाबतचीं तत्त्वें पुष्कळशा देशांनीं मान्य केलीं आहेत. पण भारत, इंग्लंड सारख्या कांहीं देशांनीं हीं तत्त्वें संपूर्ण मान्य केलेलीं नाहींत. त्यामुळें, विशेषतः ज्या देशानें ही तत्त्वें मान्य केलेलीं आहेत तेथील आयातदार किंवा निर्यातदार यांचेशीं जर भारतीय

व्यापाऱ्याला किंवा ज्यांनीं हीं तत्त्वें मान्य केलीं नाहींत त्या देशांतील व्यापाऱ्याला व्यवहार करावयाचा असेल तर पंचाईत होण्याचा संभव असतो. कारण तो परदेशी व्यापारी त्या तत्त्वानें वागेल तर दुसऱ्या बाजूला ती मान्य नसल्यानें, दुर्दैवानें कांहीं मतभिन्नता आल्यास व्यवहारांत कटुता निर्माण होणें संभवनीय ठरेल. अशा वेळीं वरील संहितेंत नसलें तरी व्यवहारांत दुसरें एक सर्वसंमत तत्त्व धरलें गेलें आहे; तें हें कीं ज्या देशांत कागदपत्रांचे पैसे द्यावयाचे आहेत, ( म्हणजेच आयातदाराचा देश ) त्या देशाच्या नियमाप्रमाणें दुसऱ्या बाजूनें वागलें पाहिजे. वरील विवेचन लक्षांत घेऊन भारतीय निर्यातदारानें, ज्या देशांनीं हमीपत्रांतील दस्तऐवजाबाबतची व्यापारमण्डळाची सर्वसाधारण संहिता ( Uniform Customs & practice for Documentary Credits ) मान्य केली आहेत, त्यांचेशीं व्यवहार करतांना ती संहिता समजावून घेतली पाहिजे. या सर्वसाधारण नियमान्वयें, विशेषतः हमीपत्रांत उल्लेख नसेल तर ट्रॅन्सशिपमेंट बिल ऑफ लेडिंग हें वाजवी समजलें जातें. ज्यावेळेला माल अगदीं काटेकोरपणें पुरवला जाणें शक्य नसेल तेव्हां 'अंदाजें, सुमारें' असे शब्द नसले तरी सुमारे १० टक्क्यापर्यंत कमी अगर जास्त निर्यात झाल्यास ती योग्य समजली जाते. तसेंच कागदपत्रांतून अंशतः निर्यातीबद्दल जर उलटा उल्लेख नसेल तर अंशतः निर्यात संमत समजली जाते. हमीपत्रांत निर्यातपत्र नौस्थित ( On Board ) असले पाहिजे, असा स्पष्ट उल्लेख नसेल तर 'Received for Shipment' किंवा 'Alongside' किंवा 'Through' निर्यातपत्र दिल्यास त्याबद्दल दोष देतां येत नाहीं. तसेंच विमापत्र हें निर्यातपत्राआधींच्याच किंवा त्याच तारखेचें वैध समजलें जाते. एखाद्या निर्यातदाराचे नांवानें परदेशातून असें निर्यात हमीपत्र ( Export Letter of Credit ) यावयाचें असेल तर त्यानें दुसऱ्या बाजूला म्हणजे परदेशी आयातदाराला याबाबतचे सर्व खुलासे विक्रीकराराचे वेळीं केल्यास व आपल्याला हमीपत्रांत कुठल्या अटी हव्या आहेत ते आधीं कळवल्यास नंतर गैरसमजाला वाव रहात नाहीं.

## दस्तऐवजी हुंड्याची खरेदी :

निर्यातदारानें निर्यातीनंतर तत्संबंधीचें निर्यातपत्र व अन्य दस्तऐवज बँकेला दिल्यानंतर हमीपत्र असल्यास तो ते वटवून घेतो. पण अनेकदां निर्यात ही विश्वासावर केल्यानंतर, निर्यातदार ती कागदपत्रें वसुलीसाठीं देतो. त्याचवेळीं पैशाच्या जरूरीमुळें तो या वसुलीसाठीं दिलेल्या बिलांच्या तारणावर कांहीं उचल मागणें हें स्वाभाविक आहे. अशा वेळेला बँक त्या हुंड्याचेवर कांहीं टक्के उचल देते किंवा त्या खरेदी करते. ज्या वेळेला बँक ती बिलें खरेदी करते तेव्हां ती त्या बिलांची मालक होते. आणि मग त्या बिलांची रक्कम वसूल झाली नाहीं तर त्याबाबत जबाबदार असलेल्या सर्व घटकांवर ती कायदेशीर दाद घेऊं शकते. पण या बिलांवर बँक रक्कम नुस्तीच कर्ज म्हणून देतें तेव्हां तिची जबाबदारी व हक्कही वेगळे असतात. ही बिलें तिनें वसुलीसाठीं प्रतिनिधी म्हणून घेतलेली असतात. त्यामुळें तें कर्तव्य तिला पार पाडावें लागनेंच पण त्याचबरोबर त्या तारणावर पैसेही दिले असल्यानें त्या बिलापोटीं निर्यात झालेल्या मालांतही तिचे कांहीं हित-संबंध येतात. म्हणून अशा प्रकारची कुठलीही सवलत देण्यापूर्वीं बँका निर्यातदाराकडून एक नजरगहाणाचा तारणपत्राचा करार (Hypothication Deed) करून घेतात. त्याअन्वयें तीं बिलें व त्या पोटीं असलेला सर्व माल बँकेला तारण म्हणून राहतो. या मालाचे योग्य ते विमे उतर-वणें, बोटींचें भाडें देणें, वेळ पडल्यास परदेशांतील बंदरांत माल साठवून ठेवणें व त्याचें गुदाम भाडें देणें, तसेंच आवश्यक असल्यास त्यावरील जकात देणें, अन्य प्रतिनिधी बँका नेमणें व त्यांचे आकार देणें, ज्यावर हुंडी काढली आहे त्यानें बिल / माल सोडवून न घेतल्यास दुसऱ्याला तो माल देणें, हुडीवाल्याला मुदत देणें वगैरे अनेक अधिकार बँकेला त्यामुळें मिळतात. तसेंच, कुठल्याही प्रकारें बिलाची रक्कम वसूल न झाल्यास निर्यातदाराच्या खात्याला तो नावें टाकणें, सर्व संबंधिताना नोटीसा काढणें वगैरे प्रकारें निर्यातदारावरही उपाय योजना करण्याची बॅकेला मोकळीक असतेच. कर्जाचा हा व्यवहार अन्य तारणावरील कर्जाप्रमाणेंच होत

असतो. पण नाविकनिर्यातपत्रावरील कर्जांत इतर अनेक गोष्टींची जास्त काळजी वहावी लागते ह्मणून बँका निर्यातदाराच्या व्यवहाराची कसोशीनें चौकशी करीत असतात व प्रत्येक निर्यातदाराला एकूण किती मर्यादेपर्यंत अशीं बिलें खरेदी करण्याची मर्यादा बांधी तें ठरवीत असतात. निर्यात बिलांची तपासणी झाल्यावर पूर्वींचीं बिलें किती रकमेची सुटून यावयाची राहिली आहेत, त्यांतील दोन किंवा तीन महिन्यांपूर्वींचीं किती आहेत, नवीन बिलें पूर्वी वेळेवर बिलें न भरणाऱ्या ऋणकोवरच काढलेली आहेत काय याचा आढावा घेऊन, तसेंच निर्यात झालेला माल कुठला आहे हेंही लक्षांत घेऊन निर्यातहुंडी खरेदी करण्याचा निर्णय बँकेकडून घेतला जातो. अशी खरेदी केलीं जाणारीं बिले जर मुदती हुंडीच्या स्वरूपांतील असलीं तर स्वीकृत झालेल्या बिलांचें एक वेगळें खाते खतावणींत ठेवलें जाते. तीं जर मुदतीचे दिवशीं पटली गेलीं नाहींत तर त्यांवर व्याजही सुरू होतें. मुदत भरल्यानंतर पटल्या न जाणाऱ्या बिलांचें खातेंही वेगळें ठेवण्यांत येतें व खरेदी केलेल्या बिलांचे खात्यांतून तीं अशा खात्यांत वर्ग केलीं जातात.

पुष्कळशीं निर्यातबिलें हीं वटवण्यासाठींच बँकांकडे येतात; मग ते वटवणें हमीपत्राखालीं होईल अथवा खरेदी करून होईल. ही सर्व बिलें हाताळण्याची पद्धत बहुशः एकच असते. हमीपत्राखालीं नसलेल्या व वसुलीला पाठवलेल्या ( त्यांत पाठवणाऱ्या बँकेनें खरेदी केलेल्या बिलांचाही अंतर्भाव होतो ) बिलांची तपासणीही वर अन्यत्र उल्लेखिलेल्या प्रकारानेंच होत असते ह्मणूनच त्यांची थोडी चर्चा इथें केलेली आहे. त्याशिवाय त्यांचेबद्दल जास्त माहिती 'वसुलीचीं बिलें' या पुढील प्रकरणांत दिलेली आहे.

## वसुलीचीं बिलें ( Bills for collection )

१४

कुठल्याहि व्यापाऱ्याने माल आयात करायचा ठरवलें तर त्याला चार पद्धतीनें निर्यातदाराबरोबर करार करता येतो. पहिल्या पद्धतींत निर्यातदार आयातदारावर संपूर्णपणें विश्वास टाकतो व निर्यातीचे दस्तऐवज त्याच्याकडे पाठवून देतो. मग आयातदार माल सोडवून घेतो आणि तो विकून निर्यातदाराकडे पैसे पाठवून देतो.

दुसऱ्या पद्धतींत आयातदाराची माहिती नसल्यामुळे जर विक्रेता पूर्ण विश्वास ठेवायला तयार नसेल तर तो माल निर्यात करतो आणि दस्तऐवजी बिल आपल्या बँकेकडे वसुलीसाठीं पाठवतो. ती बँक हे कागदपत्र आयातदाराच्या बँकेकडे, त्याच्याकडे दाखल करण्यासाठीं पाठवते; व आयातदार पैसे भरून मालाचे दस्तऐवज बँकेतून सोडवून घेतो. या पद्धतींत पैसे आगाऊ भरायला न लागल्यानें आपल्याला धोका नाहीं, ह्याचें आयातदाराला समाधान लाभतें आणि निर्यातदाराला आपले पैसे फार दिवस अडकले नाहींत याची खात्री वाटते. आयातदारानें जर कागदपत्र सोडवून घेतले नाहींत तर निर्यातदाराला माल परत मागवून घेण्याची शक्यता असते व त्यासाठीं लागणाऱ्या खर्चाव्यतिरिक्त त्याचे फार मोठें नुकसान ( माल नाशवन्त नसेल तर ) होत नाहीं. पण या पद्धतींतही हुंडी ( बिल ) देखाड होऊन बँकेला पैसे मिळेपर्यंत व दुसऱ्या देशांतून ते स्वतःच्या देशांत येईपर्यंत निर्यातदाराला पैशांची चणचण भासतेच. कारण निर्यात केलेल्या मालाच्या उत्पादनासाठीं किंवा पुरवठा करण्यासाठीं त्याला प्रथम खर्च करावाच लागतो.

निर्यातदार जर चांगल्या पतीचा, सचा व अब्रूदार असेल व बँकेला त्याच्या सचोटीविषयीं शंका नसेल तर मात्र त्या बिलांवर

तो बँकेकडून कर्ज घेऊन परत पुन्हां माल विकत घेण्यास किंवा निर्माण करण्यास लागणारें भांडवल उभें करतो. या पद्धतींत त्याला सुरक्षितता असते पण भांडवल मोकळें करण्यासाठीं व्याज द्यावें लागतें. कदाचित् याचा अंदाज करून त्यानें वाढत्या किंमतीद्वारा तो खर्च गिऱ्हाइकावर ढकलला असेल तर ठीकच. नाहींतर ही रक्कम त्याच्या फायद्यांतून जाते व याला तो सर्वसाधारणपणें नाखूष असतो. ही तिसरी पद्धत होय.

चौथी पद्धत म्हणजे आयातदाराकडून संपूर्ण रक्कम विसार घेऊन मग दस्तऐवज पाठवणें हा होय. पण याला आयातदार नाखूष असतो.

वरील चारी पद्धतींशिवाय एका अन्य पद्धतीचा अवलंब करून निर्यातदार आपले गुंतलेले पैसे मोकळे करून घेऊं शकतो व व्याज वगैरेचा खर्चही आयातदारावर टाकूं शकतो. ती पद्धत म्हणजे आयातदाराला आपल्या विक्रीबाबतच्या अटी कळवून त्या समाविष्ट करणारें एक हमीपत्र त्याच्या बँकेमार्फत किंवा ज्या बँकेची निर्यातदाराला खात्री आहे अशा बँकेमार्फत उघडावयास सांगणें. असें हमीपत्र उघडल्यावर माल निर्यात झाल्यावर त्याचे कागदपत्र बँकेला देण्याची जबाबदारी विक्रेता स्वीकारतो व हे कागदपत्र मिळाल्यावर त्याची रोख रक्कम देण्याची जबाबदारी आयातदार आपल्या बँकेमार्फत अप्रत्यक्षपणें स्वीकारतो. प्रत्यक्षतः ही हमी त्या बँकेची असते पण आयातदार 'मी ते कागदपत्र स्वीकारीन' अशी कबुली देतो म्हणूनच बँकदेखील असें हमीपत्र उघडते. म्हणजेच ती खऱ्या अर्थानें शेवटीं आयातदाराचीच जबाबदारी ठरते. अर्थात विक्रेता आपल्याकडून जशा अटी घालतो तशाचप्रमाणें आपल्या संरक्षणासाठीं वा खात्रीसाठीं आयातदारही आधीं ठरवून आपल्या अटी हमीपत्रांत घालूं शकतो. हमीपत्राची स्वतंत्र माहिती त्यासंबंधीच्या प्रकरणांत दिली आहे. येथें फक्त हमीपत्राऐवजीं बिल वसुलीला पाठवण्याचे पद्धतीचा अवलंब केला जातो त्याचाच उहापोह केलेला आहे. कारण हमीपत्रानंतर पहिल्या व चौथ्या पद्धतीपेक्षां हीच पद्धत जास्त प्रमाणांत व्यवहारांत अंमलांत आणली जाते.

बिलांचा व्यवहार हा दोन प्रकारचा असतो. आयात बिलांचा किंवा निर्यात बिलांचा. प्रथम आपण आयात बिलांचा विचार करूं. भारतांतील निर्यातदार ज्याप्रमाणें परदेशांत बिलें वसुलीला पाठवतो त्या प्रमाणें भारतीय आयातदारावरही परदेशांतून अशीं बिलें वसुलीसाठीं येत असतात. अशी आयातबिलें दोन प्रकारचीं असूं शकतात (१) रुपयांत काढलेलीं व (२) अन्य विदेशी चलनांत काढलेलीं. आयातदार व निर्यातदार यांचा ज्याप्रमाणें विक्रीकरार झालेला असतो त्याप्रमाणेंच अर्थात अशीं बिलें काढलीं जातात. असें बिल काढतांना आयातदारानें आपली बँक कुठली आहे ते जर निर्यातदाराला कळवलेलें असले तर त्या बँकेमार्फत—विशेषतः ती जर विदेशविनिमयाचा व्यवहार करणारी अधिकृत बँक असेल तर तिच्यामार्फत—तें बिल त्याला देखाड होण्यासाठीं पाठवलें जातें. अशी बँक कळवलेली नसल्यास बिल पाठवणारी बँक आपल्या परदेशांतील प्रतिनिधीकडे तें पाठवते व ती बँक तें प्रत्यक्ष किंवा अन्य बँकेमार्फत आयातदाराला देखाड करतें. असें बिल आलें आहे याची माहिती देतांना बँका, तें कुणी काढलें आहे, कुठल्या बँकेमार्फत आलें आहे, (सर्व बँका परदेशांतील बँकेचें नांव कळवतातच असें नाहीं) किती रकमेचें आहे व त्याचे त्या दिवशीं स्वदेशी चलनांत किती रूपांतर होतें, तें कुठल्या मालासाठीं आहे व तो कुठल्या बोटीनें रवाना झाला आहे व त्यासाठीं पोस्टेज व वेगवेगळ्या बँकांचे किती आकार द्यावयाचे आहेत हें कळवते.

बँकेकडून अशी माहिती मिळाल्यावर विक्रीकराराप्रमाणें सापेक्षतः तरी योग्य माल पाठवला गेला आहे याची खात्री मिळतांच हुंडी दर्शनी असल्यास भारतीय आयातदारानें आपला आयातपरवाना (विनिमय-नियंत्रण प्रत) योग्य त्या नोंदीसाठीं बँकेकडे हजर करावा लागतो व त्याचबरोबर विदेशी चलन खरेदी करण्यासाठीं भारतीय विनिमय नियंत्रणान्वयें लागणारा 'A' किंवा SA1 किंवा A 7 फॉर्म भरून द्यावा लागतो. असा परवाना असेल तर व त्यावर बिलाची रक्कम मांडण्यासाठीं शिल्लक असेल तर च आलेल्या आयातीसाठीं तो वैध असेल तर अधिकृत बँक स्वतःचे अधिकारांत तत्संबंधी आवश्यक तें परकीय चलन विकूं शकते व ती रक्कम बिल

पाठवणाऱ्या बँकेच्या सूचनेप्रमाणें (अ) तिच्या अगर अन्य बँकेच्या खात्यात जमा करते किंवा (ब) ड्राफ्ट, टेलिग्राफिक ट्रॅन्स्फर, मेल ट्रॅन्स्फर वगैरे पद्धतीनें बिल पाठवणाऱ्या बँकेकडे किंवा तिच्या दुसऱ्या बँकप्रतिनिधीकडे पाठवून देते. हा व्यवहार सकृद्दर्शनीं सोपा वाटतो पण भारतीय आयातदार असें बिल लगेच सोडवून घेतोच असें नाहीं बरेच वेळा तो बोट येईपर्यंत थांबतो. कित्येकदा काहीं कारणामुळें माल उशीरा पाठविला गेला असल्यास आयात परवान्याची मुदत संपून गेलेली असते व त्यावरील मुदत वाढवण्यासाठीं तो परत व्यापारनियंत्रण कचेरीकडे पाठवलेला असतो कित्येकवेळा मालाचें वर्णन चुकीचें दिलेलें असतें किंवा मागितलेल्या कागदपत्रांपैकीं काहीं कागदपत्र निर्यातदारानें पाठवलेलेच नसतात अशा वेळीं हे सर्व अडथळे दूर झाल्याखेरीज बिलाची वसुली होत नसते पण या सर्व बाबींची वेळोवेळीं परदेशीं बँकेला माहिती देणें भारतातील अधिकृत बँकेचें कर्तव्य ठरतें. केवळ बिलाचे पैसे भरले गेल्यावरच त्याची व्यवस्था करण्याऐवजीं अशी परिस्थिती वेळोवेळीं विदेशी बँकेला कळवल्यास तिची काळजी कमी होते.

कित्येकदा आयातदार बँकेच्या खात्रीचा असल्याने बँक बिल सोडवून घेण्यास त्याला परवानगी देते, व स्वत त्याचा भरणा परदेशी बँकेस करते. अशावेळीं तो माल | बिल आयातदाराच्या स्वाधीन करताना त्यामुळें निर्माण होणाऱ्या कर्जापोटीं बँक त्याचेकडून दर बिलाबाबत स्वतंत्र असें एक विश्वासपत्र (Trust Receipt) घेते. या विश्वासपत्राचा नमुना खालीं दिलेला आहे प्रसगाधारानें (Case of Need) कळवल्यास देखील बँक असें विश्वासपत्र घेऊन आयातदाराला बिल देऊ शकते

## विश्वासपत्राचा नमुना

या पत्राचे शेवटीं संदर्भ दिलेल्या व मेसर्स यानीं दिनाक च्या आमचेवर च्या रकमेच्या व . दिवसाच्या मुदतीच्या हुडीस तारण ह्मणून असलेले नाविक निर्यातपत्राचे दस्तऐवज आपण आमच्या स्वाधीन केल्याबद्दल व त्यापोटीं आमचेकडून - इतकी रक्कम बँकेस येणें असल्यामुळें आह्मी असा करार करतो कीं

( १ ) सदर निर्यातपत्रान्वये येणारा माल आह्मी सोडवून घेऊं, त्याची जकात भरूं व तो विक्री होईतों सुरक्षित, नीटपणें ठेवू तसेच त्याची विक्री आम्ही आपले प्रतिनिधि व विश्वस्त ह्मणून आपल्यासाठीं करूं. सदर मालाची विक्री होईपर्यंत तो माल व नंतर त्याचे पैसे यावर तुमची मालकी राहील. विक्री झाल्यावर|त्याचे पैसे आल्यावर त्याचा तावड-तोब आपणाकडे संपूर्णपणें भरणा करूं. त्यांतून आपणांस या विश्वास-पत्रापोटीं येणें असलेल्या रकमेपोटीं कितीही रक्कम जमा करून घेतां येईल. सदर माल व/वा त्याची विक्रीरक्कम यांची, आमचे पुस्तकांतही बँकेची मालकी असल्याखालींच नोंद होईल. तसेच बँकेच्या लेखी संमतीखेरीज सदर मालाची विक्री उधारीवर केली जाणार नाहीं. तसेंच अशी उधार विक्री केल्यावरही त्याच्या वसुलीस बँक जबाबदार राहाणार नाहीं आणि सदर विश्वासपत्रान्वये येणें असलेली रकम भरण्याची जबाबदारी आमचीच राहील व ठरलेल्या मुदतीपूर्वीं त्या रकमेचा भरणा आह्मी विनातक्रार करूं. त्याबाबत, उधारविक्रीची रक्कम आली नाहीं वगैरे सबबी सांगणार नाहीं.

( २ ) तुमची इच्छा असेल तेव्हां विकल्या न गेलेल्या मालाचा ताबा तुह्मांस ( तुमच्या मालकीचा व विश्वस्त ह्मणून आह्मी सांभाळलेला ) विना-तक्रार, मागाल तेथें, आमचे खर्चानें देऊं. तसेंच तत्पूर्वी कोणत्याही वेळेला बँकेच्या अधिकाऱ्यांना, तपासनीसांना वा बँकेनें मुखत्यारपत्र दिलेल्या व्यक्तींना सदरपैकीं न विकलेला शिल्लक माल असेल तिथें मालाची तपासणी करण्याचा व आमचीं पुस्तकें बघण्याचा व त्याचा ताबा घेण्याचा अधिकार व हक्क राहील.

( ३ ) या विश्वासपत्रान्वयें आमचेकडे असणारा माल आह्मी आमच्या अन्य मालापासून वेगळा व सुस्थितींत ठेवूं. तसेंच सदर मालावर तुमची मालकी असेपर्यंत त्याच्या गुदामाचें भाडें वगैरे वेळेवर भरूं व त्याचा बोजा त्या मालावर व बँकेवर पडूं देणार नाहीं. विश्वासपत्रान्वयें ताब्यांत घेतलेल्या मालाचा आह्मी आग आणि बँक सांगेल त्या अन्य धोक्यावद्दलचा

मालाचे पूर्ण किंमतीइतका विमा उतरवूं, व त्याचा संरक्षणाकार आम्ही भरूं. तसेच त्याबाबतचें काढलेलें विमापत्र व त्यायोगें येणारी रक्कम यावर देखील आपले प्रतिनिधी ह्मणूनच आमचा ताबा राहील, व विमापत्र वा ती रक्कम बँक सांगेल त्याप्रमाणें, त्यावेळीं विनातक्रार, तिच्या नावाने वर्ग करूं.

( ४ ) या विश्वासपत्रान्वये घेतलेला माल व त्याबद्दलच्या वेळोवेळीं देणें असलेल्या रकमा यांचा व्यवहार, अन्य विश्वासपत्रान्वये असलेला माल व रकमा यांच्या व्यवहाराहून स्वतंत्र, व वेगळा राहील, तसेंच या पोटीं आह्माला मिळालेला माल व क्रेडिट हें सर्वसाधारण क्रेडिट समजलें जाईल व तें केव्हांही कारणे न सांगतां नाकारण्याचा तुह्माला अधिकार राहील. तसेंच तुह्मी आम्हास केव्हांही नोटीस दिल्यावर अशी नोटीस तुह्मास शेवटीं माहीत असलेल्या आमच्या पत्त्यावर पोस्टानें पाठवली किंवा हातपोचीनें दिली तरी ती मिळाली असें समजलें जाईल. या विश्वासपत्रान्वयें येणें असलेली सर्व रक्कम आह्मी व्याज, खर्च व सर्व आकार यासहित मागाल तेव्हां तावडतोब भरू. या विश्वास पत्रान्वये येणें असलेली रक्कम चुकती केल्यावर राहिलेला माल, उधार-विक्री, येणे, कुठलाही व्हावयाचा वसूल व खात्यांत शिल्लक राहिलेली असल्यास त्यावर आमची मालकी राहील.

या विश्वासपत्रांत संदर्भ असलेल्या मालाचा तपशील.

| हुण्डी क्रमांक | हुंडी, बीजकाचा दिनांक व रक्कम | हुंडीची पैसे भरण्याची मुदत | जहाजाचें नाव | निर्यात खुणा | मालाचें वर्णन |
|---|---|---|---|---|---|
| | | | | | |

आपले विश्वासू

आयात बिलाबाबत भारतीय आयातदाराला किंवा ते देखाव करणाऱ्या अधिकृत बँकेला फारसे सोपस्कार करावे लागत नाहींत. विशेषतः जेव्हां विक्रेत्याचा बाजार असतो व आयातदारानें आपण होऊन माल मागितलेला असतो तेव्हां कागदपत्रांत तांत्रिक दोष असले तरीही ते स्वीकारले जातातच. बँकेकडून बिल आल्याची सूचना येतांच रोख रकम, किंवा ती खात्याला नांवें टाकण्याचें पत्र, चलन खरेदीचा फॉर्म व आयात परवाना दिला कीं काम भागतें.

## निर्यात बिलें :

भारतीय निर्यातदाराला मात्र बिल पाठवतांना बऱ्याच तांत्रिक बाबींची माहिती असावी लागते. त्या बाबी काय आहेत याचा विचार या पुढे केलेला आहे. भारतांतून जाणारें निर्यात बिल हें परदेशांतील आयात बिल ठरते. त्यामुळें निर्यात बिलाबाबतची माहिती आपल्याकडे परदेशांतून येणाऱ्या निर्यातबिलांचें म्हणजेच भारतांतील आयातबिलाचे संदर्भांतही जिथे लागू होणे शक्य असेल तिथे ती अधिकृत बँकेसाठीं वा आयातदारासाठीं लागूं होऊं शकते म्हणून त्याची द्विरुक्ती वर आयातबिलाबाबलची माहिती देतांना केलेली नाहीं, व ती निर्यात बिलाच्या खालील माहितींतच समाविष्ट आहे.

भारतीय निर्यातदार जेव्हां माल निर्यात करतो तेव्हां त्यानेंही बहुतांशी विक्रीकरार केलेलाच असतो; व तशा कराराप्रमाणें माल निर्यात करून त्याला मिळणारें नाविक निर्यातपत्र, विमापत्र वगैरे दस्तऐवजांसह तो आयातदारावरील आपली हुंडी अधिकृत बँकेकडे वसुलीसाठीं देतो. (अशा दस्तऐवजी हुंड्या हे एक उत्कृष्ट तारण समजण्याची जगमान्य रूढी असल्यानें त्या बहुतांशी बँकांकडून वटवल्याही जातात.) असे कागदपत्र देतांना केवळ हातांत आलेले कागदपत्र बँकेकडे देऊन त्याची जबाबदारी संपत नाहीं. कारण बँक ही फक्त तें बिल आपल्या प्रतिनिधींकडे पाठवण्याचें काम त्याचेसाठीं करीत असते व ऋणकोकडून पैसे आले तरच ते निर्यातदाराला मिळावयाचे असतात. तेव्हां तें बिल ऋणको किंवा

आयातदार लगेच सोडवून कसे घेईल हें वघणें हें हुंडी पाठवणाऱ्याचें कर्तव्य असतें व त्या दृष्टीनें दस्तऐवजी हुंडी पाठवतांना महत्त्वाचे असे सर्व दस्तऐवज नीट पाठवणें व बिलाच्या विल्हेवाटीच्या वा वसुलीच्या संपूर्ण सूचना देणें या गोष्टी त्याला कराव्या लागतात.

( १ ) कुठल्याही दस्तऐवजी बिलांत सर्वसाधारणपणें ( अ ) बीजक ( ब ) नौनिर्यातपत्र, ( क ) विमापत्र व ( ड ) हुंडी इतके महत्त्वाचे कागद आयातदाराकडे पाठवण्यासाठीं आपल्या बँकेकडे द्यावयाचे असतात. यांतील हुंडी ही दर्शनी किंवा मुदतीची असूं शकते. हुंडी जर मुदतीची असेल तर ती आयातदारानें स्वीकारल्यानंतर म्हणजे देणें मान्य केल्यानंतर आयातदाराला बाकीच्या कागदपत्रांची ताबेदारी द्यावयाची कीं काय ( Documents against acceptance ) त्याचा खुलासा करावा लागतो. हुंडी मुदतीची असून जर ती मान्य केल्यानंतरही अशी कागदपत्रांची ताबेदारी द्यावयाची नसेल तर, हुंडीची मुदत भरण्याचे आंत माल बंदरांत आल्यास त्याची सांठवण्याची काय सोय करावयाची, विम्यावद्दल काय करावयाचें यावद्दल बँकेस सूचना द्याव्या लागतात. याखेरीज वसुली करणाऱ्या बँकेला खालील बाबतींतही सूचना द्याव्या लागतात.

( २ ) आयातदारावर बिल काढतांना, विक्रीकराराचे वेळीं वा अन्यवेळीं खरेदीदारानें त्याची बँक कुठली याचा संदर्भ दिला असल्यास वा अमुक एका बँकेमार्फत बिल पाठवावें असें सांगितलें असल्यास त्या विशिष्ट बँकेमार्फत बिल पाठवण्याची सूचना निर्यातदारानें आपल्या बँकेला दस्तऐवजावरोबर द्यावी लागते. निर्यातदारानें अशा बँकेचें नांव दिल्यास मग त्यामुळें होणाऱ्या कुठल्याहि परिणामाला, वसूल करणारी बँक जबाबदार रहात नाहीं. अशी विशिष्ट बँक जर सांगितली गेली नसली तर वसूल करणाऱ्या बँकेला तें बिल, तिला योग्य वाटेल त्या प्रतिनिधी बँकेकडे पाठवण्याची मुभा मिळते. अर्थात असा प्रतिनिधी निवडतांना तिच्या पतीवद्दलची व स्थैर्यावद्दलची, बिल वसूल करून घेणारी बँक खात्री करून घेत असतेच. पण तरीसुद्धां या बाबतींत, बँकेच्या परदेशांतील

बँकेस बिल न पोंचल्यास किंवा त्या बँकेकडून निष्काळजीपणा, उशीर, गफलत वगैरे झाल्यास किंवा ती बँक बुडाल्यास वा तिच्या वागणुकीमुळें निर्यातदाराला वसुली वेळेवर न मिळाल्यावर या कुठल्याहि तऱ्हेचें नुकसान सोसावें लागल्यास, बिलें वसूल करणारी बँक त्यास जबाबदार रहाणार नाहीं असें ती बँक, बिल वसुलीसाठीं स्वीकारताना निर्यातदाराला कळवतेच.

( ३ ) अशी परदेशातील वसुलीची बँक कुठली असावी या सूचना दिल्यानंतर बँकांच्या या व्यवहारासंबंधीच्या आकारासंबंधीही निर्यातदाराला स्पष्ट सूचना द्याव्या लागतात. कुठल्याहि बिलासाठीं तें पाठवणारी बँक ज्याप्रमाणें काहीं आकार लावते त्याचप्रमाणें अन्य देशांतील बँकही बिलाच्या वसुलीच्या कामगिरीबद्दल आपला आकार लावते. विदेशविनिमयाच्या व्यवहारांच्या बाबतींत असे आकार बरेच खर्चाचे असल्यानें त्यावाबत बिल वसुलीस देतांना खातेदारानें नीट सूचना न दिल्यास आयातदार व निर्यातदार यांच्यांत गैरसमजूत होते किंवा आयातदार व निर्यातदार यांची बिल वसूल करणाऱ्या बँकेबरोबर कुरबुर होते. जर कुठलीही सूचना नसेल तर परदेशातील आकार आयातदाराकडून घ्यावा असें कळवून, बिल पाठवणारी बँक आपला स्वतःचा आकार निर्यातदाराच्या वसुलींतून कापून घेते किंवा वेगळा लावते; किंवा काहीं वेळेला दोन्हीही आकार आयातदाराकडून घेण्याची प्रथा काहीं बँका स्वीकारतात. आयातदाराला तें मान्य नसेल तर तो बिल वेळेवर सोडवीत नाहीं व नंतर होणाऱ्या पत्रव्यवहारामुळें कदाचित् मालावर विलंबदंड ( Demurrage ) बसण्याचा किंवा तो नाशवंत असल्यास त्याची खराबी होण्याचा प्रसंग ओढवतो व त्याच्या जबाबदारीचे वाद निघून व्यवहार जास्तच गुंतागुंतीचा होऊन बसतो. आपल्याशीं व्यवहार करणारी व्यक्ति शेंकडों मैलावर दूर आहे हें ध्यानात घेऊन दोन्ही आकार आयातदाराकडून घ्यायचे का त्याचे देशांतील आकारच फक्त त्याचे कडून घ्यावयाचे का यापैकीं कांहींही द्यावयाचे त्यानें नाकारल्यास त्याची सूट द्यावयाची का सर्वच म्हणजे दोन्हीं बँकांचे आकार वसुलींतून कापून घ्यावयाचे अथवा निर्यातदाराचे खातीं वेगळे नावें टाकावयाचे याचे खुलासे बिल देतानाच

निर्यातदारानें केले तर नालापायीं थोडा गमावण्याची वेळ त्याचेवर येणार नाहीं. या बाबतचा खुलासा त्यानें शक्यतो आधींच आयातदाराशीं विक्री-करार करताना किंवा अन्य पत्रव्यवहाराचे वेळीं केलेला असल्यास एकमेकात गैरसमज व निष्कारण पत्रव्यवहार होत नाहीं व पर्यायानें बिलाच्या वसुलीस दिरंगाई होत नाहीं. कित्येकदा अशा दिरगाईपायीं त्या रकमेवर, हुडी वटवलेली असल्यास किंवा तीवर ओव्हरड्राफ्ट घेतलेला असल्यास बरेंच व्याज पडते हें आयातदारानें विसरू नये.

( ४ ) वसुलीसाठीं उपयोगात आणावयाची बॅक व तिचा आकार व आपल्या बॅंकेचा आकार यासबधींच्या सूचनाखेरीज आणखीही काहीं सूचना निर्यातदाराला आपल्या बॅंकेला द्याव्या लागतात. बिल वसूल झाल्यानतर त्याचे पैसे कसे द्यावयाचे यासबधीची सूचना ही त्यातली महत्त्वाची समजली जाते. बहुताशीं निर्यातदार जिथें वसुलीसाठीं बिल देतो त्या बॅंकेत त्याचें खाते ठेवीतच असतो, व ती रक्कम आपल्या खात्यातच जमा करण्याची सूचना देतो. बॅकाही सर्वसामान्यपणें आपल्या खातेदारासाठींच असा व्यवहार करतात. पण खातें नसल्यास असा व्यवहार न करण्याचे बंधन किंवा अशा व्यवहारासाठीं खातें ठेवण्याचें खातेदारावरही बधनकारक नाहीं. त्यामुळें बिलाचा वसूल दुसऱ्या ठिकाणीं किंवा दुसऱ्या बॅंकेच्या वेगळ्या शाखेंत जमा करण्याची सूचना देता येते. किंवा बॅंकेच्या खात वरील चेकने / ड्राफ्टनें अशी रक्कम पाठवण्याचीही सूचना देता येते. अशी रक्कम अन्यत्र तारेनें जमा करावयाची असेल तर तारखर्च किंवा ड्राफ्ट वगैरे रजिस्टर पोस्टानें पाठवायचा असेल तर टपालखर्च कापून घेऊन बॅंक त्याप्रमाणें रक्कम पाठवते किंवा जमा देते.

( ४ ) कित्येकदा निर्यातदाराकडून आलेली हुडी दर्शनी असली व बॅंकेनें आयातदाराला ती देखाड केली तरी तो तिचे पैसे लगेच भरतोच असें नाहीं. विशेषत माल ज्यावेळेला दूरवर पाठवला जातो त्यावेळेस अशी परिस्थिति उद्भवते. हिंदुस्थानातून इग्लडमध्यें जर माल पाठवला गेला तर तो पोचायला कदाचित् एकवीस दिवस लागतील. पण त्याचे कागदपत्र

मात्र लंडनच्या बँकेंत पांचसहा दिवसांत जाऊं शकतील. अशावेळेला रकम मोठी असेल तर आयातदार कागदपत्र लगेच सोडवण्याऐवजीं बोट बंदरांत येईपर्यंत थांबतो. त्यायोगें तो आपलें भांडवल अडकवीत नाहीं किंवा निष्कारण बँकेच्या कॅशक्रेडिट खात्यांत व्याज भरीत नाहीं. व्याजाचा दर नऊ टक्के असेल तर पन्नासहजार रुपयांच्या मालाचें असें वीसएक दिवसांचें व्याज अडीचशे रुपये होऊं शकतें व ही रकम तो वाचवण्याचा प्रयत्न करीत असल्यानें हुंडी देखाड झाली तरी कागदपत्र बोट आल्यावर सोडवीन असें सांगतो. कित्येकदां केवळ हे दोनच उद्देश अशी हुंडी न भरण्यांत असतात असें नसून मालाचा नमुनाही बघावेसें वाटल्यामुळें प्रत्यक्ष नमुना बघितल्यावर तो दस्तऐवज सोडवून घेतो. याबाबतच्या स्पष्ट सूचना बँकेला नसल्यास कागदपत्र देखाड झाल्यावर आयातदाराने वरील कारणें पुढें केल्यास बँकाबँकांत व दोन्ही व्यापाऱ्यांत निष्कारण पत्रव्यवहार सुरू होतो. बिलाची वसुली बोट येईपर्यंत थांबवली तरी चालेल किंवा हुंडी मुदती (किंवा दर्शनी) असली तरी बोट आल्यावरच ती देखाड करावी अशी स्पष्ट सूचना द्यावः याची असल्यास निर्यातदारानें ती आधींच दिली तर हा पत्रव्यवहार टाळतां येतो.

(५) कित्येकदां कांहीं अन्य कारणामुळें आयातदार माल सोडवून घेण्याची टाळाटाळ करीत आहे असें दिसून आलें तर आणखी कांहीं शंगापत्ती ओढवत असतात. हल्लीं विदेशव्यवहार जरी हवाई मार्गानें होत असला तरीही पत्रव्यवहारांत दर वेळेला तीनचार दिवस जाऊं शकतात. तसेच निष्कारण दर वेळेला वेगळ्या कारणासाठीं असा उलटसुलट पत्रव्यवहार होत राहिला तर बोट बंदरांत पोचून माल तसाच कुणीही काळजी न घेतां पडून राहूं शकतो. माल जर नाशवंत प्रकारांतला असेल, त्यांवर हवापाणी किंवा कीड यांचा दुष्परिणाम होण्याची शक्यता असेल तर आणखीच गुंतागुंत वाढते. एका बिलांत तर गहूं पाठवला गेल्यानंतर त्याची हुंडी अशीच लोंबल्यामुळें तो पावसांत भिजून त्याचें दुसरें पीक उभे राहण्याची पाळी आली होती असें विनोदानें सांगण्यांत येते. अशा प्रकारें मालापरी माल आणि पैशापरी पैसा जाऊं नये म्हणून

बिल सोडवलें न गेल्यास माल बँकेनें सोडवण्याची व गुदामात ठेवण्याची व्यवस्था करायची आहे कीं नाहीं याबाबतची सूचना माल जास्त किंमतीचा किंवा नाशवत असल्यास, तसेच आयातदाराची फारशी माहिती नसल्यास, देणें इष्ट ठरतें. त्याचप्रमाणे अशा मालाची पहिली विमापॉलिसी ठराविक मुदतीनंतर संपत असल्यानें पुढील मुदतीचा विमा उतरवण्याची सूचनाही त्याचबरोबर बिल वसूल करणाऱ्या बँकेला द्यावी लागते. अशा माल सोडवणुकीचा खर्च व विम्याचा खर्च ( आयातदाराकडून वसूल करता न आल्यास ) निर्यातदाराच्या अंगावर पडत असला तरी 'सर्वनाशे समुत्पन्ने अर्धं त्यजति पण्डित' या न्यायानें, तो खर्च सोसणें हितावह ठरतें. विशेषत विनिमय-नियंत्रणामुळे निर्यातदारावर त्या निर्यातीच्या पैशाचा हिशेब देण्याची किंवा नियंत्रणाच्या इच्छेप्रमाणेंच मालाची विल्हेवाट लावण्याची जबाबदारी असल्यानें याबाबतची योग्य काळजी आधींच घेणे योग्य ठरतें.

वसुलीसाठीं पाठवलेली दस्तऐवजी हुंडी सोडवली न गेल्यास, किंवा त्या पोटीं असलेला माल सोडवून बँकेने गुदामात ठेवल्यावर तो वेळेवर सोडवला न गेल्यास त्याबाबत आयातदाराचें काय म्हणणें आहे तें लगेच समजून घेऊन निर्यातदारानें पुढील हालचाली केल्यास बिलाची वसुली सुकर होऊ शकते. किंत्येकदा विक्रीकरारानुसार कागदपत्र नसल्यास, आकार आणि खर्च याबद्दल स्पष्ट खुलासे नसल्यास, त्याबाबतच्या आयातदाराच्या अडचणी, इच्छा समजून घेऊन त्यातले काहीं मान्य करावयाचें असल्यास बँकेला तसें सांगणें इष्ट ठरतें. मात्र अशा गुंतागुंतीच्यावेळीं काहींवेळा निर्यातदार परस्पर परदेशातील बँकेला सूचना देतात तें चुकीचें असतें. ज्या बँकेकडून तें बिल पाठवलें गेलेलें असतें तिच्याच सूचनेनुसार फक्त वागण्यास ती परदेशातील बँक बांधलेली असल्यानें अशा सूचना आपल्या वसुलीसाठीं निवडलेल्या बँकेसच निर्यातदारानें द्यावयाच्या असतात वरीलप्रमाणें परस्पर सूचना दिल्यास वेळ न वाचता कालापव्ययच होतो. कारण ती बँक, त्याबाबतची चौकशी, बिल पाठवणाऱ्या बँकेकडे परत करते व ती बँक त्याबाबतचा खुलासा आयातदाराकडून मागवते व तो प्रतिनिधीस कळवते.

(६) वरील उपायांपैकीं कांहींही होऊं न शकल्यास व बिल तसेंच अडकून राहिलेलें असल्यास व किलेकदां दुसरी ऑर्डर असल्यास त्या मालाची जरुरी असलेल्या त्या दुसऱ्या खरेदीदारास तें बिल द्या असें सांगतां येतें, किंवा स्वतःचा प्रतिनिधि वा शाखा परदेशीं असल्यास बिल सोडवण्याची परवानगी देऊन त्याच्या । तिच्या ताब्यांत माल देणें हितावह असतें. तेव्हां अशा व्यक्ति किंवा संस्थेचें नांव 'अडचणीच्या प्रसंगांतला आधार' (Drawee in Case of Need) म्हणून आधींच द्यावें. अर्थात् हें प्रत्येक निर्यात्-दारालाच शक्य असतें असें नाहीं. पण ज्यांना शक्य असतें त्यांनीं अशा प्रसंगाधाराचें नांव जरूर द्यावें. तसेंच त्याला काय अटींवर बिल वा माल द्यावयाचा, मूळ आयातदाराकडून वसूल करण्याची जी रक्कम आहे ती घेऊनच कागदपत्रांची मालकी द्यावयाची कां कांहीं कमी रक्कम घ्यावयाची, कां कांहींही रक्कम न घेतां दस्तऐवज हवाली करावयाचे, हेंही बिल वसुलीला देण्याचे वेळींच सांगावें. कांहींवेळां त्याला कागदपत्र देण्याऐवजीं, वसुली-करणाऱ्या बँकेनें त्याच्या सूचनेनुसार संपूर्णपणें विनाअट (Unreserved) वागावें अशी विनशर्त मंजुरीही देऊन, वसुलीचें काम निर्यातदार बरेंच सुकर करतो व वेळ व मालाची नासाडीही थांबवतो. अर्थात हें सर्व निर्यातदार व त्याचा प्रसंगाधार यांच्या, परस्पर संबंधावर व विश्वासावरच अवलंबून असतें.

**प्रसंगाधार** (Drawee in Case of Need):

प्रसंगाधारा (Drawee in Case of need) ला मूळ मालक अनेक प्रकारें अधिकार देऊं शकतो; व असे अधिकार खालीलप्रमाणें सुमारें दहा प्रकारचे असतात.

(१) आयातदारानें बिल सोडवून न घेतल्यास त्याची गांठ घेऊन तो तें सोडवील अशी खटपट करणें.

(२) आयातदाराला बिल सोडवण्यासाठीं कांहीं मुदत देणें.

(३) आयातदाराला योग्य वाटल्यास ठराविक टक्क्यापर्यंत सूट देणें, किंवा बँकेचे आकार वगैरेंची सूट देणें.

( ४ ) आयातदाराला बिल नुसतें सोडवून घेण्याची व पैसे हप्ताहप्त्यानें देण्याची सवलत देणें व अशी सवलत दिल्यास किंवा कांहीं मुदतीनंतर पैसे घ्यावयाचे असल्यास, तसें करणें.

( ५ ) त्याचेकडून मुदती हुंडी प्रॉमिसरी नोटेचे स्वरूपांत घेणें किंवा निर्यातदाराचे वतीनें त्यांवर नव्या मुदती हुंडया काढून त्या त्याचेकडून स्वीकारून घेणें.

( ६ ) आयातदार बिल सोडवत नसल्यास निषेधलेख घेणें किंवा अप्रदान, अस्वीकार नोंदणें.

( ७ ) आयातदाराकडून विश्वासपत्र घेऊन ( विक्रीनंतर तो वेळोवेळीं पैसे भरील अशा अटीचें ) दस्तऐवज विनामूल्य द्यावयास बँकेला सांगणें.

( ८ ) आयातदार बिल सोडवत नसल्यास तितकेच पैसे घेऊन दुसऱ्या आयातदाराला कागदपत्र देण्याची बँकेला सूचना देणें.

( ९ ) स्वतःच तितके पैसे भरून कागदपत्र सोडवून घेणें ( व माल सोडवून सुरक्षित ठेवणें ).

(१०) कागदपत्र बिनशर्त नि विनामूल्य आयातदाराला देण्यास बँकेस कळवणें किंवा स्वतः तसें तें घेणें.

यापैकीं कुठला अधिकार त्या व्यक्तीला द्यावयाचा आहे याची माहिती बिल वसूल करणारी बँक जरी निर्यातदाराकडून घेत असली तरी ज्यावर बिल काटलें जातें त्या आयातदाराला मात्र त्याची माहिती दिली जात नाहीं व निर्यातदाराचे हितसंबंध गुप्त व सुरक्षित ठेवले जातात. अशा सूचनांप्रमाणें वसुली करणाऱ्या दोन्ही बँका वागल्यास अर्थातच बिल पाठवणारी बँक तशाबद्दलचें पत्र परकीय बँकेकडून मागवतें व बिलाची विल्हेवाट कशी लावली गेली तें निर्यातदाराला कळवते व मग तिची त्या बिलाबाबतची जबाबदारी अर्थातच संपते.

( ७ ) असा कुणीही आधार नसल्यास, बिलाची वसुली होऊं न शकल्यास व तें अप्रदत्त ( Unpaid ) राहिल्यास निर्यातदाराला दुसरे उपाय योजावेच लागतात. त्यांतला आणखीं एक उपाय म्हणजे असें बिल अप्रदत्त

झाल्याचे नोंदणें किंवा त्याबद्दल निषेधलेख ( Protest ) घेणें अशी नोंद किंवा निषेधलेख, पुढें कोर्टकचेरी करणे झाल्यास पुरावा म्हणून सादर होऊ शकते | शकतो. अर्थात अनेक देशातून याबद्दल वेगवेगळे नियम असतात व निषेधलेख घेण्याचा खर्चही पुष्कळदा जबर असतो. पण बिल वसूल न झाल्यास त्याची काहींतरी विल्हेवाट लावणें आवश्यक असतेच. कित्येकदा अशा निषेधलेखाच्या धमकावणीनेंही, आयातदार ( उगीचच टगळमगळ करीत असल्यास ) वठणीवर येऊन बिल सोडवून घेण्याची शक्यता असते. परदेशात कोर्टकचेरी करणें अर्थात खूपच खर्चाचे व त्रासदायक असतें व सहसा अशा मार्गापर्यंत कुणी जात नाहीं. पुष्कळदा तो अव्यवहार्य म्हणून सोडूनच द्यावा लागतो तेव्हा अशा परिस्थितीमुळे निषेधलेखाची मधली परिस्थिती स्वीकारून थोडासा दडमार्ग स्वीकारणे व त्याचा परिणाम बघणें श्रेयस्कर ठरत असतें. वसुलीच्या बिलाबाबत अशी नोंद किंवा निषेधलेख घ्यायचा कीं नाहीं हेंही, ज्याना सारखा निर्यातीचा व्यवहार करावयाचा असतो त्यानीं सांगणें बरें असतें.

( ८ ) नाविक दस्तऐवजातील मूळ कागदपत्र हे आयातदाराकडे शक्य तितक्या लौकर पोचवण्यासाठीं, वसूल करणारी बँक अर्थातच हवाई मार्गानें पाठवते व त्याच्या द्वितीय प्रती वेगळ्या डाकेनें पण हवाई मार्गानेंच पाठवते. अर्थात् याचा खर्च निर्यातदारावरच पडत असतो पण द्वितीयप्रती जर सामान्य जलमार्गानें पाठवायच्या असतील तर तसें बँकेला कळवल्यास निर्यातदाराला थोडी काटकसर करता येते. आपण कुठले बिल वसुलीला पाठवलें आहे, त्यात कोणते कागदपत्र आहेत व बँकेला त्याबाबत कुठल्या सूचना आहेत याची संपूर्ण माहिती खुद्द निर्यातदारानेंही आपल्याजवळ नेहमीं ठेवावी व बिलवसुलीचे वेळीं ते पाठवणाऱ्या बँकेनें त्या बिलाला जो क्रमांक दिला असेल त्याचा संदर्भ कुठलाही पत्रव्यवहार करताना नेहमीं द्यावा म्हणजे व्यवहार सुकर होतो.

( ९ ) बिलाची रक्कम भरण्यास जर आयातदाराने वेळ लावला तर ते देखाड झाल्यापासून पैसे मिळेपर्यंत काही व्याज घ्यावयाचें असल्यास तें किती टक्यानें घ्यावयाचें आहे हेंही बिल वसुलीस देतेवेळीं निर्यातदारानें नमूद करावें

लागतें. नाहींतर असें व्याज बँका वसूल करीत नाहींत. आणि निर्यातदारानें नंतर त्याबाबत लिहिल्यास बँका कांहींही मदत करूं शकत नाहींत.

जरी आयातदारानें रक्कम भरली तरी त्या बँकेस बिल वसूल करणाऱ्या परकीय बँकेनें जर विदेशांतील दुसऱ्या ठिकाणावरचा ड्राफ्ट पाठवला असेल किंवा वेगळ्याच देशांतील दुसऱ्या बॅंकेंत अशी रक्कम मेल ट्रॅन्स्फरनें जमा होण्यासाठीं पाठवली असेल तर तो ड्राफ्ट परत वसूल होईपर्यंत किंवा त्या दुसऱ्या बॅंकेचा आदेश (Advice) येईपर्यंत मूळ बॅंक निर्यातदाराला रक्कम जमा देत नाहीं व निर्यातदाराला आयातदाराचा पैसे भरल्याचा आदेश स्वतंत्रपणें आला असल्यास तो मात्र बॅंक रक्कम जमा कां देत नाहीं याबद्दल बुचकळ्यांत पडतो. तेव्हां वरील कालावधीचीही त्याने जाणीव ठेवली तर त्याचा घोटाळा होऊं शकणार नाही.

भारतीय विनिमय नियंत्रणानें निर्यातदारावर जीं बंधनें घातलीं आहेत त्याचा, तिसऱ्या भागांत विनिमयनियंत्रणाचे संदर्भांत उल्लेख आहेच. बिल वसूल करण्यास देतेवेळीं भारतीय निर्यातदारानें त्याबद्दल माहिती घेणें व त्याप्रमाणें वागणें आवश्यक असतें. विशेषत: बिल वसूल होत नसल्यास विनिमयनियंत्रणाने जीं बंधनें घातलीं आहेत तीं विसरून चालणार नाहींत. एका व्यापाऱ्यावर काढलेलें बिल जर तो घेत नसेल तर प्रसंगाधाराकडून तें सोडवून घेण्याची व्यवस्था त्यानें शक्यतो करावयाची असते. निर्यातदाराचा असा कुणी प्रसंगाधार प्रतिनिधी नसेल तर त्या मालासाठीं परदेशांतच दुसरे गिऱ्हाईक गाठून पैसे येतील असें बघणें इष्ट असतें. असें कुणीच न भेटल्यास माल परत पाठवावा असेंच बॅंकेला कळवण्याखेरीज गत्यंतर नसतें. पण कित्येकदां अशा परत पाठवणीचा तत्पूर्वीं तो सोडवून गुदामांत ठेवण्याचाच खर्च त्याच्या येणें रकमेपेक्षां जास्त होतो. तेव्हां हा मार्गही स्वीकारणें शक्य नसतें. अशा कुठल्याच सूचना वेळेवर न दिल्यास व माल नाशवंत असल्यानें खराब झालेला असल्यास किंवा त्याचा अन्य वस्तूंवर दुष्परिणाम होत असल्यास किंवा त्यानें उगीचच जागा अडत असल्यास अनेक देशांतून तो कस्टम्सद्वारा नष्ट करण्याची पद्धत असते.

कांहीं ठिकाणीं असा माल नष्ट करण्यापूर्वी निर्यातदाराची परवानगी मागितली जाते. असा माल नाहींसा करण्याची परवानगी देण्यासाठींही भारतीय विनिमयनियंत्रणाची परवानगी घ्यावी लागते.

अधिकृत बॅंकेकडे ज्यावेळेला असे निर्यातबिल वसुलीला येतें तेव्हां बॅंक वरील सर्व प्रकारच्या ( आत्यंतिक उपायांखेरीज करून शेवटच्या ) सूचना निर्यातदाराकडून घेते व निर्यातदाराने जर विदेशांतील एखाद्या विशिष्ट बॅंकेकडेच बिल पाठवा म्हणून सांगितलें असेल तर त्या बॅंकेकडेच तें बिल वसुलीला पाठवते. असा प्रतिनिधि जर निर्देशित केला नसेल तर बॅंक आपल्या प्रतिनिधि बॅंकेकडे ते बिल पाठवतें व वरील सूचना तिला कळवते. त्याखेरीज बॅंक स्वतःच्या अशाही कांहीं सूचना प्रतिनिधि बॅंकेला वसुली बिल सुलभ व्हावी किंवा माल नीट रहावा म्हणून देते. त्या अशा असतात.

( १ ) बिल पोचल्यावर त्याची पोच द्यावी. कित्येकदां अशा पोचींचा फॉर्मही बिलाबरोबर पाठवला जातो व प्रतिनिधी बॅंकेने त्यावर फक्त सही करून व तारीख घालून तो परत करावयाचा असतो. तसेंच बिल देखाड झाल्यावर तें 'मुदती हुंडी' प्रकारचें असल्यास त्याचा स्वीकार दिनाक व भरणा दिनाक ( Acceptance Date & Maturity Date ) तारेनें वा हवाई टपालाने कळवावा ही एक सूचना असते. असें बिल स्वीकारले न गेल्यास किंवा भरणा दिनाकास भरले न गेल्यास ते तारेने वा हवाई टपालानें कळवावें असाही उल्लेख असतो.

( २ ) बिलाची रक्कम वसूल झाल्यावर त्याचे पैसे बिल पाठवणाऱ्या बॅंकेचें खातें प्रतिनिधी बॅंकेकडे असल्यास त्यांत जमा करावेत अशी किंवा त्याच शहरांत किंवा त्या देशांत जिथे बिल पाठवणाऱ्या बॅंकेचें खातें आहे अशा दुसऱ्या बॅंकेंत जमा करावेत अशी ही सूचना दिली जाते.

( ३ ) बिलाबद्दलच्या अस्वीकाराचा किंवा अप्रदानाचा निषेधलेख घ्यावयाचा असल्यास किंवा फक्त नोंद करावयाची असल्यास त्याबद्दलच्या सूचनाही बॅंकेच्याच असतात. निषेध नोंदीसाठीं किती खर्च पडेल याची माहिती घेऊन तसेच त्या देशांत नोंदीची काय पद्धत आहे याची माहिती घेऊनच या सूचना दिल्या जातात.

( ४ ) या शिवाय बिलाचा जो कांहीं भाग ( निर्यातपत्र, बीजक, विमापत्र, वगैरेच्या एकापेक्षां जास्त असलेल्या जादा प्रती ) पुटच्या टपालनें ( हवाई अगर सागरी ) पाठवला जातो, त्याचाही खुलासा बँक वरच्या पत्रांत करीत असते. या प्रलेकाच्या तीनतीन प्रती पाठवायच्या असल्यास पहिल्या टपालांत एकएक प्रत पाठवली जाते व उरलेल्या २/२ प्रती पुढच्या टपालांत जातात. चार असल्यास त्याची वांटणी २/२, पांच असल्यास ३/२ किंवा २/३ अशीही केली जाते. कित्येकदां संपूर्ण बिलाचा विशेषतः नाविक निर्यात पत्राचा संच मिळाल्याखेरीज आयातदार पैसे भरीत नाहीं, कारण निर्यातपत्र हें 'निगोशिएबल' असते व उरलेल्या कागदांची खात्री मिळेपर्यंत आयातदाराचें समाधान होत नसतें. अशा वेळीं उरलेले निर्यातपत्र किंवा अन्य दस्तऐवज नंतर आम्ही देऊं अशी बिल देखाड करणाऱ्या बँकेनें हमी दिल्यास बिलाची वसुली होऊं शकते. अशी हमी मागितली गेल्यास ती घावी अशा सूचनांचाही अंतर्भाव बिल पाठवणाऱ्या बँकेकडून केला जातो.

बिलाची वसुली लगेच झाली कीं या सर्व व्यवहारांत अवघड कांहींच नाहीं, असें वाटतें. पण विक्रेता व खरेदीदार यांच्यांत जर एकवाक्यता झाली नसेल, विक्रेत्यानें पूर्वी माल चांगला पाठवलेला नसेल, कागदपत्र विशेपतः ( निर्यातपत्र ) सदोप असेल तर अनेकदां वसुलीला दिरंगाई होते. विशेपतः तो माल सोडवून ठेवावा लागलेला असल्यास, विदेशी बँकेला त्याचे संरक्षणाची काळजी घ्यावी लागते. व विमा, गुदाम व बँकेचे आकार याचा खर्च याबाबत तक्रारी सुरू होतात. माल टिकाऊ नसल्यास या कटकटींत भरच पडते. तेव्हांच बँकेनें दिलेल्या सूचनांचें महत्त्व वाढतें. कारण या सूचना वरोवर दिल्या गेलेल्या नसल्यास वसुलीची जबाबदारी निर्यातदार बँकेवर टाकतो. तसेंच भारतीय नियंत्रणान्वयें या बिलाच्या वसुलीबाबत ठराविक मुदतींत जी. आर, इ. पी., पी. पी. फॉर्मची प्रत विनिमयनियत्रणाकडे पाठवावी लागते. त्याचीही मूळ जबाबदारी, निर्यातदाराची असली तरी पुष्कळशी जबाबदारी बँकेवर असतेच. म्हणूनच या सूचना बरोबर देणें वा हा व्यवहार नीट करणें बँकेच्या दृष्टीनें महत्त्वाचें असतें.

---

## विदेशी चलन पाठवण्याचे प्रकार व दस्तऐवज :

१५

कुठलाही विदेशविनिमयाचा व्यवहार करतांना विदेशी चलन परदेशात पाठवावें लागतें किंवा तिकडून ते वेगवेगळ्या तऱ्हेने येऊं शकतें. ज्यावेळेला विदेशी चलन घ्यावयाचें असतें म्हणजे खरेदी केलें जाते तेव्हां त्यापोटीं स्वदेशी चलन दिलें जातें व असा विदेशविनिमय व्यवहार करणाऱ्या बँकांना त्यापोटीं विदेशी चलन वेगवेगळ्या प्रकाराने द्यायला सांगितले जाते. ज्यावेळेला असें चलन खरेदी करणारा स्वतःच प्रवासाला निघणार असतो तेव्हां तो असें चलन प्रत्यक्ष चलनी नोटाचे स्वरूपात किंवा प्रवासी चेकचे अथवा चक्राकार पतपत्राचे स्वरूपात घेतो तर इतर वेळीं त्यासाठीं विदेशविनिमय करणाऱ्या बँकेनें विदेशी बँकेवर काढलेला ड्राफ्ट मागितला वा दिला जातो. त्याचप्रमाणें ड्राफ्ट घेऊन तो परत पोस्टानें पाठवण्याऐवजीं बँकाबँकांतून खात्याला थेट रक्कम जमा करण्याची पद्धतीही अनेकदा अवलंबिली जाते. ज्यावेळेला एक बँक दुसऱ्या बँकेला अशा सूचना टपालानें देते तेव्हां त्याला टपालीबदली (Mail Transfer) म्हटले जातें. हीच सूचना तारेनें दिली गेल्यास तिला तारबदली (Telegraphic Transfer) असें म्हणतात. विदेशविनिमयांत टपाली-बदली असा उल्लेख होतो तेव्हां हवाई टपाल हें अभिप्रेत असतें.

या विविध प्रकारांची माहिती या प्रकरणांत थोडक्यांत दिलेली आहे.

### प्रवासी चेक (Travellers Cheques):

ज्या वेळेला एकाद्या व्यक्तीला एका ठिकाणाहून दुसऱ्या किंवा अनेक ठिकाणीं जावयाचें असतें व त्या ठिकाणीं खर्च करावयाचा असतो त्या वेळेला तो बरोबर रोख पैसे घेण्याचें टाळतो. अर्थात् किरकोळ कामासाठीं लागणारे पैसे तो जवळ ठेवील हें उघड आहे; पण खूप मोठी

रकम जवळ ठेवून तो धोका पत्करणार नाहीं. बँकेचा ड्राफ्ट घेऊन पैसे जवळ बाळगण्यातील धोका टळू शकेल पण ड्राफ्ट वटवण्यासाठीं त्याला बँकेच्या वेळातच जावें लागेल व दुसरें म्हणजे ज्या बँकेवर तो ड्राफ्ट काढला असेल तिथेंच त्याचे पैसे मिळू शकतील. त्याशिवाय ड्राफ्ट हा हमी 'ऑर्डर' पद्धतींत असल्याने त्याला स्वत ची योग्य अशी ओळख तिथे द्यावी लागेल किंवा तो कुणाच्यातरी खात्यात भरून त्याच्याकडून चेकनें पैसे काढून घ्यावे लागतील. वेगवेगळ्या ठिकाणीं प्रवासासाठीं जात असता असे गावोगावचे ड्राफ्ट घेणें हे सोयीचेही ठरणार नाहीं. जेव्हा प्रवासाचे कार्यक्रमाची अनिश्चितता असते तेव्हा प्रवासी लोकाची ही अडचण दूर करण्यासाठीं बँकानीं व (ज्याना बँकिंगचा व्यवहार करण्याची परवानगी आहे व ज्याच्यावर लोकाचा विश्वासही आहे अशा) काहीं मोठ्या फर्म्सनी प्रवासी चेक्सची पद्धत सुरू केली व आता ही पद्धत जगभर रूढ झाली आहे. काहीं प्रवासी चेक आतरराष्ट्रीय असतात तर काहीं प्रवासी चेक देशातर्गत व्यवहारापुरतेच उपयोगी पडतात. ज्या बँका आतरराष्ट्रीय चेक्स काढतात त्याचे चेक्स वटवण्यात त्रास पडत नाहीं. कारण असे चेक्स काढणारी बँक व चेक्सचे पैसे दिल्यावर परत कसे भरपाई करून मिळतात त्या बद्दलची माहिती ते वटवणाऱ्या बँकाना असतें. ते चेक्स कुठल्याही बँकेंत वटवले जातात इतकेच नव्हे तर मोठमोठाली हॉटेलें, क्लब्स, रेल्वे स्टेशन्स विमानतळ, डिपार्टमेंटल स्टोअर्स, प्रवासी वस्तूचीं दुकानें, शोभेच्या मालाचीं दुकानें वगैरे ठिकाणीही वटवले जाण्याची शक्यता व सोय पाश्चिमात्य देशात असते. प्रवासी चेकचे फायदे अनेक आहेत.

(१) पैसे जवळ बाळगण्याचा धोका नष्ट होतो (२) ते वटवण्यास सुकर असतात पण सहीच्या अडसरामुळे त्यात सरक्षणही असते. (३) ते वेगवेगळ्या लहान मोठ्या रकमेचे मिळू शकतात. दोन पौंड, पाच पौंड, दहा पौंड अशा रकमाचे अनेक चेक्स घेतल्यावर जितकी रकम लागेल तितक्या पुरतेच ते मोडता येतात, दोन व पाच पौंडाचे अनेक ड्राफ्ट घेऊन जाणें अव्यवहार्य ठरेल. (४) ते वेगवेगळ्या ठिकाणीं चालू

शकतात ( ५ ) चोरीला गेले तरीसुद्धां चेक काढणाऱ्या बँकेनें किंवा कंपनीनें अशा अनिष्ट घटनेचे वेळीं काय करावें हे सांगितलें असतें त्याप्रमाणे वागल्यास कालांतराने त्याची रक्कम परत मिळू शकते व ( ६ ) कांहीं प्रवासी चेक जर लागले नाहीत तर ते परत केल्यावर कुठल्याही बॅंकेत त्याची रक्कम परत मिळते.

भारतातील व्यक्तीला ज्यावेळीं असे चेक्स परदेशांत प्रवासास जाण्यापूर्वी घ्यावे लागतात त्यावेळीं त्याला असे चेक्स विकणाऱ्या प्रतिनिधी बँकेकडे किंवा त्या संस्थेच्या कचेरीत जावे लागते. अशा चेक्सची खरेदी म्हणजे विदेशी चलनाची खरेदी असते व भारतीय विनिमय निर्मंत्रणाप्रमाणे असे चेक्स परवान्याशिवाय फक्त ७५ रुपयापर्यंतच्या किंमतीइतकेच नेता येतात. पुष्कळदां अशा प्रवासासाठीं योग्य ती कागदपत्रे पाहून रिझर्व्ह बँक एक परवानापत्र देते व त्यावर योग्य ती नोंद करून अधिकृत विदेशविनिमय करणारी बॅंक त्या रकमेइतके प्रवासी चेक्स विकते.

असे चेक्स घेताना ते कुठल्या रकमेचे हवे आहेत व किती हवे आहेत याची ऑर्डर देणारे वरील संस्थांचे फॉर्म (दोन किंवा तीन प्रतींत) चेक घेणाऱ्याला भरावे लागतात, व आपला पासपोर्टही हजर करावा लागतो. त्याचप्रमाणे विदेशी चलन खरेदी करण्यासाठी परवानगी मागणारा फॉर्म त्याला भरावा लागतो व मिळणाऱ्या सर्व प्रवासी चेक्सवर विकणाऱ्या बॅंकेचे प्रतिनिधीसमोर सही करावी लागते. या सहीसारखीच दुसरी सही त्या चेकवर मोडतांना केली की मग इतर कुठलेही सव्यापसव्य न करताना त्याला लगेच पैसे मिळत असतात. त्यामुळे अशी सही बँकेच्या प्रतिनिधी-समोरच करावी लागते व त्यासाठीं चेक्स विकत घेणाऱ्या व्यक्तीला बॅंकेत स्वतः जावे लागते.

अशा चेक्सबरोबर त्यांचे क्रमांक नोंदण्यासाठी एक तक्त्याचा कागद दिलेला असतो. हा कागद, योग्य तो नोंद करून खरेदीदारानें चेक्सपासून दूर, वेगळ्या जागीं ठेवणें हिताचें असते. ओळख म्हणून चेकवर समोर केली जाणारी सही येवढीच पैसे देणाऱ्या बँकेला पुरेशी असते. म्हणजे

सर्वसामान्यपणें जवळजवळ चलनी नोटाइतकेच त्याला महत्व येते. त्यामुळे असे चेक्स गहाळ झाले, चोरीला गेले तर त्या मालकाने आपण जिथून ते विकत घेतले आहेत त्या कचेरीला व ज्या संस्थेने प्रवासी चेक्स काढले असतील तिच्या जवळच्या कचेरीला ( याची यादी चेकबरोबर दिली जाते ) देणें आवश्यक ठरतें, म्हणजे ती कचेरी त्याची योग्य ती नोंद करून ते जिथे हरवले असतील त्या ठिकाणचे आसपासचे बॅंकाना कळवून त्याना सावधगिरी बाळगण्याची सूचनाही देते व काहीं कालानतर त्याची रक्कम विकणाऱ्या कचेरीला खरेदीदाराला देण्यासाठीं परत करते.

हे चेक्स विकताना ते कुठल्या देशात वटवण्यास परवानगी आहे त्याचा शिक्का मारला जातो. सर्वसामान्यपणें असे चेक कुठेही वटवता येतात. पण भारतीय विनिमयनियंत्रणाचे नियमान्वयें ज्या देशात तें चलन खर्च व्हावयाचें आहे त्या खेरीज अन्य देशात तें वटविण्यास परवानगी देता येत नाहीं. स्टर्लिंग चेक स्टर्लिंग विभागात वटविता येतात व त्याखेरीज अन्य देशाबाबतचा शिक्का हवा असेल तर चलन परवाना काढताना त्यावर तशी गोष्ट नमूद करून घ्यावी लागते. प्रवासाला निघण्यापूर्वीं त्याबाबत करावयाच्या अर्जांत असे देश नमूद केल्यास परवान्यावर त्याची नावें येऊन मग त्याबद्दल त्रास पडत नाहीं.

प्रवासी चेक हे खास तऱ्हेनें छापलेल्या फॉर्मवर बॅंकेच्या ड्राफ्ट प्रमाणेच काढलेले असतात. हा चेक मोठमोठ्या शहरातील हॉटेलें, इन, प्रवासी संस्था, मोठमोठीं दुकानें अशा ठिकाणी रोख रकमेऐवजीही स्वीकारला जातो हा त्याचा विशेष फायदा होय. त्यामुळें जरी एकादे वेळीं बॅंका बंद असल्या तरी हा चेक बाळगणाराचें मोठमोठ्या शहरात अडत नाहीं तो देताना किंवा मोडताना पूर्वीं त्या चेकवर एका ठिकाणी जशी सही केली असेल तशीच दुसरी सही ( त्यासाठीं ठेवलेल्या जागेवर ) त्याचे पैसे देणारासमोर करावी लागते. ही सही हेच ते चेक बाळगणाराची ओळख पटण्याचें साधन असते व ती चेक मोडण्याचे वेळीच करावयाची असल्यानें त्याबाबत

लबाडी करणें सहसा कठीण जाते. मात्र केवळ अशा सहीवरच त्याचे पैसे मिळत असल्याने ते सावधगिरीने व जपून ठेवावे लागतात व गहाळ झाल्यास किंवा चोरी झाल्यास त्याची वर्दी तावडतोब जवळच्या पोलीस-स्टेशनवर व चेक काढणाऱ्या संस्थेच्या बँकेच्या जवळच्या कचेरींत द्यावी लागते हे वर सांगितले आहेच. कांही कांही वेळा संशयाचे निराकरण व्हावें म्हणून किंवा ओळखीसाठीं असे चेक मोडण्याचे वेळीं, पैसे देणारी बँक वा संस्था ते वाळगणाराचा पासपोर्टही मागू शकते. असे चेक्स विकत घेतल्यावर त्यावर पहिली सही करण्यास कधीही विसरूं नये त्याचप्रमाणें त्यावर दुसरी सहीही आधीं करून ठेवूं नये व त्यांच्या क्रमांकाची नोंदही वेगळ्या ठिकाणी करून कुठलाही चेक मोडल्यावर तीही नोंद प्रवाशानें स्वतःचे हितासाठीं करावी.

विदेशविनिमयांतील प्रवासी-चेक हे २, ५, १० पौंड किंवा ५, १०, २०, ५०, ५०० डॉलर्स किंवा ५०, १०० मार्क अशा ठरलेल्या रकमेचे मिळूं शकतात, व सर्वसाधारणपणें भारतांत त्यासाठीं शेकडा एक टक्का बँक कमिशन द्यावे लागतें. वेगवेगळ्या देशांतील याबाबतचा आकार निराळा असू शकतो. असे चेक अधिकृत बँकांच्या सर्व मोठ्या कचेऱ्यांतून मिळूं शकतात व त्यासाठी सगळीकडे सारखाच आकार असल्यानें ते प्रवाशानें आपल्या बँकेतूनच विकत घेतल्यास त्यास दुसरीकडे वेळ व हेलपाटे घालावे लागत नाहीत.

परकीय चलनातील असे प्रवासी चेक देणाऱ्या दोन जगप्रसिद्ध संस्था आहेत. ( १ ) अमेरिकन एक्सप्रेस कंपनी व ( २ ) थॉमस कुक अँड सन. पहिली कंपनी ही डॉलर व पौंड या दोन्ही चलनातील चेक काढते, तर दुसरी फक्त पौंडातील प्रवासी चेक्सच विकते. याखेरीज मिडलंड बँक, बँक ऑफ अमेरिका, बार्क्लेज बँक, डॉइश बँक यासारख्या आंतरराष्ट्रीय बँकिंग क्षेत्रांत माहीत असलेल्या बँकाही आपापल्या चलनांचे चेक्स काढत असतात. अमेरिकन एक्सप्रेस कंपनी असे सुमारे पंचवीस कोटी चेक्स दरवर्षी विकत असते तर थॉमस कुकची संस्था ९ ते १० कोटी चेक्स विकते. या दोन्ही

संस्था प्रवासी लोकांची, परकीय प्रवासी चेक्सचीच नव्हे तर सगळ्याच प्रकारच्या तिकिटांची, हॉटेलांची, वगैरेही सोय करीत असतात, व त्यांचे चेक्स विकण्यासाठी अनेक बँकांतून व्यवस्था केली गेलेली असते.

**पतपत्र** ( Clean Letter of Credit ):

किल्येकदा प्रवासी चेक ऐवजी दुसऱ्याही एका पद्धतीचा अवलंब परदेशांत पैसे मिळण्यासाठी केला जातो. ती म्हणजे पतपत्राची ( Clean Letter of Credit ) होय. या पद्धतीला जरी लेटर ऑफ क्रेडिट ही संज्ञा दिली जाते तरी व्यापारी हमीपत्रापेक्षा तिचा अर्थ वेगळा आहे. प्रवासी चेक वटविण्याचे दृष्टीने सोपे असले तरी ते ठराविक रकमेच्या पटींनेच ( २, ५, १० पौंड वगैरे ) मिळूं शकतात. तसे पतपत्राचे बाबत होत नाहीं. असे पतपत्र देताना बँक त्यांत, ते धारण करणाराचे नांव व त्यावर एकूण किती रकमेपर्यंत विदेशी बँक प्रतिनिधींनी रक्कम दिली तरी चालेल त्याची नोंद करते, व तियपर्यंत रक्कम देऊन प्रतिनिधी बँका ती रक्कम पतपत्र देणाऱ्या बँकेकडून वसूल करून घेतात. अशी रक्कम घेण्यासाठीं त्या पत्रधारकाला ते देणाऱ्या बँकेच्या ठराविक प्रतिनिधीकडेच जावें लागते, त्यामुळे त्यात जास्त सुरक्षितता असते. अशा प्रतिनिधी बँकांची यादी पतपत्रावरोबर धारकाला ते देणाऱ्या बँकेकडून दिली जाते. ज्यावेळेला प्रवासी जरा जास्त मुदतीसाठीं म्हणजे सहा ते बारा महिने बाहेर गेलेला असतो व त्याला दरमहा ठराविक रकमेपर्यंतच रक्कम उपलब्ध करावयाची असते तेव्हां इतक्या मुदतीसाठीं लागणाऱ्या रकमेपोटीं खूप प्रवासी–चेक देण्याऐवजीं असे पतपत्र दिले जाते.

## नोटा व नाणीं:

बँका प्रवाशांना ज्याप्रमाणें प्रवासी चेक्स विकतात त्याचप्रमाणें वेगवेगळ्या देशातील चलनें ( नाणीं व नोटा ) ही विकतात. मात्र अशी विक्री करतांना बँकेला अनेक बाबींचा विचार करावा लागतो. पहिली गोष्ट म्हणजे अशा विक्रीसाठीं ठेवाव्या लागलेल्या शिलकी परदेशी चलनावर

व्याज मिळत नाही. ती रक्कम बिनव्याजी पडून राहिलेली असते. दुसरे म्हणजे वेगवेगळ्या देशातील चलनाबाबत तिथली सरकारे जे वेगवेगळे हुकुम काढतात त्याबाबत बँकाना जागरूक राहून त्यांच्याजवळ असलेले चलन हे रद्द झालेले नाहींना ह्याची खात्री ठेवावी लागते. या चलनाची कुठल्या दराने विक्री करावी याचे बँकावर बंधन नसतें व अन्य तऱ्हेच्या ड्राफ्ट, मेल ट्रान्स्फर वगैरे पद्धतीने होणाऱ्या विक्रीचे दरापेक्षां हा दर महाग असतो. म्हणजे वरील दरापेक्षा विदेशीचलन कमी प्रमाणांत बदली दिले जाते.

परकीय चलनांतील नोटा व नाणी विकत घेतांना दरांचे बाबतींत वेगवेगळी परिस्थिती आढळते. प्रवासी-चेकपेक्षां पाश्चिमात्यदेशांत नोटांच्या बदली जास्त दरानें पैसे दिले जातात. भारतांत अशा दराचे बाबत वेगळी परिस्थिती आढळते. म्हणजेच दर युनिटला बँका भारतीय रुपये कमी देतात. दहा डॉलर्सच्या प्रवासी चेकची खरेदी विक्री करतांना बँकेनें ४७५।४८० दर दिलेला असला तर दहा डॉलर्सच्या चलनी नोटेसाठीं हा दर कदाचित ४७३।४८२ असा असूं शकेल. अशा खरेदीचे वेळीं बँकाना दोन बाबींचा विचार करावा लागतो.

( १ ) असें चलन खात्यास जमा करावयाचे असलें तर तें पोष्टानें प्रत्यक्ष त्या देशांतील बँकेकडे पाठवावें लागतें व त्यासाठी रजिस्ट्रेशनचा व विम्याचा खर्च बराच येतो.

( २ ) अशा नोटा व नाणीं विकणारी व्यक्ती बँकेच्या चांगल्या माहितीची व विश्वासार्ह असेल तरच बँक असें चलन विकत घेते. नाहीं तर त्या वसुलीच्या बोलीवरच स्वीकारते. कस्टम खात्याच्या नियमाप्रमाणें भारतांत उतरणाऱ्या व्यक्तीला असें चलन जवळ असल्यास ते एका फॉर्मवर जाहीर करावें लागतें व हा फॉर्म कस्टम कचेरीची अधिकृत सही होऊन नंतर प्रवाशाला मिळतो. चलनाच्या खरेपणाची खात्री करून घेण्यासाठीं बऱ्याच भारतीय बँका या फॉर्मची प्रवाशाजवळ मागणी करतात व नोटा विकत घेतल्यावर त्या फॉर्मवर तसा खरेदीचा शेरा मारतात.

**टपालबदली** ( Mail-Transfer ) :

प्रवासी चेक व नोटा या प्रकारचे विदेशी चलन फक्त स्वतः प्रवाशालाच बरोबर नेणें सोयीचे असते. अन्य व्यवहारांत जेव्हां देणीं घेणीं भागवावीं असतात तेव्हां वेगळ्या मार्गाचा अवलंब करतात. त्यांतील सर्वांत रूढ पद्धत ह्मणजे टपालबदली ( Mail-transfer ) होय. या पद्धतींत ज्याला विदेशी चलन परदेशी पाठवायचे असते तो आपल्या बँकेला, परदेशांतील दुसऱ्या बँकेला तिच्याकडे असलेल्या ग्राहकाचे ( Beneficiary ) खात्याला अशी रक्कम जमा करण्यासाठीं सांगतो. असे खातें त्या बँकेकडे नसल्यास ती, दुसऱ्या बँकेंत असलेल्या खात्यांत ती रक्कम जमा करण्यासाठीं कळवते किंवा योग्य ती ओळख घेऊन ( व पावती घेऊन ) ग्राहकाला ती रक्कम रोखही देते. अशी रक्कम खात्यांत जमा केल्यावर ( किंवा रोख द्यावयाची असली तरी ) ग्राहकाला अशी रक्कम परदेशातील अमुक व्यक्ती | संस्थेकडून आली आहे असें कळवलें जातें. रक्कम रोख द्यावयाची असली तरी त्याला टपालबदली हीच संज्ञा दिली जाते. या पद्धतीनें पैसे पाठवितांना चेकचें किंवा ड्राफ्टचेंही कार्य साधलें जातें. चेकचे बाबतींत चेक लिहिणाऱ्याला तो, ज्या व्यक्तीला पैसे द्यावयाचे असतात त्या व्यक्तीकडे पाठवावा लागतो व त्या व्यक्तीला तो आपले बँकेंतील खात्यांत भरून, त्या बँकेनें वसुलीला पाठवून तिला पैसे मिळेपर्यंत थांबावें लागतें. विदेशांतील व्यवहारांत या प्रकारानें खूप दिवस जातात म्हणून ही टपालबदलीची पद्धत जास्त सोईस्कर समजतात. शिवाय विदेशी चलनाचे बाबतींत बाहेर खातें ठेवण्याची फारशी पद्धत नसल्यामुळें व हल्लीं अनेक देशांतून जारी असलेल्या नियंत्रणानुसार त्यांस परवानगी नसल्यामुळें चेक्स पाठवले जाण्याची शक्यता नसते. साधे चेक पाठवावयाचे झाल्यास चेक लिहिणारा एका चलनांत खातें ठेवीत असतो तर चेक ज्याला द्यावयाचा असतो त्याला दुसऱ्या चलनांत रक्कम हवी असते, त्यामुळें त्यानें तो चेक वसुलीला दिल्यानंतरही त्याला चलनाच्या परिमाणांत होणाऱ्या बदलाचा धोका स्वीकारावाच लागतो. विदेशी चलन पाठविण्यासाठीं घेतल्या जाणाऱ्या ड्राफ्टमध्यें ही गैरसोय टळत असली तरी ड्राफ्टसाठीं वेगळें पत्र लिहून टपालहंशील खर्च करावेंच लागतें व तो

भरण्यासाठीं दुसऱ्या देशांतील व्यक्तीला आपल्या बँकेंत जाण्यासाठीं एक खेप टाकावीच लागते. त्याखेरीज ड्राफ्ट हरवला तर त्याची दुसरी प्रत मिळण्यासाठीं अभयपत्र लिहून द्यावें लागतें व वेळही जातो. या सर्व अडचणींतून टपाली बदलीनें सुटका होऊं शकते. ड्राफ्ट हा एंडॉर्समेंट करून दुसऱ्याला देतां येतो पण कित्येकदां त्याची नोंद न ठेवल्यास अशी एंडॉर्समेंट करणाऱ्याच्या तें लक्षांत रहात नाहीं व आपल्याला पैसे मिळाले कीं नाहीं याचा त्याला कधी कधीं संदेह पडतो. मेल ट्रान्स्फर ही 'नॉट निगोशिएबल' असते व ती ज्याला पैसे मिळावयाची इच्छा असते त्यालाच योग्य त्या प्रकारें पैसे देऊं शकते. मेल ट्रान्स्फरही हल्लीं विमान मार्गानेंच पाठविली जाते व पूर्वीप्रमाणें हल्लीं त्यांत वेळेचा अपव्ययही होत नाहीं. मेल ट्रान्स्फरची सूचना देतांना बँक त्याची मूळ प्रत, ज्या बँकेला सूचना द्यावयाच्या तिला पाठवते व उरलेल्या प्रती खरेदीदार, ग्राहक, अन्य बँका वगैरेना पाठवूं शकते. बँकाकडे आलेल्या वसुलीचे बिलाचे पैसे ही सर्वसामान्यपणें वसुलीनंतर असे मेल ट्रान्स्फरनेच पाठविले जातात. त्या योगे ग्राहकाला, आयातदाराला व विदेशी बँकेला एका वेळेला त्या 'मेल ट्रान्स्फर'च्या वेगवेगळ्या प्रतीद्वारा, तो व्यवहार पुरा झाल्याची माहिती देतां येते. टपालबदली ऊर्फ मेल ट्रान्स्फर तत्वतः टेलिग्राफिक ट्रान्स्फर ऊर्फ तारबदलीपेक्षां घेणाराला स्वस्त असते पण हल्लीं सर्वच विदेशी टपाल हवाई मार्गानें जात असल्यानें अशा टपालीबदलीनें जास्तींत जास्त चारपांच दिवसांत ग्राहकाला अशी रकम मिळूं शकते त्यामुळें त्याबद्दल व्यवहारांत वेगळा दर लावला जात नाहीं.

**ड्राफ्ट :**

मेल ट्रान्स्फर इतकीच वापरली जाणारी दुसरी पद्धत म्हणजे विदेशी बँकेवर पूर्व योजना करून बँकेनें ड्राफ्ट काढणें व तो विदेशी चलन खरेदी करणाऱ्याला देणें ही होय. असा ड्राफ्ट काढल्यानंतर तो काढणाऱ्या बँकेला, तो ज्या बँकेवर काटला जातो तिला सूचनापत्र (Advice) पाठवावें लागतें. या सूचनापत्रांत ड्राफ्टची तारीख, क्रमांक, रकम व तो कुणाचे नांवें काढला आहे याची संपूर्ण माहिती दिली जाते. हें सूचनापत्र हवाई मार्गानें

पाठवावे लागते. कारण हवाई मार्गानें ड्राफ्ट पाठविला गेल्यानतर तो वटवण्यासाठीं यावयाचे आत त्या बँकेला त्याची माहिती असणे सुरक्षिततेच्या दृष्टीनें आवश्यक असते. असा ड्राफ्ट, ज्याच्या सह्या परदेशातील बँकेकडे अधिकृत अधिकारी म्हणून पाठविलेल्या असतात, त्याच्याच सहीनें दिला जातो.

असा ड्राफ्ट काटण्याची जेव्हा काहीं शाखाना परवानगी दिली जाते तेव्हा सूचनापत्राची ( Advice ) एक प्रत मुख्य कचेरीकडे किंवा जिथें परदेशी चलनातील खाते ठेवले असते त्या विभागीय कचेरीकडेही पाठवली जाते. अशी सूचना काहीं बँकातून डीलर्सकडे ( Dealers ) पाठवण्याचीही पद्धत असते. कारण चलनाचे खरेदीविक्रीचा आकडा त्याचेकडे जातो त्यावरून एकूण परिस्थितीचा समतोलपणा ठेवण्यासाठीं त्याना करावे लागणारे व्यवहार अवलंबून असतात. ज्यावेळ्ला असे ड्राफ्ट स्टर्लिंगमध्यें काटले जातात त्यावेळ्ला त्याचे ग्राहक नॉनस्टर्लिंग विभागातील असले तर त्याना त्याचे पैसे मिळण्यासाठीं ‘ एक्स्टर्नल विभागातही वटवण्यास वैध ’ ( Eligible for External A/Cs ) असा त्याचेवर शेरा मारावा लागतो. हाच शेरा टपालीबदलीच्या पत्रावरही आवश्यक असल्यास मारला जातो. ग्रेट ब्रिटनच्या विनिमयनियत्रणामुळे तेथें तो शेरा आवश्यक असतो.

ड्राफ्टमध्यें, तो पाठविण्यासाठी वेगळें पत्र व अलाहिदा पोस्टेज लागते. म्हणून हल्लीं अशा रकमा ट्रान्स्फर पद्धतीनेंच पाठविणें रूढ होऊ लागले आहे. ड्राफ्टच्या धन्याला वेगळ्या सूचनासाठीं वा अन्य कारणामुळें स्वतत्र पत्र लिहावयाचें असलें तरच ड्राफ्ट विकत घेणें योग्य ठरतें. नाहीतर सुरक्षिततेच्या दृष्टीने तसेच वेळेवर ड्राफ्ट न मिळाल्यानें वा तो वाटेंत गहाळ झाल्याने तो दुसरा घेण्यासाठी लागणाऱ्या दीर्घ वेळामुळें, तसेंच त्यासाठीं द्याव्या लागणाऱ्या अभयपत्राच्या खर्चाचा विचार करता ट्रान्स्फर ऑर्डर पद्धत सर्वांत चागली समजली जाते.

**टेलिग्राफिक ट्रान्स्फर ( Telegraphic Transfer ).**

दोन वेगवेगळ्या देशातील चलनाचा व्यवहार जेव्हा केला जातो तेव्हा त्याच्या अदलाबदलीचा दर अनेक सामाजिक, राजकीय व आर्थिक

बाबींवर अवलंबून असतो व यांतील कुठलीही बाब त्याच्या दरावर परिणाम करते. या सर्वकाळ असणाऱ्या अनिश्चिततेंत वावरायला विक्रेता किंवा खरेदीदार पुष्कळदां तयार नसतो, व ज्यायोगें हा व्यवहार लौकर पुरा होईल अशा रीतीनें तो करून ती अनिश्चितता कमी करण्याचें तो ठरवितो. पत्रे, किंवा अर्थाज्ञा वगैरे इकडून तिकडे नेण्यासाठीं लागणारा वेळ हे दोन देशांतील व्यवहारांत पडणारे मोठें बंधन होय. पूर्वीच्या शतकांतून जेव्हां समुद्रपर्यटनाद्वारें या तऱ्हेचा व्यवहार होई तेव्हां इकडचे टपाल तिकडे पोचण्यास पंधरा दिवसांपासून महिन्यापर्यंतचा सुद्धा वेळ लागे. अशा वेळीं तारेने जर पैसे पाठविले तर वेळेंत बचत होईल (आंतरराष्ट्रीय तारा बहुतेक ठिकाणीं एका दिवसात पोचतातच) अशा उद्देशाने खरेदीदार "तारेचा व्यवहार" सांगतो. त्यात व्याजाचेंही नुकसान होत नाही. कारण दोन्ही बाजूला जवळ जवळ एकाच दिवशीं व्यवहार मांडले जातात. त्यामुळे तारेच्या व्यवहाराबाबत जो विनिमयदर सांगितला जातो तो सर्वोत्कृष्ट समजला जातो व त्यावरच इतर बाबी विचारांत घेतल्या जाऊन बाकीचे दर ठरविले जातात. तारेच्या व्यवहाराच्या दरांत (T. T. Rate) विकणाराला जास्त पैसे मिळतात म्हणजे खरेदीदाराला स्वकीय चलनाची जास्त रक्कम द्यावी लागते. पण या व्यवहारांत व्याज, स्टँप वगैरेचा वेगळा भूर्दंड बसत नाहीं व मुख्य म्हणजे अनिश्चितता टळून लगेच पैसे मिळू शकतात.

**केबलची पद्धत :**

अशा तारा पाठवितांना अर्थातच त्या अस्सल आहेत याबद्दल खात्री करून घेतल्याखेरीज परदेशांतील बँक पैसे देणार नाही. त्यामुळें अशी तार पाठवितांना तिच्या असलीपणाची खात्री पटण्यासाठीं सांकेतिक भाषेचा व अंकांचा उपयोग करतात. त्याचप्रमाणें त्यांत अनेक गुंतागुंती करून ती सांकेतिक भाषा दुसऱ्याला सहज समजून लबाडी करतां येऊं नये अशीही व्यवस्था करतात. पुष्कळदां असा तारेचा मजकूर जरी साध्या भाषेंत पाठविला तरी त्याआधीं एक आंकडा घालतात. हा आंकडा सांकेतिक भाषेचाच एक भाग असतो.

पाठवावयाची रक्कम, ज्या दिवशीं पाठविली त्यादिवसाची तारीख, वार, महिना या सगळ्यासाठीं वेगवेगळे अंक देऊन शिवाय प्रत्येक बँकेबरोबर व्यवहार करताना तिलाही आधी एक वेगळा आकडा पाठविला जातो व या सगळ्या आकड्याचा उपयोग करूनच हा सुरवातीचा आकडा तयार करतात. त्यात चूक आढळली तर दुसऱ्या बाजूची बँक लेखी खात्री ( Written Confirmation ) आल्याखेरीज व्यवहार करीत नाहीं किंवा उलट तार करून खुलासा मागवून घेते. तसेच केबलनें सूचना गेल्या तरी ती केवळ माहिती म्हणून आली आहे व प्रत्यक्ष व्यवहार त्याची टपालखात्री ( Mail Confirmation ) आल्यावर होईल असेच बँक केबलच्या ग्राहकाला कळवीत असते.

टेलिग्राफिक ट्रान्स्फरनें पैसे पाठविताना बँकेला त्या पैशाचा इथें उपयोग होत नाहीं कारण जवळ जवळ त्याच दिवशी दुसऱ्या बाजूला, टी. टी च्या ग्राहकाला पैसे द्यावे लागतात. त्यामुळें त्याचा दर इतर दरापेक्षा महाग असतो पण टी टी. मुळें ग्राहकाला लगेच पैसे मिळाल्यानें खरेदीदाराची विनिमयाचे दरातील धोक्यापासून मुक्तताही होते. तारबदली ( T T ) खरेदी करताना भारतीय खरेदीदाराला योग्य तो परवाना घेतलेला असल्यास त्याची विनिमयनियंत्रणप्रत बँकेकडे सादर करावी लागते किंवा रिझर्व्ह बँकेची खरेदीच्या अर्जावर आगाऊ समति असल्यास तो फॉर्मही दाखल करावा लागतो. अशी तारबदली ( T T ) विकताना अधिकृत बँक खरेदीदाराकडून एक फॉर्म भरून घेते. त्याअन्वयें तार सांकेतिक भाषेत पाठविली तरी चालेल व अशी सांकेतिक भाषा उलगडता न आल्यास किंवा पोस्टातून ती बरोबर पोचविली न गेल्यास किंवा अन्य काहीं कारणानें ती मिळावयास त्या व्यक्तीला उशीर झाला किंवा मिळाली नाहीं अथवा बँकेच्या प्रतिनिधीच्या निष्काळजीपणानें ती उशीरा मिळाली किंवा मिळाली नाही तरी त्याबद्दल बँक जबाबदार नाहीं, तसेच तिच्यातील मजकुराचे चुकीचें रूपांतर झाल्याने धारकाला कमीजास्त पैसे दिले गेले तर त्याबद्दल मी भरपाईस जबाबदार राहीन असे खरेदीदाराला लिहून द्यावें लागतें.

अशी तारबदली जरी सांकेतिक शब्द वापरून किंवा साध्या भाषेत पाठविली तरी लगेच हवाई मार्गाने तिचें अधिकृत खात्रीपत्र ( confirmation letter ) पाठविण्याचीही बँकांची पद्धती असते. त्यामुळें टी. टी. चा खुलासा तीन चार दिवसापेक्षां जास्त दिवस अनिश्चित राहूं शकत नाहीं. तारबदली करतांना येणारा केवलचा खर्चही अधिकृत बँका खरेदीदाराकडून घेतात.

भारतांतल इतरत्र सध्यां केवल पाठविण्यासाठी येणारा खर्च पुढे एका परिशिष्टात दिला आहे. या तारेमध्यें साधी तार व पत्रतार असें भाग असतात.

पत्रतारेंत ( Letter Telegram ) कमीत कमी २२ शब्दांचा आकार घेतला जातो. पूर्णदराच्या तारेत किमान सहा शब्दांचा आकार घेतला जातो.

मात्र दर वेळेस पोस्टांत चौकशी करून हे दर बदलले गेले आहेत की नाहीत याची खात्री करून घ्यावी. पत्रमय तारेंत सांकेतिक शब्द ( सुरवातीच्या खुणेच्या क्रमांका खेरीज ) वापरल्यास तिचा आकार साध्या पूर्ण तारेइतका घेतला जातो. सांकेतिक किंवा लघुशब्दाबावत, तार करतांना ते ते शब्द एक एकच धरावेत असा शेरा तारेखालीं द्यावा लागतो.

## विनिमयनियंत्रणखातें :

१६

सप्टेंबर १९३९ मध्यें दुसरें महायुद्ध सुरू होण्यापूर्वी ग्रेटब्रिटननें ज्याप्रमाणें २४ ऑगस्ट १९३९ लाच विनिमयनियंत्रण जारी केले त्याप्रमाणें भारतांतही असे विनिमयनियंत्रण युद्धाचे सुरवातीस सप्टेंबर १९३९ मध्यें जारी करण्यांत आलें. भारतरक्षणाच्या नियमान्वयें (Defence of India Rules) जे अनेक नियम जाहीर करण्यात आले होते त्यातच विनिमय व्यवहाराचाही एक भाग घालण्यांत आला होता. दोस्त राष्ट्रांच्या प्रयत्नांत हिंदुस्थानतर्फेही योग्य ती विनिमयाची बचत होणे–हिंदुस्थान त्यावेळी परतंत्र होता तरी–आवश्यक होते ( किंबहुना या बचतीच्या मोठ्या सांठ्यामुळेच त्यावेळीं ताण पडला तरी भारताच्या पुढच्या पचवार्षिक योजनांसाठीं लागणारा पैसा पहिली कांहीं वर्षे उपलब्ध होऊं शकला ).

भारतरक्षणनियमांतर्गत अशा विनिमय नियंत्रणाचा हा व्यवहार सन १९४७ पर्यंत चालू होता व योग्य तो 'विदेशविनिमयनियमन कायदा १९४७' ( Foreign Exchange Regulation Act 1947 ) पुढें मजूर झाल्यानंतर असे व्यवहार २५ मार्च १९४७ पासून आता त्या कायद्यान्वयें नियंत्रित करण्यांत आले आहेत. त्याबाबतचे सर्व अधिकार भारताची मध्यवर्ती बँक या नात्यानें रिझर्व बॅंकेकडे सुपूर्द करण्यात आले असून तिचे विनिमयनियंत्रण खातें याबाबतचा सर्व कारभार बघते.

### अधिकृत व्यवहारी :

अर्थात एक अपवाद सोडून प्रत्यक्ष विनिमयाचा व्यवहार रिझर्व बँक स्वतः करीत नाहीं, तर असे व्यवहार करण्यासाठीं तिनें कायदा मंजूर झाला त्यावेळीं अशाप्रकारचा व्यवहार करीत असणाऱ्या सर्व बँकांना अधिकृत

व्यवहारी (Authorised Dealers) म्हणून नेमले व अशा व्यवहाराचे तक्ते वेळोवेळीं पाठवण्याचे, तर काहीं व्यवहाराबाबत पूर्वसमति घेण्याचें बंधन त्यांचेवर घातले. या बँकांच्या यादींत वेळोवेळीं योग्य वाटलें तेव्हा नवीन भर घालण्यात आली. मात्र शक्यतो त्याची संख्या न वाढवण्याचेच रिझर्व बँकेचे धोरण आहे. सध्या अधिकृत व्यवहारी म्हणून काम करण्याचा परवाना रिझर्व बँकेकडून खालील बँकांना दिला गेला आहे

१ अलाहाबाद बँक लि
२ आंध्र बँक लि.
३ बँक ऑफ बडोदा लि.
४ बँक ऑफ कोचीन लि.
५ बँक ऑफ इंडिया लि
६ बँक ऑफ महाराष्ट्र लि.
७ कॅनरा बँक लि.
८ सेंट्रल बँक ऑफ इंडिया लि
९ देवकरण नानजी बँकिंग क. लि
१० हिन्दुस्थान कमर्शिअल बँक लि.
११ इंडियन बँक लि.
१२ इंडियन ओव्हरसीज बँक लि.
१३ पंजाब नॅशनल बँक लि.
१४ स्टेट बँक ऑफ हैद्राबाद
१५ स्टेट बँक ऑफ इंडिया
१६ स्टेट बँक ऑफ जयपूर
१७ स्टेट बँक ऑफ म्हैसूर
१८ स्टेट बँक ऑफ त्रावणकोर
१९ युनियन बँक ऑफ इंडिया लि
२० युनायटेड बँक ऑफ इंडिया लि
२१ युनायटेड कमर्शिअल बँक लि
२२ अमेरिकन एक्स्प्रेस कंपनी इन्कॉर्पोरेटेड
२३ बँक ऑफ टोकियो
२४ ब्रिटिश बँक ऑफ दी मिडल ईस्ट
२५ चार्टर्ड बँक
२६ कॉम्प्टॉयर नॅशनल देसकॉम्प्टे द पॅरीस
२७ ईस्टर्न बँक लि
२८ फर्स्ट नॅशनल सिटी बँक ऑफ न्यूयॉर्क
२९ हबीब बँक लि.
३० हॉंगकॉंग ॲंड शांघाय बँकिंग कॉर्पोरेशन
३१ मर्कंटाईल बँक
३२ मित्सुई बँक
३३ नॅशनल बँक ऑफ पाकिस्तान
३४ नॅशनल ॲंड ग्रिंडलेज बँक लि.—पूर्वी लॉईड्स बँक स्वतंत्रपणे अधिकृत व्यवहारी बँक होती पण हल्लीं लॉईड्स बँकेच्या भारतातील शाखा या बँकेंत समाविष्ट आहेत
३५ नेदर्लॅंड्स ट्रेडिंग सोसायटी
३६ थॉमस कुक ॲंड सन्स (कॉंटिनेंटल ॲंड ओव्हरसीज) लि

बँक ऑफ चायनाही देखील अधिकृत व्यवहारी (बँक) होती पण २८ डिसेंबर १९६१ पासून तिचा हा परवाना रिझर्व बँकेनें काढून घेतलेला आहे.

या सर्व बँकांतर्फेच रिझर्व्ह बँक विदेशविनिमय व्यवहाराचें नियमन करीत असते.

सर्वसामान्य जनतेचा दैनंदिन व्यवहार सुकर व्हावा म्हणून रिझर्व बँकेनें विदेशविनिमयाच्या व्यवहार संबंधीचे बरेच हक्क अधिकृत बँकांना सुपूर्द केले आहेत. योग्य तो पुरावा बघून व कागदपत्रांची खात्री करून घेऊन त्या परकीय चलनाची गिऱ्हाइकाला लगेच खरेदीविक्री करूं शकतात असा पुरावा बवितल्याची व ज्या व्यवहाराबाबत चलन दिलें गेलें आहे तो अस्सल असल्याची खात्री पटल्याचें शिफारस-पत्र त्या बँकेला रिझर्व बँकेकडे पाठवावयाच्या प्रत्येक गिऱ्हाइकाच्या खरेदी अर्जावर द्यावे लागते. तसेंच अशा व्यवहारांबाबत वेगवेगळे तक्ते मागवून व त्यांचे अन्योन्य संबंध जोडूनही रिझर्वबँक या व्यवहारांची खात्री करून घेत असते. त्यामुळें अधिकृत बँकांना प्रत्येक व्यवहार करतांना आपल्याला दिलेल्या अधिकारांचा उपयोग आपल्या मर्यादेतच होत आहे ना हे बघण्याबद्दल जागरूक असावे लागते. या आंकड्यावरूनच रिझर्व बँक अनेकदां वेगवेगळी माहिती प्रसिद्ध करीत असते. कित्येकदां रक्कम अगदी लहान म्हणजे एक रुपया पेक्षांही जरी कमी असली तरी तो व्यवहार दिलेल्या मर्यादेंत बसत नसेल तर तो अर्ज बँकेला रिझर्व बँकेकडे पूर्वसंमतिसाठीं पाठवावा लागतो व त्यास सर्वसामान्यपणें मंजुरी मिळून तो परत येईपर्यंत सात ते चौदा दिवस लागत असतात. त्यामुळें खातेदारानें असे व्यवहार असतील तेव्हां, अगदी ऐनवेळीं घाई करण्यापेक्षां थोडा जास्त अवधि बँकेला दिल्यास व संपूर्ण माहिती व पुरावा प्रथमच दिल्यास त्याला निष्कारण हेलपाटे वा त्रास पडत नाहीं किंवा व्यवहाराच्या पूर्तीसाठीं दिरंगाई लागत नाहीं.

## विनिमय-व्यवहारी समिति :

या बँकांची जी विदेशविनिमयव्यवहारी समिती आहे ती रिझर्व बँकेच्या धोरणाची दखल घेऊन जनतेबरोबर बँकांनीं काय दरानें खरेदी-

विक्रीचे व्यवहार करावेत त्याचे दरपत्रक वेळोवेळीं ठरविते. या समितीला रिझर्व बँकेनेंही मान्यता दिली आहे. रिझर्व बँकेची विनिमयव्यवहाराची जेथें जेथें खातीं आहेत त्या सर्व ठिकाणीं म्हणजे–मुंबई, नवी दिल्ली येथें अशी समिती अस्तित्वांत आहे. अर्थात ही समिती फक्त पौंडाबाबतचेच वेगवेगळ्या व्यवहाराचे दर ठरवून देते. असे दर ठरवितांना ती रिझर्व बँकेचा सल्ला घेत असते. ड्राफ्ट, टी. टी, ट्रॅव्हलर्स चेक्स, आयात निर्यातीचीं बिलें (दर्शनी व मुदत हुंड्या या दोन्ही प्रकारची) याबाबत हे दर ठरवून दिले जातात. तसेंच वेळोवेळीं या दरांत परिस्थित्यनुरूप बदलही करण्यांत येतात. त्याचप्रमाणे या समितीने अन्य प्रकारच्या व्यवहाराबद्दलच्या आकाराचेही (Commission Rates) पत्रक केलेले आहे. परदेशी दिल्या जाणाऱ्या हम्या (Guarantees) उघडलीं जाणारीं हमीपत्रें (Letters of Credits) वटवलीं जाणारीं बिलें, याबाबतचे आकार व टपाल हंशील या बाबतचे तिचे कोष्टकानुसारच अधिकृत बँकांना आपल्या खातेदारांना दर लावावे लागतात. त्यामुळें या आकाराबाबत कुठल्याही दोन बँकांत फरक पडत नाहीं. मात्र पौण्डाखेरीज अन्य स्टर्लिंग विभागातील विदेशी चलनें किंवा नॉन स्टर्लिंग विभागांतील अन्य चलनें यांच्या खरेदी विक्रीचे दर मात्र अधिकृत बँकांतून थोडेसे वेगवेगळे असूं शकतात. मात्र हे दर आंतरराष्ट्रीय चलनविधिने घालून दिलेल्या परिमाणदराच्या दोन्ही बाजूला एक टक्याचे बाहेर जातां कामा नयेत एवढें बंधन त्यांचेवर असतें. उदाहरणार्थ लॅर्डसच्या व्यवहारांत असा दर पौण्ड व डॉलर याच्या २.७८ ते २.८२ या दोन टोकामध्यें, रुपयामध्यें काढावा लागतो. अर्थात खातेदार अशा दरांबाबत जागरूक असल्यानें दोन बँकाच्या दरांत त्यांतही प्रत्यक्षतः शेंकडा कांहीं नया पैशाहून फारसा फरक पडत नाहीं. तसेंच असा फरक मागणी किंवा पुरवठ्याच्या अनुसार पडत असला तरी अधिकृत बँकांना आपले व्यवहार समतोल ठेवण्यासाठी लंडन येथें खुल्या बाजारांत अन्य चलनांची खरेदी विक्री उत्कृष्ट दरानें करतां येते म्हणूनही त्यांत फारसा फरक पडूं शकत नाहीं.

## विनिमय व्यवहार :

विदेशविनिमयात ज्या ज्या बाबींवर नियम निर्बंध आहेत त्या खालील प्रमाणें आहेत.

( १ ) विदेशी चलनाची खरेदी विक्री वा त्यातील अन्य व्यवहार.

( २ ) विदेशी चलनाची तसेच भारतीय चलनाची आयात, निर्यात.

( ३ ) सिक्युरिटीज, चेक्स, ड्राफ्ट, शेअर्स, प्रवासी चेक वगैरेची निर्यात.

( ४ ) भारतीय रुपयातील असलेल्या अस्थायिकाचे खात्यावरील जमा नावे व्यवहार.

( ५ ) अभारतीय व अस्थायिक भारतीयानी करावयाची शेअर्स, सिक्युरिटीजची खरेदीविक्री.

( ६ ) सोने, चांदी, जडजवाहीर याची आयात निर्यात.

या व्यवहारामुळें वस्तूच्या आयातीबद्दल द्यावयाचे विदेशी चलनाचे व्यवहार, निर्यातीबाबत मिळावयाचे चलनाचे व्यवहार, आयातीखेरीज विमा, प्रवासाकार, वा अन्य कारणासाठीं बाहेर पाठवावें लागणारें चलन, किंवा भांडवली व्यवहारामुळेही बाहेर पाठवावें लागणारे चलन, व निर्यातीखेरीज अन्य जमा म्हणून येणारा विदेशविनिमय व भांडवली गुंतवणूक वगैरेसाठा येणारी विदेशी चलनाची जमा याच्यावरही रिझर्व बँकद्वारा विनिमय नियत्रण आपली पकड ठेवते तसेच या विदेशविनिमय नियमन कायद्याची, सन १९४७ च्या, वस्तूची निर्यात व आयात यांचें नियमन करणाऱ्या कायद्याशीं व अन्य कांही कायद्याशीं देखील सांगड घातली गेली आहे. त्यानुसार आयातनिर्यात नियमन कायदा, प्राप्तीकर कायदा, निर्वासिताच्या मालमत्तेबद्दलचा कायदा आणि शत्रू राष्ट्रांशीं करावयाच्या व्यापाराबाबत केलेले नियम याचा भग होईल असें कुठलेंही कृत्य, केवळ विनिमयनियत्रणाचे कायद्यानें संमत असले तरी तेवढ्यापुरतें असंमत समजलें जातें.

विदेशविनिमयाचे दर, कमिशन वगैरे बाबतचे व्यवहारात एकसूत्रीपणा असावा म्हणून भारतातील अधिकृत बँकानी विदेशविनिमय व्यवहारी

समिती ( Foreign Exchange Dealers Association. ) स्थापन केली आहे. या फॉरेन एक्स्चेंज डीलर्स असोशिएशनतर्फे हमीपत्रें उघडणें, कळवणें, तारवदली रक्कम पाठवणें, वसुलीसाठीं दस्तऐवज पाठवणें वगैरे सर्व व्यवहारांचे सर्वमान्य आकार ठरवले गेले आहेत. वेगवेगळे कागदपत्र, ड्राफ्ट, चेक्स, दस्तऐवजी बिलें वगैरे व्यवहारांचे बाबतीतले पौंडाची खरेदीविक्री करण्याचे दर ही या संस्थेनें ठरवले आहेत. पौंडाखेरीज अन्य चलनाबावत बँकाना स्वतःची परिस्थिति ( Position ) व मागणी पुरवठ्याचे तत्व लक्षांत घेऊन गिन्हाइकाबरोबरचे खरेदीविक्रीचे दर ठरविण्याची मुभा आहे. बँकांचे अन्य बँकांशीच होणाऱ्या अंतर्गत व्यवहारांत ऱ्या दरापेक्षां थोडेसे सवलतीचे दर सांगितले जातात. अन्य चलनांच्या दरांत मागणीपुरवठा बघून दर कमी जास्त करण्याची अधिकृत बँकांना मुभा असते, तरी ते दर मात्र बँक ऑफ इंग्लंडचे त्या त्या चलनाचे बाबत खरेदी करण्यासाठीं किंवा विक्रीसाठी स्वतःचे जे अधिकृत दरांची मर्यादा ठरविली आहे त्या खरेदी–विक्रीचे दोन दरामध्येंच असावे लागतात. अधिकृत बँकांना पौंड खरेदी करावयाचे असले व चलन बाजारांत पुरवठा होत नसला तर त्या चलनाची विक्री त्याना रिझर्व बँकेनर्फे २५००० पौंडाचे पटींत एका ठराविक दरानें होऊं शकते. तसेंच जवळची शिल्लक जास्त झाल्यानें त्यांना असे पौंड विकावयाची जरुरी वाटल्यास व चलन बाजारांत कुणी खरेदीदार नसल्यास रुपयांस १ शिलिंग ६ पेन्स, या भारत व ब्रिटनमधील चलनाचे सध्याचे अधिकृत सरकारी दरानें ते २५००० पौंडाचे पटीन रिझर्व बँकेला त्यांचेकडून विकत घेण्याचे बंधन आहे. या खरेदी विक्रीच्या पाठीमागें, रिझर्व बँकेवर देशांतील अंतर्गत व्यवहारांतील स्थिरता व बाह्यव्यवहारांतील स्थिरता ठेवण्याची जी जबाबदारी आहे, ती पार पाडण्याचाच उद्देश असतो. त्यांत नफा-तोटा करण्याचें धोरण नसते. भारत हा 'आंतरराष्ट्रीय चलननिधि'चा सदस्य असल्यानें त्या निधिच्या कांहीं कलमाचें बंधन भारतावर आहे. त्यानुसार चलनाची किंमत स्थिर ठेवणें हे रिझर्व बँकेचें कर्तव्य आहे. १९४९ सालीं पौंडाबरोबरच आपल्या रुपया-

चेंही अवमूलन करण्यात आल्याने आतरराष्ट्रीय चलननिधिच्या कलमाप्रमाणें पूर्वी भारतीय रुपयाच्या विनिमयाचा दर, (Exchange Ratio) दर रुपयास शभर नवरी ४.१४५ ग्रेन सोनें (Fine Gold) असा होता. तो १९४९ पासून दर रुपयास २.८८० ग्रेन सोनें इतका झाला आहे. जगातील तीन महत्वाच्या चलनाचे बरोबर त्याची तुलना करता, एक रुपया हा अमेरिकन (सयुक्त सस्थानाचा) डॉलरच्या २१ सेंट बरोबर आहे, तर पौंडात त्याचें मूल्यमापन एक रुपया बरोबर १ शिलिंग सहा पेन्स इतके होते. पश्चिम जर्मनीच्या मार्कशीं त्याची तुलना करता १ रुपया बरोबर ८४ फेनिग किंवा १०० रुपये बरोबर ८४ मार्क हा दर पडतो. भारतीय रुपयाची अधिकृत किंमत अन्य राष्ट्रातील चलनाच्या काय प्रमाणात आहे त्याचा तक्ता शेवटीं एका परिशिष्टात दिला आहे.

भारतीय 'विदेशविनिमय नियमन' कायद्यान्वयें विदेशी चलनाच्या व्यवहाराबाबतचे दर रिझर्व बँकेनें वेळोवेळीं ठरवून दिलेल्या दरापेक्षा कमीजास्त असता कामा नयेत. कारण भारत हा आतरराष्ट्रीय चलननिधिचा सदस्य आहे व सदस्य राष्ट्रावर आपले चलनाचें बाह्य स्थैर्य राखण्याची जबाबदारी असते. त्या जबाबदारीनुसार, निधिचे सदस्य असलेल्या कुठल्याही राष्ट्राला, चलननिधिला कळवलेल्या समान दरापेक्षा (Parity Rate) एक टक्क्याचेवर खपातराचा दर कमी किंवा जास्त करता येत नाहीं. एक टक्क्यापर्यंत असा बदल ग्राह्य आहे. पण त्यापेक्षा जास्त बदल करावयाचा असल्यास ह्मणजेच चलनाचे अवमूल्यन या पुनर्मूल्यन करावयाचे असल्यास त्याची कारणें 'निधि' ला पटवून देऊन निधिची समति घ्यावी लागते. १९४९ साली अवमूल्यन केलेल्या राष्ट्राना चलननिधिकडून अशी परवानगी घ्यावी लागली होती. अधिकृत व्यवहारी, अन्य लोकाकडून, आपापसात किंवा रिझर्वबँकेकडून पौंडाचें चलन विकत घेऊ शकतात किंवा विकूं शकतात हें सागितलेंच आहे. पौंडाखेरीज दुसऱ्या चलनाची जर अधिकृत बँकाना जरूरी लागली व भारतात ते मिळत नसले तर वेळ पडल्यास अधिकृत बँकाना हे परदेशी चलन काहीं अटीवर लडन मधील आतरराष्ट्रीय

चलनाचे बाजारांत आपापल्या विदेशी प्रतिनिधीतर्फे पौंडाचे बदली खरेदी करण्यासाठी रिझर्व बँकेची संमति आवश्यक असते. तसेंच त्या चलनाची अधिकृत बँकेला खऱ्या व्यापारी कारणासाठीं जरूरी असावी लागते. हे चलन नॉनस्टर्लिंग विभागातील बदली शक्यतेच्या राष्ट्रविभागांतील म्हणजे ऑस्ट्रिया, बेल्जम, कॅनडा, डेन्मार्क, पश्चिम जर्मनी, फ्रान्स, इटली, पोर्तुगाल, हॉलंड, नॉर्वे, पनामा, फिलिपाईन्स, स्वीडन, स्वित्झर्लंड, संयुक्त संस्थानें (अमेरिका) यांचें पैकीच असावें लागतें व त्या खरेदीपोटीं लंडनमधील बँकेच्या खात्यातील पौंडाचे चलनांत किंवा रुपयांतच प्रदान (Payment) करावें लागते.

बँकांनी गिऱ्हाइकांना विदेश-विनिमयाची विक्री करतांना, ती खऱ्या वैध व व्यापारी कारणासाठींच होत आहे अशी खात्री करून घ्यावी लागते. तसेच एकदां विक्री केल्यावर योग्य कारण दाखवल्याखेरीज ती विक्री रद्द करता येत नाहीं. या विक्रीचा व खरेदीचाही संपूर्ण हिशोब सर्व बँकांना ठराविक काळानें ठराविक तत्त्यानुसार विनिमय-नियंत्रण खात्याकडे द्यावा लागतो.

## विनिमय-नियंत्रण खातें :

रिझर्व बँकेंत विदेशविनिमयाच्या व्यवहारासाठीं एक स्वतंत्र विनिमयनियंत्रण खातें ठेवण्यांत आलें आहे.

या विनिमयनियंत्रण खात्याच्या व्यवहारांसाठीं रिझर्व बँकेचा गव्हर्नर हाच नियंत्रक म्हणून गणला जातो, खात्यांतील प्रत्यक्ष कामकाजासाठीं एक उपनियंत्रक नियुक्त केलेला असतो आणि त्याला दोन सहाय्यक अधिकाऱ्यांची मदत असते. विनिमयनियंत्रण खातें हे सोयीसाठी सर्व भारतांत सहा भागांत विभागण्यांत आलें आहे. त्याची मुख्य कचेरी मुंबईला आहे व शिवाय त्या खात्याच्या कचेऱ्या नवी दिल्ली, कलकत्ता, मद्रास आणि कानपूर व अहमदाबाद, येथेंही आहेत भारतांतील वेगवेगळ्या प्रांताची व प्रदेशाची त्याच्यांत पुढील प्रमाणें विभागणी करण्यांत आली आहे.

मुंबई—महाराष्ट्र राज्य.

अहमदावाद—गुजराथ (हा विभाग नव्यानेंच सन १९६२ मध्यें सुरुं झालेला आहे) तत्पूर्वी त्याचे काम मुंबईहून बघितले जात होतें.
नवी दिल्ली—दिल्ली व हिमाचल प्रदेश, पंजाब, राजस्थान व जम्मूसह काश्मीर.
कलकत्ता—पश्चिमबंगाल, बिहार, ओरिसा, आसाम, मणिपूर व त्रिपुरा संस्थानें, नागालँडस, अंदमान व निकोबार बेटें.
मद्रास—मद्रास प्रांत, आंधप्रदेश, म्हैसूर, केरळ, लखदिव, मिनिकॉय व अमिनदिवी बेटें.
कानपूर—उत्तरप्रदेश व मध्यप्रदेश

या निरनिराळ्या प्रांतातील अधिकृत बँकांना त्यांच्या विभागांतील संबंधित कचेऱ्यांकडे आपले तक्ते वेळोवेळीं पाठवावे लागतात. तसेंच त्यांना किंवा इतर व्यक्ती व संस्थाना पूर्वमंजूरीसाठीं करावे लागणारे अर्ज त्या त्या विभागीय कचेरीकडे पाठवावे लागतात. विनिमयनियंत्रणाची मुख्यकचेरी जरी मुंबईला असली तरी महाराष्ट्रासाठीं त्यांतच एक वेगळें पोटखातें काम करतें. मुख्यकचेरीच्या दैनंदिन व्यवहाराशीं त्याचा कुठलाही संबंध नाहीं व मुख्य कचेरीकडे पूर्वसंमती वगैरे दैनंदिन व्यवहाराचे कुठलेही अर्ज पाठवावयाचे नसतात. वरील विभागीय कचेऱ्यांसाठीं सहाय्यक नियंत्रक (Assistant Controller) नावांच्या अधिकाऱ्यांची नेमणूक केलेली आहे व त्यांचे नांवे सर्व अर्ज करावयाचे असतात.

विदेशविनिमयखात्याच्या मुख्य कचेरीचें काम, विदेशविनिमयव्यवहारावर योग्य नियंत्रणें घालून, ते नियमित करणें हा आहे. त्यांत प्रत्यक्ष चलन, कर्जरोखे यांचाही समावेश होतो. भारताबाहेर जाणारें कुठलेंही अर्थप्रदान किंवा भारतात होणारी चलनाची (नोटा व नाणीं,) कर्जरोख्यांची वा अन्य मौलिक कागदपत्रांची, सोन्याचांदीची तसेंच मौल्यवान खड्यांची व जडजवाहिराची होणारी आयात तसेंच या सर्व बाबींची व गालीचे व अन्य मौल्यवान दुर्मिळ वस्तू यांची भारतातून होणारी निर्यात व अस्थायिकांना दिले जाणारे भारतीय चलन व त्यांच्या खात्यांचे वर्गव्यवहार (Transfer), यांचा समावेश होतो. विदेशविनिमयाचा व्यवहार अधिकृत बँकाखेरीज इतरांना

( कांहीं थॉमस कुक सारख्या मान्य केलेल्या दोन तीन संस्थांचे अपवाद सोडून ) करतां येत नाहीं, किंवा रिझर्व बँकेने वेळोवेळीं ठरवलेल्या दोन चलनांतील रुपांतराचे दरापेक्षां वेगळ्या दराने खरेदी किंवा विक्रीही प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे इतराना अनधिकृतपणें करतां येत नाहीं. या अधिकृत बँकाखेरीज आणखी कांहीं लोकांना ( Authorised Money Changers ) अधिकृत चलनाचे बाबत मर्यादित अधिकार दिले गेले आहेत. अशा संस्था किंवा व्यक्ती फक्त विदेशी नोटा व नाणी या बाबतचाच खरेदी विक्रीचा व्यवहार करुं शकतात; दुसरा नाही. तसेच कांहीं बँकाना फक्त स्टार्लिंगच्याच व्यवहारांचा परवाना आहे, पण बहुतेक अधिकृत बँकांना सर्व तऱ्हेचा व्यवहार करण्याची परवानगी आहे. अधिकृत बँका असा व्यवहार करताना एकेमकांत अनिष्ट स्पर्धा होऊ नये याची काळजी घेतातच.

कुठलाही विदेशी चलनाचा व्यवहार ज्यांत अभिप्रेत आहे असा व्यवहार करण्यापूर्वी प्रत्येक व्यक्तीने अधिकृत बँकेत जाऊन त्याबाबतचे चालू नियम काय आहेत याची माहिती करून घेणें योग्य ठरते. कुणाही भारतीय व्यक्तीला अस्थायिक किंवा अभारतीय व्यक्तीला कुठल्याही प्रकारे भारतीय चलनावरील किंवा मौलीक दस्तऐवज, शेअर्स, कर्जरोखे यांवरील आपले हक्क रिझर्व बँकेच्या सर्वसामान्य परवानगी शिवाय (अधिकृत बँकांना सुपूर्द केलेल्या अधिकारांत बसणाऱ्या ) किंवा खास पूर्वसंमतीशिवाय तबदील करतां येत नाहींत. कांहीं वेळां अधिकृत बँकांकडे माहितीपत्रके पाठवून रिझर्व बँक अशी सर्वसामान्य संमति जाहीर करते तर कांहीं वेळेला भारतीय गॅझेटमध्ये योग्य ते नोटिफिकेशन देऊनही ती जाहीर करण्यांत येते. चलनावरील कुठल्याही हक्काची व्यवस्था, अशा कलमांचा भंग होईल अशा रितीनें किंवा तीं टाळलीं जातील अशा प्रकारे करतां येत नाहीं. त्याचप्रमाणें ज्यायोगे अस्थायिक व्यक्तींचा भारतीय रुपयांवर हक्क निर्माण होईल अशा प्रकारचे कुठलेही व्यवहार उपरनिर्दिष्ट पूर्वपरवानगीखेरीज करतां येत नाहींत. मालाची निर्यात करून त्याबदली पैसे न घेतां दुसऱ्या मालाची आयात करणे, त्यासंबंधींच्या कमिशन वगैरेची रक्कम परदेशांत ठेवणें, परदेशांत परवानगी-

शिवाय अभारतीय चलनातील खातीं ठेवणें, अभारतीय व्यक्तींशी भारतीय हितसंबधाच्या आड येईल असे करार करणे, भारताबाहेर चेक्स किंवा हुड्या परस्पर पाठविणें, स्वत ला मिळालेले परकीय चलन बेकायदा आपलेजवळ ठेवणे किंवा उशीरा अधिकृत बँकेकडे रुपातरासाठीं देणें, किंवा भारता-बाहेर परवानगीशिवाय रक्कम गुतविणे वगैरे सर्व व्यवहार अवैध ठरवण्यात आले असून त्याची माहिती मिळाल्यास विदेशविनिमयनियंत्रण कायद्यान्वयें त्या व्यक्तिवर कायदेशीर इलाज योजण्यात येउन ती व्यक्ती दडनीय ठरते. अशा बेकायदेशीर व्यवहारावावतच्या निर्णयासाठी अर्थखात्याच्या शासना-खालीं डायरेक्टोरेट ऑफ एनफोर्समेंट नावाचे एक स्वतंत्र खाते काम करीत असते. त्याची मुख्य कचेरी नवी दिल्ली येथे आहे. व त्याच्या शाखा मुंबई, मद्रास व कलकत्ता येथे आहेत. एका स्वतंत्र संचालकाच्या हाताखालीं हें खातें काम करीत असते. कुठल्याही निर्बंधभंगाबाबत (जर रिझर्व बँकेच्या अधिकारात वसत असेल व तिच्याकडून त्याची माफी मिळाली नसेल तर) माहिती मिळताच हे खाते त्याची संपूर्ण चौकशी करते आणि अशा चौकशीनतर तो गुन्हा शाबीत झाला असेल तर त्यासाठीं डायरेक्टर ऑफ एन्फोर्समेंट या वरील अधिकाऱ्याला, दडाची शिक्षा फर्मावितां येते. असा दड विदेश-विनिमयाची जितकी रक्कम त्या व्यवहारात असेल त्याच्या तिप्पट इतक्या मर्यादेपर्यंत किंवा रुपये ५००० पर्यंत या दोहोंतील जी रक्कम जास्त असेल तितका, तो ठोठावू शकतो. ही शिक्षा मान्य नसेल तर गुन्हेगाराला या निर्णयावर एका 'अपेलेट बोर्डा' कडे अपील करता येते. या अपेलेट-बोर्डावर दोन सभासद असतात व त्याची नियुक्ती सरकारतर्फे होते. अपीलावर निर्णय दिल्यानंतर तो दड किंवा अपील न केल्यास डायरेक्टरने केलेला दड याची रक्कम जर कायदा मोडणाऱ्याने भरली नाहीं तर त्यावर कोर्टात खटला होतो. त्याचप्रमाणें गुन्ह्याचे स्वरुप बरेंच गंभीर असेल व डायरेक्टरचे मतें त्याच्या अधिकारात दिली जाऊ शकणारी दडाची शिक्षा कमी असेल व पुरेशी नसेल तर ती वाढवण्यासाठीं तो कोर्टाकडे तक्रार-अर्ज करुं शकतो. असा अर्ज चौकशीचे कुठल्याही वेळीं त्याला करतां येतो.

कायद्याचा भंग केल्याबद्दल वरील पैकीं कुठल्याही कारणामुळे खटला जर कोर्टात गेला तर गुन्हा शाबीत झाल्यावर कोर्टाला दंड आणि दोन वर्षांचा तुरुंगवास किंवा दोन्हीही, इतकी शिक्षा आरोपीला करतां येते.

वरील सर्व बाबींचा विचार केल्यावर विदेशविनिमयाचा व्यवहार कराव्या लागणाऱ्या संबंधितानी काय काळजी घेणे आवश्यक असते याची कल्पना येईल व त्याप्रमाणे परिपालन केल्यास अशा कायद्याचा अज्ञानाने देखील भंग होणार नाहीं. राष्ट्राचे हितास कुठलाही बाध न येता विदेश-व्यवहारांत जास्त सुकरता येण्यासाठीं अधिकृत व्यवहारी, ग्राहक, व खातेदार यांचे सहकार्य अत्यावश्यक आहे. अधिकृत बँकेचे काम सुकर करण्याचे दृष्टिनें वरीचशी माहिती संबंधित व्यक्तींनी, संस्थांनी आपण होऊन दिल्यास या व्यवहारांची उकल लौकर होऊं शकते.

# नियंत्रणाचे फॉर्मस्

१७

## विदेश विनिमय खरेदीचा अर्ज—'ए' फॉर्म :

कुठल्याही बाबत ज्यावेळीं विदेश-विनिमय खरेदी करावयाचे असते, उदाः— आयातीची किंमत देण्यासाठीं, परदेशी मासिके, संस्था, यांची वर्गणी भरण्यासाठीं, परदेशांत दिलेल्या जाहिराती वगैरेची बिले देण्यासाठीं, परकीय प्रतिनिधीचे कमिशन किंवा पगार देण्यासाठीं किंवा देणगी म्हणून पैसे पाठवण्यासाठीं वगैरे, त्यावेळीं खरेदीदाराला रिझर्व बँकेकडे अधिकृत बँकेमार्फत एक अर्ज करावा लागतो. पुष्कळ वेळां त्याची तपासणी करून तो योग्य त्या सांच्यांत बसणारा असेल तर अधिकृत बँकेला त्या अर्जाची मंजुरी स्वतःच देतां येऊन लगेच योग्य ते परकीय चलन अर्जदाराला विकतां ही येते. म्हणजेच त्याच्या वसुलीसाठी आलेल्या बिलाची रक्कम आयात परवान्यावर आवश्यक ती नोंद करून निर्यातदाराकडे, पाठवतां येते. किंवा त्या वर्गणीच्या वगैरे रक्कमेचा ड्राफ्ट वर्गणीदाराला देतां येतो किंवा त्या त्या मासिकाकडे / संस्थेकडे पाठवतां येतो. कित्येकदां कांहीं लहान गोष्टीसाठीं, उदाहरणार्थ गत वर्षांच्या प्रश्नपत्रिकासाठीं, कॉलेज वगैरेच्या प्रवेशासाठीं जे किरकोळ पैसे द्यावे लागतात, किंवा भाउबीज, वाढदिवस यासाठीं जी भेट पाठवावयाची असते त्यासाठीं रिझर्व बँकेची परवानगी लागते. याबाबत अधिकृत बँकेकडे अधिकार नसतात. पण याची अर्जदाराला कल्पना नसते. अशा चलनखरेदीची परवानगी घेण्यासाठीं तो खरेदीफॉर्म रिझर्व बँकेकडे पाठवावा लागतो. *चलनखरेदीच्या कुठल्याही व्यवहारासाठीं असा फॉर्म भरावा लागतो.* ही खरेदी ज्या तऱ्हेची असेल त्या तऱ्हेचा वेगवेगळा फॉर्म या बाबत भरावा लागतो. असे फॉर्मस सर्वसाधारणपणें पांच प्रकारचे आहेत. (१) ए फॉर्म

(२) एस. ए वन फॉर्म (३) ए सिक्स फॉर्म. (४) ए. एट फॉर्म. (५) ए. सेव्हन फॉर्म

## ए फॉर्म (A):

ज्यावेळेला पाठवावयाची रक्कम, ज्याला पाठवावयाची आहे त्याच्याच देशाच्या चलनांत द्यावयाची असेल त्यावेळेला हा फॉर्म भरावा लागतो. उदाहरणार्थः—अमेरिकेतील व्यक्ती / संस्थेला डॉलर मध्यें, ग्रेटब्रिटनमध्यें पौंडांत, स्वित्झर्लंडमध्यें स्विस फ्रॅंकमध्यें, जर्मनीत मार्कमध्ये अशी रक्कम द्यावयाची असेल तर खरेदीदाराला हा फॉर्म भरावा लागतो. त्यांत किती पैसे द्यावयाचे, कुणाला द्यावयाचे व कशाबद्दल द्यावयाचे याची माहिती व स्वतःचा पत्ता, ही माहिती स्वाक्षरीवर द्यावी लागते. देणें रक्कम कुठल्यातरी आयातीसाठीं असेल तर त्या आयातीतल्या मालाचे वर्णन, माल किती आहे, तो कुठल्या बोटीनें कधी व कुठल्या आयात परवान्याखालीं आला आहे हे लिहावे लागते. तसेच फॉर्मचे पाठीमागें, ही आयात वैध आहे, त्यासाठीं परवाना काढला आहे अथवा ती मुक्त परवान्याखालीं आहे, व त्याबाबतचे पैसे आगाऊ पाठवले जात असतील तर तीन महिन्याचे अवधीत तो माल आल्याचा पुरावा म्हणून पोस्ट पार्सलनें आल्यास वरचे रॅपर किंवा बोटीनें आल्यास जकातीतून माल सोडवण्याचे वेळीं दिली जाणारी बिल ऑफ एंट्री, विनिमय नियंत्रणाकडे सादर केली जाईल म्हणून प्रतिज्ञापत्र (फॉर्मच्या पाठींमागेच छापले असलेले) लिहून द्यावे लागते. चलन खरेदी जर प्रवासाचे निमित्तानें असेल तर प्रवासाचे तिकीट काढल्याचे, व नोटा, ड्राफ्ट, वा प्रवासी चेक यांपैकीं कुठल्या स्वरूपांत किती किती चलन नेले जात आहे त्याची माहिती द्यावी लागते. प्रवासी व्यक्तीलाही आयातदाराप्रमाणें ए फॉर्मचे पाठीमागे छापलेले एक प्रतिज्ञापत्रक पुरे करून द्यावे लागते. व त्या अन्वयें, खरेदी केलेले चलन, मी तें ज्या देशातील प्रवासखर्च या व्यावसायिक खर्चासाठीं दिले गेले आहे, त्याच कारणासाठीं खर्च करीन व उरलेलें चलन परत आल्यावर अधिकृत बॅंकेला विकीन असे लिहून द्यावे लागते. आयात किंवा प्रवास यांखेरीज वेगळ्या कारणा-

साठीं जर चलन खरेदी होत असेल तर ए फॉर्मचे पुढील भागावर असलेल्या 'सी' या तिसऱ्या कॉलमखालीं 'रिझर्व बँक परवान्यान्वये अमुक कारणासाठीं अधिकृत खरेदी, किंवा वाढ दिवस भेट, अमक्या परीक्षेची फी, एकाद्या मासिकाची / अमक्या संस्थेची वार्षिक वर्गणी असा खुलासा किंवा कारण द्यावें लागते, व पूर्व संमति आवश्यक असेल तर त्या बाबतचा पुरावा विनिमय नियंत्रणाचे खात्रीसाठीं जोडावा लागतो. तसेच १००० पौंड किंमतीवरील ब्रिटनमध्ये निर्माण झालेली मशिनरी वा तिचे भाग आयात होत असतील तर ए' फॉर्मची दुय्यमप्रत ब्रिटनमधील आपल्या हायकमिशनकडे पाठवावी लागते व तसा शेरा मूळ ए फॉर्मवर अधिकृत बँकेला द्यावा लागतो

**एस. ए. वन फॉर्म** (S A 1)

स्टर्लिंग पौंडाची रक्कम जर ग्रेटब्रिटनमध्ये पाठवायची असेल तर त्यासाठीं 'ए' फॉर्म भरून द्यावा लागतो. पण स्टर्लिंग हे एक आंतरराष्ट्रीय चलन असल्यानें अनेक राष्ट्रांना स्टर्लिंगमधील व्यवहार चालतात. स्वित्झर्लंड, हॉलंड, आफ्रिका, प. जर्मनी येथील व्यापारी निर्यातीपोटीं स्टर्लिंग पौंडात हुंडी काढून तिचे पैसे ग्रेटब्रिटनमध्यें ठेवलेल्या नॉनरेसिडेंट खात्यात जमा करण्याची सूचना देऊं शकतात. ग्रेट ब्रिटननें स्टर्लिंगच्या आंतरराष्ट्रीय वापरास प्रतिष्ठेमुळें मान्यता दिलेली असली तरी त्या चलनावर ताण पडूं नये वा त्याची किंमत घसरूं नये म्हणून विनिमयनियंत्रण ठेवलेले आहेच. त्यानुसार त्यांनीं स्टर्लिंग विभाग म्हणून कॉमनवेल्थ राष्ट्रें व अन्य काहीं राष्ट्रें यांचा एक विभाग जाहीर केला आहे. याच विभागाला हल्लीं सूचित प्रदेश (Scheduled Territories) *असें नाव दिलेले आहे. या सूचित प्रदेशातील व्यक्ती, संस्था व बँका यांनीं* ग्रेटब्रिटनमध्यें ठेवलेल्या पौंडाचे खात्यास 'स्थायिक खातीं' (Resident A/cs) म्हणून संबोधिले जाते व उरलेल्या राष्ट्रांच्या पौंडी खात्यांना अस्थायिक खातीं म्हणून म्हटले जाते. सर्वसाधारण नियम म्हणून कुठल्याही स्थायिक खात्यावून अस्थायिक खात्यात रक्कम जमा करण्यासाठीं परवानगी नाहीं. पण त्या अस्थायिक व्यक्ती, संस्था यांना पौंडाच्या बदली त्याच अस्थायिक राष्ट्राचे चलनात प्रदान करण्याला सर्वसाधारण ज्या ज्या

व्यवहारांत ब्रिटीश सरकारनें परवानगी दिली असती, त्या त्या प्रकारच्या म्हणजे चालू (Current) व्यवहारासाठीं अस्थायिक खात्यांना पौंडांत जमा करण्यासाठीं अशी बदली (Transfer) दिली जाते.

भारतांत जेव्हां अशी स्टर्लिंगची विक्री केली जाते व धारक ती रक्कम आपल्या बाह्य खातीं (External A|cs) ब्रिटनमध्यें जमा मागतो तेव्हां भारतीय व ब्रिटीश विनिमयनियंत्रण या दोघांनाही त्या व्यवहाराची जाणीव तो संमत प्रकारचा असल्यास चावी लागते, नसल्यास त्याची भारतीयनियंत्रणाकडून परवानगी घ्यावी लागते. थोड्याफार फरकानें हीच पद्धत अस्थायिकाना पौंडांत रक्कम देण्यासाठीं, सर्व सूचित देशविभागांत जारी आहे. भारतांत त्यासाठीं ए फॉर्म ऐवजीं एस. ए. वन हा गुलाबी फॉर्म दोन प्रतीत भरला जातो. स्टर्लिंगमध्यें किंवा कुठल्याही स्टर्लिंग विभागाच्या देशांचे चलनांत जर ब्रिटनच्या व्याख्येप्रमाणें असणाऱ्या अस्थायिकांचे खात्यांत ब्रिटनमध्यें किंवा ब्रिटनप्रमाणेंच अन्य स्टर्लिंग विभागांतील देशांतही, पैसे द्यावयाचे असतील तरीही एस. ए. वन फॉर्मच भरावा लागतो.

भारतांतील आयातदारावर जर स्विस निर्यातदारानें पौंडांत बिल काढलें व ती रक्कम आपल्या किंवा आपल्या बँकेच्या ब्रिटनमधील खात्यांत जमा करावयास सागितली तर आयातदाराला 'एस. ए. वन' हा फॉर्म दोन प्रतीत भरावा लागेल. त्यातील दुय्यम प्रत रिझर्व बँकेकडे 'ए' फॉर्म प्रमाणेच संमत व्यवहारानंतर किंवा पूर्वसमतिसाठीं पाठवावी लागते व नंतर मूळ प्रत अधिकृत व्यवहारी (बँक) आपल्या इंग्लंडमधील बँकेकडे भारतीयनियंत्रणानें संमति दिलेला व्यवहार म्हणून पाठवली जाते. एक लाख रुपयाचे पेक्षां जास्त किंमतीचा परवाना असेल तर त्या खरेदी-नंतर, किती रक्कम शिल्लक आहे, हेही त्या फॉर्ममध्यें लिहावें लागते.

या फॉर्मवर दोन्ही प्रतीत इंग्लंडमधल्या कुठल्या बँकेच्या कुठल्या भारतीय खात्यांतून, इतर असूचित देशांतील रहिवाशाच्या कुठल्या खात्यांत रक्कम जमा व्हावयाची आहे याची माहिती देऊन मग ती कशासाठीं जमा व्हावयाची याबद्दलची माहिती ए फॉर्म प्रमाणें त्याच तऱ्हेच्या असलेल्या कॉलममध्यें द्यावी लागते व आयात / प्रवास, यासाठीं द्यावे लागणारे प्रतिज्ञा-

पत्रकावरही सही द्यावी लागते. अशा एस. ए. वन अर्जाचा विचार करताना त्या राष्ट्राला त्याचे चलनात पैसे देण्यासाठीं ए फॉर्म भरला गेला असता तर जो विचार केला गेला असता तोच विचार भारतीय नियत्रण करते.

## 'ए सिक्स' (A 6):

ज्यावेळेला अधिकृत बॅक एकादे चलन सरळ (Direct) विकण्याऐवजी, आपल्या स्टर्लिंग शिल्केच्यापोटीं लडनच्या बॅकेला दुसरे चलन विकावयाला सागते त्यावेळी खरेदीदाराला हा फॉर्म भरावा लागतो. याच्याही दोन प्रती भराव्या लागतात. व एस. ए. वन फॉर्म-प्रमाणें त्याची एक प्रत लडनच्या विनिमय नियत्रणाच्या कचेरीच्या दप्तरासाठीं पाठवावी लागते. अनेकदा अधिकृत बॅकेला जगातील प्रत्येक देशातून खाते ठेवणें शक्य नसते व जरुर नसते. त्यावेळेला अशा फॉर्मची निकड भासते. उदाहरणार्थ.—डेन्मार्क मधील एकाद्या सस्थेची वर्गणी एकाद्या भारतीय सदस्याला डॅनिश क्रोनर मध्यें भरणें झाल्यास व तो ज्या अधिकृत बॅकेमार्फत व्यवहार करू इच्छितो तिचे असे क्रोनरचे खाते नसल्यास ती आपल्या ब्रीटिश प्रतिनिधी बॅकेला तितके क्रोनर डेन्मार्कमध्ये देण्याची व्यवस्था करण्याचे व त्या क्रोनरची त्या दिवशीं लडन बाजारात स्टर्लिंग पौंडात जी बरोबरीची किंमत होत असेल तितके पौंड तिच्या खातीं नावे लिहण्याचे कळवील. म्हणजेच खरेदीदाराची क्रोनरची ही खरेदी सरळ न होता पौंडाचे बदली होते व ही चलनखरेदी इथे न होता लडनमध्यें होते.

## 'ए एट' (A 8):

भारतातील अधिकृत बॅकाना ग्रेटब्रिटन सोडून परदेशातील अन्य बॅकातील आपल्या खात्यात, दैनदिन व्यवहारासाठीं शिल्लक ठेवण्यासाठीं जर ते चलन खरेदी करावयाचे असले तर ते लडनबाजारात खरेदी करता येते. असे चलन पुष्कळ वेळेला भारतात अन्य बॅकाकडून मिळू शकत नाही. त्यामुळे तें लडनला खरेदी करण्याखेरीज गत्यतर नसते. लडन, पॅरीस, फॅंकफुर्ट, कोपेनहेगन, मिलान, ह्या युरोप-मधल्या बहुतेक सर्व चलने मिळण्याच्या पेठा आहेत व तिथे सर्व चलनाची

खरेदी विक्री सारखी चालू असते. पैकीं भारतीय बँकांना लंडनबाजारांत स्टर्लिंग देऊन वर लिहिल्याप्रमाणें क्रोनर, सर्व प्रकारचे फ्रॅंक्स, मार्कस, गिल्डर्स, लिरा वगैरे चलन खरेदी करतां येते. पण त्यासाठीं बँकाना ए. एट. हा फॉर्म भरावा लागतो. व अशी खरेदी कां आवश्यक झाली याबद्दल आपल्या हमीपत्रांच्या रकमेचे व शिलकी रकमेचे आंकडे देऊन त्यासाठीं रिझर्व बॅंकेची अनुमति घ्यावी लागते. पूर्वीं, याबाबत खरेदी पूर्वीच अशी संमति घ्यावी लागत होती. पण आतां अशी खरेदी करून नंतर त्याच दिवशीं हा फॉर्म रिझर्व बॅंकेकडे पाठवून त्याबद्दल अनुमति घ्यावी लागते.

## ए. सेव्हन (सी):

अस्थायिकांची रुपयांतील खातीं ही विदेशविनिमय नियंत्रणाच्या अखत्यारांत येतात. व त्यांतील व्यवहाराबद्दलही नियंत्रण फॉर्म-भरावे लागतात. या फॉर्ममध्येही अन्य फॉर्मप्रमाणेंच कुठल्या खात्यांतून कुठल्या कारणासाठीं रक्कम (चलन) काढली जात आहे किंवा कुठल्या खात्यांत कुठल्या कारणानें रक्कम भरली जात आहे, याची माहिती द्यावी लागते व नावे रकमेसाठीं ती नावे टाकणाऱ्या बँकेसही या फॉर्मवर सही करावी लागते व स्वतःचे सर्व समाधान झाल्याचा खुलासा द्यावा लागतो. पूर्वी ए. सेव्हन फॉर्म सर्वच व्यवहाराबद्दल भरावा लागत होता. हल्लीं ज्या व्यवहारांत गुंतागुंत नाहीं, खास प्रकारचे खुलासे नाहींत व जे आयातव्यवहार किंवा परदेशप्रवासासाठीं नाहींत अशा व्यवहारासाठीं ए. सेव्हन (सी) हा सोपा फॉर्म भरण्याची सोय झालेली आहे.

## 'ए. सेव्हन':

ए, एस. ए. वन, ए. सिक्स, (व ए एट) हे फॉर्म चलनखरेदीसाठीं खरेदीदाराला भरावे लागतात. ए सेव्हन हा फॉर्म मात्र आयात व निर्यात किंवा रुपयांतील अस्थायिकांचे तसेच जमा नावें दोन्ही व्यवहारासाठीं जरुर असतो. भारतीय आयातदारानें जर पोलंड, बल्गेरिया या राष्ट्रांतून आयात केली व त्या निर्यातदारानें भारतीय रुपयांत हुंडी काढली व पोलंडच्या किंवा बल्गेरियाच्या दस्तऐवजी हुंडी पाठवणाऱ्या बँकेने ती रक्कम आपल्या स्वतःचे, भारतांतील असलेल्या बँकांमध्ये ठेवलेल्या रुपयांतील

अस्थायिक खात्याला जमा करण्यासाठीं सूचना दिली तर या व्यवहारासाठीं ए सेव्हन फॉर्म भरावा लागेल. या उलट भारतीय निर्यातदारानें जर रुपयात हुंडी काढल्यानें आयातदाराच्या राष्ट्रातील बँकेचे भारतातील अस्थायिक रुपयाचे खात्यास ती रक्कम नावे पडून तो व्यवहार पुरा होणार असेल तर त्यासाठींही ए सेव्हन फॉर्म पुरा करावा लागेल. थोडक्यात जिथें जिथें भारतातील अस्थायिक रुपयाचे खात्याशीं व्यवहाराचा संबंध येईल तिथें तिथें ए सेव्हन फॉर्म नियंत्रणासाठीं आवश्यक ठरतो. अस्थायिक खात्याबद्दल जास्त माहिती पुढे स्वतंत्र प्रकरणात दिलेली आहे.

## सी फॉर्म :

विदेश चलनाच्या प्रत्येक खरेदीसाठीं, मग ती रक्कम नगण्य का असेना, कंट्रोल फॉर्म हा भरावाच लागतो. कारण ही रक्कम भारताबाहेर जाणारी असते. पण भारतात जेव्हा अन्य देशातून रक्कम येत असते तेव्हा ए. सेव्हनचा अपवाद सोडून असा फॉर्म भरावा लागत नाहीं. असे जरी असले तरी २०००० रुपयापेक्षा म्हणजेच १५०० पौंडापेक्षा अशी रक्कम जर भारतीय रहिवाशाला मिळत असेल तर तिचा खुलासा देणारा 'सी' फॉर्मही भरणें बंधनकारक आहे.

वर निर्देशिलेले सर्व फॉर्म्स व संपूर्ण वापरलेले आयात परवाने व रिझर्व्ह बँकेचे परवाने, हे अधिकृत बँकेला वेळोवेळीं विनिमयनियंत्रणाकडे जे तक्ते (Returns) पाठवावे लागतात, त्याबरोबर पाठवावे लागतात, व त्या योगें नियंत्रणखातें सर्व व्यवहारावर नियंत्रण ठेवू शकते.

कंट्रोल फॉर्मचे काहीं नमुने परिशिष्टात मूळ इंग्रजी फॉर्मप्रमाणेंच दिलेले आहेत. या फॉर्म खेरीज 'जे', 'पी' व 'क्यू २२' हे फॉर्म्सही नियंत्रणाच्या विशिष्ट व्यवहारासाठीं भरावे लागतात. जे फॉर्म हा सोन्याचे व जडजवाहिराचे निर्यातीचे वेळीं भरावा लागतो 'पी' फॉर्म प्रवासाबाबतचे मान्य झालेल्या मर्यादेवर प्रवास भाडे पडत असेल तर भरावा लागतो. 'क्यू २२' हा फॉर्म नॉनस्टर्लिंग विभागाचे परकीय नागरिकाना व कंपन्याना त्याना भारतात ठेवावयाच्या खात्यासाठीं दोन प्रतीत भरावा लागतो. या फॉर्मसची फारशी जरूरी पडत नसल्यानें तिचे विवेचन इथें केलेले नाही. अधिकृत बँका जरूर लागल्यास त्याची माहिती देतात.

---

# आयात-निर्याती बाबतची विनिमय-नियंत्रणें

१८

भारतीय नियंत्रणासाठीं कोणकोणते फॉर्म भरावे लागतात याचा विचार केल्यानंतर वेगवेगळ्या व्यवहारासाठीं विनिमय नियंत्रणानें कुठले निर्बंध घातले आहेत याची माहिती अपरिहार्य ठरेल. या व्यवहारांत पहिल्या प्रथम आयातीची व नंतर निर्यातीबाबतच्या नियंत्रणाची माहिती महत्वाची ठरेल. 'आयातीच्या पोटीं आपण अनेक कोटी रुपये खर्च करीत असतो तर निर्यातीच्या योगानें परकीय चलन मिळवीत असतो. आयातीबाबत विचार करतांना आयातनियंत्रण व तदनुषंगिक दिला जाणारा आयात परवाना यांचाही संदर्भ घेणे क्रमप्राप्त ठरेल. किंबहुना आयातपरवान्याचीच जास्त माहिती इथे आयातीबाबतच्या नियंत्रणाचा विचार करताना अभिप्रेत आहे. कारण या परवान्यानुसारच आयातीचे सर्व व्यवहार केले जातात. त्याबद्दलचे थोडे संदर्भ पूर्वीच्या हमीपत्रावरील प्रकरणांत आलेले आहेतच.

व्यापारी हमीपत्राचा विचार करताना मागील एका प्रकरणांत आयातदाराच्या भूमिकेतूनच जास्त विचार केलेला आहे. अर्थात एकाच हमीपत्राची, दोन बाजूला दोन प्रकारची हमीपत्रे होत असतात. आयातदारासाठीं उघडलेले हमीपत्र बँकेचे आयात (Import) किंवा बहिर्गत व्यापारी हमीपत्र (Outward Letter of Credit) होते, तर तेच हमीपत्र परदेशांतील निर्यातदाराला कळवले जातांना त्याचे व त्याच्या बँकेसाठीं निर्यात किंवा अंतर्गत (Export or Inward Letter of Credit) हमीपत्र होत असते. मागील प्रकरणांत भारतीय आयातदाराच्या दृष्टीनें खुलासे करतांना आयात परवान्याचा—सद्यःस्थितींत असलेल्या विनिमय व व्यापार नियंत्रणामुळें—अनेकदां उल्लेख झालेला आहे व त्या दृष्टीनें आयात-व्यवहार व आयातपरवान्याचा विचार वेगळा करणें क्रमप्राप्त ठरेल.

भारतांत व्यापार व विनिमय ही दोन्ही प्रकारची नियंत्रणें सन १९३९ पासून चालू आहेत व त्यासाठीं दोन कायदेही करण्यांत आले आहेत. त्या अन्वयें कुणालाही जर भारताबाहेरील देशांतून आयात करावयाची असेल ( किंवा कांहीं बाबतीत परदेशीं निर्यात करावयाची असेल ) तर व्यापारनियंत्रणाची अधिकृत परवानगी लागते. कांही ठिकाणीं ही परवानगी "मुक्त परवाने" म्हणून नियंत्रणखाते जाहीर करते त्याअन्वयें मिळते तर इतर वेळेला आयातीचा खास परवाना आयातदाराला घ्यावा लागतो. हा परवाना मिळाल्यावर तत्संबंधी लागणारे विदेशविनिमय त्याला भारतसरकारकडून आपोआप मिळेल अशी सोय केलेली आहे. कांहीं देशांतून आयातपरवाना मिळूनही विदेशचलन खरेदीचा परवाना मिळेलच असे नसते. पण भारतांत व्यापार-परवान्याच्या दोन प्रती अर्जदाराला देऊन त्यायोगे त्याला विदेशी चलन पाठवण्याचा व माल जकातखात्याचे द्वारां जकात भरून सोडवून घेण्याचा अधिकार दिला जातो.

असे आयातपरवाने व्यापारनियंत्रण खात्याकडे योग्य तो अर्ज करून मिळवतां येतात. भारतसरकारचे आयातविषयक धोरण वेळोवेळीची सर्व परिस्थिति पाहून ठरविले जाते. असें धोरण हल्लीं दर सहा महिन्यानी जाहीर केले जाते व त्या धोरणाबाबतचे पुस्तक दर एप्रिल व ऑक्टोबरचे पहिले आठवड्यांत प्रसिद्ध केले जाते. या पुस्तकांत अर्जधारकांचे प्रकार किती, त्यांतल्या प्रत्येक प्रकारातील इच्छुकानें आयातपरवाने मिळण्यासाठीं अर्ज कसे करावेत, कुठे करावेत, किती मुदतीत करावेत, त्याबाबतची फी काय असते आयातदाराचे प्रकार कसे पाडले जातात, अर्जासोबत काय काय पाठवावे लागते, परवान्याचे नियम कुठले, ते नियम मोडल्यास काय शिक्षा होते, परवान्यानंतर हमीपत्र उघडण्याच्या, माल निर्यातीबाबतच्या, जकाती वगैरे संबंधीच्या, तसेंच आयातीचे चलन खरेदी करून ते चलन पाठविण्याच्या काय अटी आहेत वगैरे माहिती दिली असते व पुढील सहा बारा महिन्यांत प्रत्येक वस्तूच्या आयातीसंबंधीचे काय धोरण आहे याची माहिती असते. या पुस्तकाचे मलपृष्ठ तांबडे असते म्हणून की काय हे पुस्तक "रेडबुक"

(Red-book) या नांवाने संबोधिले जाते, व ते चेंबर्स ऑफ कॉमर्स, सरकारी छापखाना वगैरे संस्थांतर्फे किंमत घेऊन जनतेला उपलब्ध केलें जातें. सध्यां व्यापारनियंत्रणातर्फे खालील अधिकाऱ्यांना परवान्याबाबतचे अर्ज स्वीकारून ते देण्याचे अधिकार आहेत.

(१) चीफ कंट्रोलर ऑफ इंपोर्ट्स अँड एक्सपोर्ट–नवी दिल्ली.

(२) जॉइंट चीफ कंट्रोलर ऑफ इंपोर्ट्स अँड एक्स्पोर्ट्स–कलकत्ता मुंबई व मद्रास.

(३) दि ट्रेड कंट्रोलर ऑफ इंपोर्ट्स अँड एक्स्पोर्ट्स–राजकोट.

(४) दि डेप्युटी चीफ कंट्रोलर ऑफ इंपोर्ट्स अँड एक्स्पोर्ट्स–अर्नाकुलम व नवी दिल्ली.

(५) कंट्रोलर ऑफ इंपोर्ट्स अँड एक्स्पोर्ट्स–पांडिचरी व विशाखापट्टण.

(६) असिस्टंट कंट्रोलर ऑफ इंपोर्ट्स अँड एक्स्पोर्ट्स–(नवा) कांडला व शिलाँग.

तसेंच डेप्युटी आयर्न अँड स्टील कंट्रोलर, कलकत्ता, मुंबई व मद्रास हेही परवानाधिकारी आहेत. कुठलाही परवाना देतांना हे अधिकारी त्याच्या दोन प्रती आयातदाराला देतात. पहिल्या प्रतीची जरुरी माल सोडवताना जकातीचे वेळीं लागते तर दुसरी विनिमयनियंत्रणासाठीं आवश्यक असते. या पुस्तकांत विदेशविनिमयप्रतीचा विशेषेकरून उल्लेख केलेला आढळेल. पूर्वी असे आयातपरवाने देतांना भारताची विदेशीचलनाची परिस्थिति लक्षांत घेऊन आयातीसाठीं दोन विभाग पाडले जात होते. एक डॉलर विभाग म्हणजे कठीण चलन विभाग व दुसरा सौम्य चलन विभाग. डॉलर विभागात संयुक्त संस्थाने, कॅनडा आणि अमेरिकन अकाउंट मधील फिलिपाईन बेटे, बोलीव्हीया, कोलंबिया, कोस्टारिका, डोमिनिकन प्रजासत्ताक, एक्वेडोर, ग्वाटेमाला, हैती, होंडुरास, मेक्सिको, नायकाराग्वा, पनामा, साल्वेडोर, व्हेनेझुएला व लायबेरीया या

देशाचा समावेश केला जात होता व सौम्य चलनविभागात या देशाखेरीज व दक्षिण आफ्रिका सोडून अन्य देशाचा समावेश केला जात होता. असे भाग अस्तित्वात होते तेव्हा परवाने देताना कुठल्या विभागातून आयात करावयाची त्याची बंधने घातली जात होती. डॉलरचे चलन पूर्वी सुलभत प्राप्य नव्हते ह्मणून डॉलरबाबत योग्य काळजी घेण्यासाठीं हे निर्बंध घालण्यात आले होते. पण आता डॉलर व स्टर्लिंग याचे परिवर्तन होऊ शकते व या परिवर्तनशक्यतेमुळे सन १९६१ पासून हे निर्बंध काढून घेतले आहेत. पूर्वी असे निर्बंध असताना दिल्या जाणाऱ्या आयात परवान्यावर जिथून आयात करावयाला परवानगी असेल त्या त्या विभागाचे नाव घातले जात होते किंवा आयात कोठूनही म्हणजे दोन्ही पैकीं कुठल्याही विभागातून करावयाची समति असल्यास त्यास 'सर्वसाधारण' (General) परवाना म्हटले जात होते. परवान्यावर कठीण चलनविभाग लिहिला असेल तरी सौम्य विभागातून त्यावर आयात समत होती. आता बहुतेक परवाने 'सर्वसाधारण' विभागाचे दिले जातात. फक्त भाडवली वस्तू, अवजड विद्युतयंत्रे व निर्यात पुरस्कारावरील परवाने काहीं वेळा ठराविक देशाचे दिले जातात. हल्लीं वरीलप्रमाणेच पण ज्या ज्या विभागाशी भारताने परस्पर व्यापारी करार (Bilateral Agreements) केले आहेत त्याचे कडून, रुपयात पैसे देऊन (अर्थात हेही विनिमयनियत्रणाच्या नियमानुसारच करावे लागते) आयात करण्याच्या, विभागाचेही असेच निर्बंध घातले जातात व ती आयात त्याच विभागातील, रुमानिया, पोलड, रशिया, झेकोस्लोव्हाकिया या सारख्या देशातून करावी लागते.

व्यापारनियत्रणानें आयातदाराचे चार विभाग केलेले आहेत. (१) व्यापारी आयातदार (Established Importers) (२) स्वत-साठीं आयात करणारे व तो माल उपयोगात आणणारे आयातदार (Actual Users) (३) नवीन अर्जदार (New Applicants) (४) वरील तिन्ही विभागात न बसणारे अर्जदार.

स्वतःसाठीं आयात करणाऱ्यांना साधारणपणें १५ फेब्रुआरी व १५ ऑगस्टपर्यंत अर्जाची परवानगी असते तर इतरांना ती ३१ डिसेंबर व ३० जूनपर्यंतच असते. २५० रुपयापर्यंत देणगी म्हणून येणारी पुस्तकें, ब्ल्यू प्रिंट्स, मशिनरी ड्रॉइंग्ज (व्यापारी मूल्य नसलेली) व एकाच वेळीं नमुना म्हणून येणारे (खऱ्या अर्थानें) २५० रुपयापर्यंतचे नमुन्याचे नग, यांची मुक्त परवान्याखालीं आयात संमत आहे. अशा मुक्त परवान्याची माहिती 'रेडबुक'मध्यें वेळोवेळीं दिली जाते. मशिनरीसारख्या भांडवली वस्तू व अवजड विद्युत् यंत्रे तसेंच मशीनटूल्स बाबतही वेगवेगळे नियम असून तेही 'रेडबुक'मध्ये दिलेले असतात. स्वतः वापरण्याचा आयात परवाना देताना नियंत्रणाधिकारी, हा परवाना ज्या कामासाठीं मागितला आहे त्याच कामासाठीं वापरला गेला पाहिजे अशी अट परवान्यावर घालतो. स्वतः वापरण्याचा (Actual Users) परवाना धारण करणाऱ्याला, तो परवाना किंवा त्यावरुन आयात झालेला माल दुसऱ्याला विकतां येत नाहीं. तसें केल्यास तो गुन्हा असून त्याला सन १९४७ च्या आयातनिर्यात (नियंत्रण) कायद्यान्वयें व किंवा सन १९५५ च्या आयातनियंत्रण हुकुमान्वयें शिक्षा होऊं शकते.

देशाचा समावेश केला जात होता व सौम्य चलनविभागात या देशाखेरीज व दक्षिण आफ्रिका सोडून अन्य देशाचा समावेश केला जात होता. असे भाग अस्तित्वात होते तेव्हा परवाने देताना कुठल्या विभागातून आयात करावयाची त्याची बधने घातली जात होती. डॉलरचे चलन पूर्वी सुलभत. प्राप्य नव्हते ह्मणून डॉलरबाबत योग्य काळजी घेण्यासाठीं हे निर्बंध घालण्यात आले होते. पण आता डॉलर व स्टर्लिंग याचे परिवर्तन होऊ शकते व या परिवर्तनशक्यतेमुळे सन १९६१ पासून हे निर्बंध काढून घेतले आहेत. पूर्वी असे निर्बंध असताना दिल्या जाणाऱ्या आयात परवान्यावर जिथून आयात करावयाला परवानगी असेल त्या त्या विभागाचे नाव घातले जात होते किंवा आयात कोठूनही म्हणजे दोन्ही पैकीं कुठल्याही विभागातून करावयाची समति असल्यास त्यास 'सर्वसाधारण' (General) परवाना म्हटले जात होते परवान्यावर कठीण चलनविभाग लिहिला असेल तरी सौम्य विभागातून त्यावर आयात समत होती. आता बहुतेक परवाने 'सर्वसाधारण' विभागाचे दिले जातात. फक्त भाडवली वस्तू, अवजड विद्युतयंत्रे व निर्यात पुरस्कारावरील परवाने काहीं वेळा ठराविक देशाचे दिले जातात. हल्लीं वरीलप्रमाणेच पण ज्या ज्या विभागाशी भारताने परस्पर व्यापारी करार ( Bilateral Agreements ) केले आहेत त्याचे कडून, रुपयात पैसे देऊन ( अर्थात हेही विनिमयनियत्रणाच्या नियमानुसारच करावे लागते ) आयात करण्याच्या, विभागाचेही असेच निर्बंध घातले जातात व ती आयात त्याच विभागातील, रुमानिया, पोलंड, रशिया, झेकोस्लोव्हाकिया या सारख्या देशातून करावी लागते.

व्यापारनियत्रणानें आयातदाराचे चार विभाग केलेले आहेत. ( १ ) व्यापारी आयातदार ( Established Importers ) ( २ ) स्वत - साठीं आयात करणारे व तो माल उपयोगात आणणारे आयातदार ( Actual Users ) ( ३ ) नवीन अर्जदार ( New Applicants ) ( ४ ) वरील तिन्ही विभागात न बसणारे अर्जदार.

स्वतःसाठीं आयात करणाऱ्याना साधारणपणें १५ फेब्रुआरी व १५ ऑगस्टपर्यंत अर्जाची परवानगी असते तर इतरांना ती ३१ डिसेंबर व ३० जूनपर्यंतच असते. २५० रुपयापर्यंत देणगी म्हणून येणारी पुस्तकें, ब्ल्यू प्रिंट्स, मशिनरी ड्रॉईंग्ज (व्यापारी मूल्य नसलेली) व एकाच वेळीं नमुना म्हणून येणारे (खऱ्या अर्थानें) २५० रुपयापर्यंतचे नमुन्याचे नग, यांची मुक्त परवान्याखालीं आयात संमत आहे. अशा मुक्त परवान्याची माहिती 'रेडबुक'मध्यें वेळोवेळीं दिली जाते. मशिनरीसारख्या भांडवली वस्तू व अवजड विद्युत् यंत्रे तसेंच मशीनटूल्स बाबतही वेगवेगळे नियम असून तेही 'रेडबुक'मध्ये दिलेले असतात. स्वतः वापरण्याचा आयात परवाना देताना नियंत्रणाधिकारी, हा परवाना ज्या कामासाठीं मागितला आहे त्याच कामासाठीं वापरला गेला पाहिजे अशी अट परवान्यावर घालतो. स्वतः वापरण्याचा (Actual Users) परवाना धारण करणाऱ्याला, तो परवाना किंवा त्यावरुन आयात झालेला माल दुसऱ्याला विकतां येत नाहीं. तसें केल्यास तो गुन्हा असून त्याला सन १९४७ च्या आयातनिर्यात (नियंत्रण) कायद्यान्वयें व किंवा सन १९५५ च्या आयातनियंत्रण हुकुमान्वयें शिक्षा होऊं शकते.

परवाना मिळाल्यावर आयातदारानें तो संपूर्णपणें तपासून घेतला म्हणजे पुढें होणारा त्रास टळूं शकतो. कित्येकदां परवाना मिळाल्यानंतर तो नीट न बघतां परवानाधारक तो तसाच ठेवून घेतो व बँकेकडे हमीपत्र उघडावयास गेल्यावर किंवा त्यावर विदेशी चलन मागितल्यावर बँकेनें कांहीं तांत्रिक अडचणी काढल्या व व्यवहार करण्याबद्दल असमर्थता दर्शवली तर आयातदार खट्टू होतो. ही परिस्थिती टाळणें सहज शक्य असते. परवाना मिळाल्यावर त्याची मुदत किती आहे, त्यावरील मालाचें वर्णन आपल्याला पाहिजे तसें आहे कीं नाहीं, तो वस्तू, कां किंमत कां दोन्हीसाठीं मर्यादित केला आहे, त्यावर परवाना देणाऱ्या कचेरीचें सील आहे कीं नाहीं, कुठें खाडाखोड, बदल व शोध (Amendments) असल्यास त्या जागेवर परवानाधिकाऱ्याची सही व सील

आहे ना, आपले नांव बरोबर घातलें गेलें आहे कीं नाहीं हे सर्व बघून घेणें व वाटल्यास वेळींच दुरुस्त्या करून घेणें इष्ट असते. कित्येकदां 'अ ब क आणि कंपनी' ऐवजी अ ब क आणि सन्स असें नांव परवान्यावर घातलें जाण्याची शक्यता असते तर कधीं नांवांतील 'लिमिटेड' सारखा किंवा दुसरा एकादा शब्द गाळला जातो. किंवा मेसर्स अ. ब. दाते नांवाऐवजी श्री. अ. ब. दाते असा उल्लेख होतो. या सर्व बारीक गोष्टी असल्या तरी अधिकृत बँकेला तिकडे दुर्लक्ष्य करतां येत नाहीं. तेव्हां नंतर तिच्याबद्दल गैरसमज करून घेण्यापेक्षां व चुका क्षुल्लक म्हणून त्याकडे दुर्लक्ष्य न करतां त्या लगेच सुधारून घेतल्या म्हणजे त्या परवान्यावरील पुढील सर्व व्यवहार सुकर होतात. तसेंच परवाना मिळाल्यावर त्याची एक प्रत काढून ठेवणें हें आयात-दारानें महत्त्वाचे समजलें पाहिजे. कारण परवाना संपूर्णपणें वापरला गेला कीं शेवटच्या व्यवहाराचा विनिमयनियंत्रणाचा ए किंवा एस. ए. वन फॉर्म पाठवताना त्याबरोबर परवान्याची नियंत्रणप्रतही रिझर्व बँकेकडे परत करण्याबद्दल रिझर्व बँकेचा अधिकृत बँकांना आदेश असल्याने त्या शेवटच्या व्यवहाराचे वेळीं तो ठेवून घेतात. अशी प्रत काढून ठेवलेली नसल्यास मग पुढील अर्जाचेवेळीं किंवा अन्य कुठल्याही संदर्भाचे वेळीं परवान्यांतील कांहीं माहिती हवी असल्यास आयातदाराची पंचाईत होते. तसेच अशी प्रत काढलेली असल्यास विक्रीकराराचे वेळी आयातपरवान्यासारखा महत्वाचा-कागद पोस्टानें न पाठवतां ती प्रत पाठवल्यास काम सुकर होते.

आयातपरवाना मिळाल्यानंतर तो धारण करणाऱ्याचे पुढचे काम म्हणजे आयात कुठून करावयाची व कुणाकडून करावयाची हे ठरविणें हे होय. पूर्वीच्या परवान्यात आयात कुठल्या प्रदेशातून विशेषतः सौम्यचलन प्रदेशातून कीं कठीण–चलन प्रदेशातून याचाही उल्लेख केलेला असे. आता याबाबत विशिष्ट असे बंधन नाहीं. पण राजकीय परिस्थितीमुळे दक्षिण आफ्रिकेतून मात्र आयात करण्याला परवान्यांतील कलमान्वये बंदी असते. याबाबत आयातदाराला खात्रीच्या व इष्ट वाटणाऱ्या उत्पादकांशीं करारमदार (Contract of sale) होणें आवश्यक असते. असा करार झाला कीं ते

करारपत्र घेऊन बँकेकडे हमीपत्र उघडण्यासाठीं गेले तर बँकेचे काम सुलभ होऊं शकते. कारण आयातपरवाना व हे करारपत्र या दोन कागदांवरून बँकेला हमीपत्र कसे उघडावयाचे याचा बोध होऊं शकतो. तसेच असा विक्रीकरार करतानाही आयातपरवान्याच्या अटी जर उत्पादकाला किंवा त्याच्या प्रतिनिधीला कळविल्या तर त्यानुसार करारपत्र नीट होऊन मालाची आयात वेळेवर व नीट होऊन माल सोडवताना त्रास पडत नाहीं. विशेषतः मालाचे नांव आयातपरवान्यांत एका विशिष्ट तऱ्हेनें लिहिले असेल पण तो माल तांत्रिक भाषेत वेगळ्या नांवाने ओळखला जात असेल तर परवान्यातील नावानेच माल मागवतां येतो व त्याचे कागदपत्रही योग्य प्रकारचे घेऊन कुठलाही त्रास होत नाहीं. परवान्याची तपासणी आणखी अन्य गोष्टीसाठींही इष्ट असते. आयातपरवाना देताना त्यावर तो किती मुदतीचा आहे हे लिहून दिलेले असते. एकादी विशिष्ट तारीख घालून किंवा दिल्याच्या तारखेपासून सहा किंवा नऊ, बारा, अठरा महिने मुदतीचा असा तो दिला जातो. मालाचा प्रकार, त्याची आत्यंतिक जरुरी, किंमत वगैरे बाबी विचारांत घेऊनच ही मुदत दिली जाते. तो एका विशिष्ट गरजेच्या पूर्तिसाठींच दिला जात असल्याने त्यासाठीं एक ठराविक मुदत दिली जाते. परवाना मिळाल्यानंतर तो केव्हांही वापरूं, असें आयातदाराला करून चालत नाहीं. या परवान्याद्वारें केवळ मालच आयात करावयाचा असतो. छुप्या पद्धतीनें अन्य बाबीसाठीं किंवा भांडवली गुंतवणुकीसाठीं ते पैसे आयातीच्या नांवाखालीं पाठविता येत नाहींत. म्हणूनच परवाना दिल्यावर परकीय चलनाच्या खर्चालाही संमती दिली असा त्याचा अर्थ होत असला तरी परवाना धारकाला ते चलन त्या त्या विशिष्ट मालाच्या खरेदीपोटीं अधिकृत प्रतिनिधी असलेल्या बँकेमार्फतच विकत घ्यावे लागते. म्हणजेच अप्रत्यक्षपणे आपला व्यवहार शेवटीं पट्कर्णी करावा लागतो. अधिकृत प्रतिनिधी म्हणून काम करीत असलेल्या बँकेलाही रिझर्व बँकेने आखून दिलेल्या पद्धतीनुसार तो व्यवहार होत आहे याची खात्री करून दिल्याचे शिफारसपत्र प्रत्येक वेळेला द्यावे लागते व आयातीची नोंद परवान्याच्या विदेशविनिमयाच्या

प्रतीवर करावी लागते. अशी प्रत असल्याखेरीज ( किंवा आयात मुक्त-परवान्याखालीं असेल व त्याबाबत विदेशी चलन द्यावयाचें असेल तर कस्टममधून माल सोडवून घेतल्यावर मिळणाऱ्या बिल ऑफ एंट्रीची 'विनिमय प्रत' असल्याखेरीज ) अधिकृत प्रतिनिधिंना आयातीबाबतचे चलन विकता येत नाहीं. मासिकें, नियतकालिकें पुस्तकें, याची एक प्रत स्वत:च्या उपयोगासाठीं मागवावयाची असेल तर त्यासाठीं मात्र आयात परवान्याची जरूरी नसते. मात्र रिझर्व बँकेचे समतीखेरीज त्यासाठीं विदेशी चलन आगाऊ पाठवता येत नाही. पुस्तकें, नियतकालिकाचें पार्सल जर परदेशातून रवाना झाले असेल, तर ते आल्यावर त्याचे वेष्टन व बीजक विनिमयनियत्रण खात्याकडे 'ए' फॉर्म किंवा एस. ए. फॉर्मसह पाठवल्यावर मग तत्संबधींचे चलन विकण्याची अधिकृत बँकाना त्या खात्याकडून परवानगी मिळू शकते. या अपवादाखेरीज आयातीबद्दलच्या चलनाची विक्री अधिकृत प्रतिनिधींना परवाना धारण करणाऱ्यालाच किंवा तो दुसऱ्यानें वापरावयाची परवानगी देणारे पत्र त्याला जोडलेले असल्यास त्या धारकालाच करता येते, व ती परवान्यातील रकमेइतकीच व त्यात लिहिलेल्या तारखेच्या आंतच मालाची निर्यात झाली आहे याची खात्री देणारे कागदपत्र बघूनच करता येतें. परवाना जर सहा महिन्याचा असेल व तो ११ जानेवारीला सपत असेल तर त्या परवान्याची मुदत त्या महिनाअखेर समजली जाते. शब्दशः परवाना जरी ठरलेल्या मुदतीनतर एका ठरानिक तारखेलाच सपत असला तरी त्याची मुदत त्या महिनाअखेर धरावी असें धोरण सुसूत्रतेसाठीं सरकारनें जाहीर केलें आहे. या मुदतीनतरही पधरा दिवसाची ज्यास्त मुदत (Grace Period) असते व त्या तारखेपर्यंत माल निर्यात झालेला असला तरी परकीय चलनाचें विक्रीसाठीं तो मुदतीत आहे असें समजलें जातें. परकीय चलनाची विक्री करताना ती ज्या दिवशीं केली जाईल त्या दिवशीं परवाना मुदतीत आहे कीं नाहीं हे तत्त्व पाळले जात नसून ज्या आयातीसाठीं ती केली जात आहे ती आयात परवान्यात लिहिलेल्या मुदतीत केली गेली आहे कीं नाहीं हे

बघितले जाते. उदाहरणार्थ परवाना सहा महिने मुदतीचा व १२ मे १९६१ या दिनांकाला दिलेला असेल तर किंवा परवान्यांत दिलेली शेवटची 'निर्यातीची तारीख १२ नोव्हेंबर असेल तर, परवाना संपूर्ण नोव्हेंबर अखेरपर्यंत वैध आहे असे धरून व अकल्पित अडचणी आल्यास पुढे पंधरा दिवस धरुन निर्यातदाराला १५ डिसेंबरपर्यंत माल पाठविता येइल व हे कागदपत्र जरी ३० डिसेंबरला आयातदाराच्या बँकेच्या विदेशी प्रतिनिधीच्या हातांत पडले व तिच्याकडून आयातदाराच्या देशांतील त्याचे बँकेकडे ते दहा किंवा बारा जानेवारीपर्यंत आले तरी, त्या आयातीसाठीं तो परवाना मुदतबाद न धरतां, ग्राह्य समजून बँक त्यासाठीं विदेशी चलनाची विक्री करूं शकेल. पण हा परवाना १२ मे रोजी दिलेला असल्यास, समजा १० मेला निर्यातदाराने माल पाठवला व त्याचे कागदपत्र जरी २० मेला बँकेकडे आले व त्यावेळेला उपरनिर्दिष्ट परवाना त्या तारखेला ह्मणजे २० मेला चालू असला, तरी विदेशी चलनविक्रीसाठीं (किंवा कस्टममध्येंही) तो ग्राह्य धरतां येणार नाहीं. म्हणजे ज्या दिवशीं निर्यात होते त्या दिवशी धारकाजवळ चालू जिवंत परवाना हवा. ज्या दिवशीं कागद येतील, किंवा माल येईल किंवा चलन मागितले जाईल, त्यावेळीं तो जिवंत, चालू आहे कां नाहीं हे बघितले जात नाहीं. परवाना दिलेल्या तारखेपासून परवान्यांतील मुदतीतच मालाची निर्यात व्हावयाला हवी हे तत्व यांत महत्वाचे आहे. या मुदतीचे अलिकडे किंवा पलीकडे झालेल्या निर्यातीची आयात अनधिकृत धरली जाते व व्यापारनियंत्रण खातेंही त्याबाबत कांहीं करूं शकत नाहीं. ती आयात 'मुक्त' करणे व माल सोडवायला परवानगी देणें हे फक्त जकातखात्याच्याच अखत्यारींत आहे. स्विझर्लंड, झेकोस्लोव्हाकिया-सारख्या राष्ट्रांतून माल मागवावयाचा असेल तेव्हां हीं राष्ट्रें खंडांतर्गत असल्याने त्यांना बंदरे नाहींत म्हणून, या राष्ट्रांतून ज्या दिवशीं रेल्वेनें किंवा किंवा मोटारने माल रवाना झाला असेल ती तारीख निर्यातीची अशी तारीख पुढील बंदरातून निघालेल्या निर्यातपत्राच्या तारखेऐवजीं अशा प्रकारांत,

प्रतीवर करावी लागते. अशी प्रत असल्याखेरीज (किंवा आयात मुक्त-परवान्याखालीं असेल व त्याबाबत विदेशी चलन द्यावयाचें असेल तर कस्टममधून माल सोडवून घेतल्यावर मिळणाऱ्या बिल ऑफ एंट्रीची 'विनिमय प्रत' असल्याखेरीज) अधिकृत प्रतिनिधिंना आयातीबाबतचें चलन विकतां येत नाहीं. मासिकें, नियतकालिकें पुस्तकें, यांची एक प्रत स्वतःच्या उपयोगासाठीं मागवावयाची असेल तर त्यासाठीं मात्र आयात परवान्याची जरूरी नसते. मात्र रिझर्व बँकेचे संमतीखेरीज त्यासाठीं विदेशी चलन आगाऊ पाठवतां येत नाहीं. पुस्तकें, नियतकालिकांचें पार्सल जर परदेशातून रवाना झालें असेल, तर ते आल्यावर त्याचे वेष्टन व बीजक विनिमयनियंत्रण खात्याकडे 'ए' फॉर्म किंवा एस. ए. फॉर्मसह पाठवल्यावर

मुदतीचे दिले जातात तेव्हां त्याबावत आणखी कांही बंधनें घातलेली असतात. वृत्तपत्रासाठीं दिलेला परवाना, गेल्या सहामाहींतील वृत्तपत्रांचा खप कमी झालेला नाहीं असे प्रतिज्ञापत्र देऊन पुढील सहा महिन्यांसाठी पुन्हां चालू करून घ्यावा लागतो. परवान्यावर कुठल्या अटी घालावयाच्या हे व्यापारनियंत्रणाच्या अखत्यारीत येते व त्या परवान्यानुसार विनिमय-खात्याला आपला व्यवहार आंखावा लागतो.

आयात परवाना मिळाल्यानंतर आयातदाराला त्या परवान्यांतील मंजुरीप्रमाणे माल मागवता येतो. या आयात परवान्याच्या आधारावर अधिकृत बॅंक त्याला परकीय चलन विकूं शकते. आयातदारावर अन्य-राष्ट्रातील विक्रेत्याचा विश्वास असेल तर तो माल पाठवून मालाचे कागदपत्र भारतातील बॅंकेकडे वसुलीसाठीं पाठवतो तेव्हां आयातदाराला बिल सोडवून घेताना परवान्याची विनिमय नियंत्रणप्रत बॅंकेकडे द्यावी लागते. कारण परवान्यामुळे बॅंक जे चलन विकते त्या प्रत्येक विक्रीची नोंद बॅंकेला त्या परवान्याचे पाठीमागे करावी लागते. कांहीं कांहीं वेळेला एकाच परवान्यावर, प्रथम हमीपत्र उघडल्यामुळें ज्या रकमेचें हमीपत्र उघडले जाईल त्याचे दस्तऐवज आल्यावर, तितके विदेशी चलन विकण्यासाठीं रक्कम राखून ठेवून त्या राखीव रकमेची नोंद होईल. त्यानंतर एकाद्या विक्रेत्याने हमीपत्र उघडायला न सांगता नुसतेच वसुलीचें बिल पाठविले असेल तर ते सोडवतांना विकाव्या लागलेल्या परदेशीं चलनाची नोंद होईल. नंतर हमीपत्रावरील बिलें आल्यास ती बिलें वेळोवेळीं सोडवून घेतांना *प्रत्यक्ष विकाव्या लागलेल्या विदेशी चलनाची त्या परवान्यावर* नोंद होईल व सरते शेवटीं हमीपत्रासाठीं राखून ठेवलेल्या रकमेतील कांहीं रक्कम शिल्लक असल्यास, हमीपत्राची मुदत संपून गेल्यावर त्यापोटीं कुठलेही बिल येणार नाहीं अशी बॅंकेची खात्री पटल्यानंतर ती परत वाढवली गेल्याची नोंदही होईल. आयात परवान्यावर बॅंक कशा नोंदी करते याचा नमुना खालीं दिला आहे.

धरतात. ही निर्यात कनसाइनमेंट बेसिसवर, झाल्याचे धरले जाते; व त्याप्रमाणे विदेशविनिमयाचा व्यवहार केला जातो. भारतात, चालू आयात-परवान्याच्या पाठिंब्यावर जेव्हा हमीपत्र उघडले जाते तेव्हा निर्यातीची तारीख व वटवण्याची तारीख यात पधरा दिवसापेक्षा जास्त काल देता येत नाहीं म्हणजेच पर्यायानें परवान्यात लिहिलेल्या मुदतीपेक्षा तीस दिवसापेक्षा जास्त मुदत कागदपत्र वटवण्यासाठीं देता येत नाहीं. म्हणजे वरील उदाहरणात ३० नोव्हेंबर ही खरी मुदतीची तारीख होत असल्याने वटाव दिनाक (Negotiation date) ३० डिसेंबरच्या पुढें जाऊन चालणार नाहीं. त्यातही १५ दिवस खास मुदतीचे असतात ते अपरिहार्य परिस्थितीसाठींच असतात. केवळ निर्यातीस उशीरा परवानगी देण्यासाठीं नसतात व शक्यतो अपरिहार्य निर्यातीसाठींच समत असलेला हा काळ सोडून निर्यात व दस्तऐवजाचा वटाव खऱ्या मुदतीतच (म्हणजे या उदाहरणात ३० नोव्हेंबर व १५ डिसेंबरपर्यंत) झाला पाहिजे. कारण बहुतेक ठिकाणीं निर्यातीनतर एक दोन दिवसात सर्व दस्तऐवज जमा करून ते बँकेत सहज दाखल करता येण्याची शक्यता असते बँकाना मेस्त दिवसाच्या मुदतीत हमीपत्र उघडता येत नाहीं, पण असे हमीपत्र परवाना खऱ्या मुदतीत चालू असताना जर उघडलें असेल व निर्यातदाराला अनपेक्षित अडचणीमुळे या खास मुदतीची आवश्यकता असेल तर ' शोध ' देताना किंवा सुरवातीसच, पधरा दिवस धरून येणारी तारीख निर्यातीची शेवटची तारीख म्हणून हमीपत्रात घालता येते.

कित्येकदा एखादा परवाना जरी सोयीसाठीं वर्षभराच्या मुदतीचा दिला असला तरी त्यात, तो पहिल्या सहामाहीसाठीं फक्त ५० टक्यापर्यंतच वापरता येईल वगैरे शेरे दिलेले असतात. भारताच्या आर्थिक वर्षातील एकाच भागात, चलनाचे शिलकीवर ताण पडू नये, व तें, प्रमाण राखून खर्च व्हावे, हीच कल्पना त्या पाठीमागें असते. वृत्तपत्रीय कागदाचे परवाने किंवा अन्य काही परवाने जेव्हा काही खास अटी घालून बारा महिने

मुदतीचे दिले जातात तेव्हां त्याबाबत आणखी कांही बंधनें घातलेली असतात. वृत्तपत्रासाठीं दिलेला परवाना, गेल्या सहामाहींतील वृत्तपत्रांचा खप कमी झालेला नाहीं असे प्रतिज्ञापत्र देऊन पुढील सहा महिन्यासाठी पुन्हां चालू करून घ्यावा लागतो. परवान्यावर कुठल्या अटी घालावयाच्या हे व्यापारनियंत्रणाच्या अखत्यारीत येते व त्या परवान्यानुसार विनिमय-खात्याला आपला व्यवहार आंखावा लागतो.

आयात परवाना मिळाल्यानंतर आयातदाराला त्या परवान्यांतील मंजुरीप्रमाणे माल मागवता येतो. या आयात परवान्याच्या आधारावर अधिकृत बँक त्याला परकीय चलन विकूं शकते. आयातदारावर अन्य-राष्ट्रातील विक्रेत्याचा विश्वास असेल तर तो माल पाठवून मालाचे कागदपत्र भारतातील बँकेकडे वसुलीसाठीं पाठवतो तेव्हां आयातदाराला बिल सोडवून घेताना परवान्याची विनिमय नियंत्रणप्रत बँकेकडे द्यावी लागते. कारण परवान्यामुळे बँक जे चलन विकते त्या प्रत्येक विक्रीची नोंद बँकेला त्या परवान्याचे पाठीमागे करावी लागते. कांहीं कांहीं वेळेला एकाच परवान्यावर, प्रथम हमीपत्र उघडल्यामुळे ज्या रकमेचें हमीपत्र उघडले जाईल त्याचे दस्तऐवज आल्यावर, तितके विदेशी चलन विकण्यासाठीं रक्कम राखून ठेवून त्या राखीव रकमेची नोंद होईल. त्यानंतर एखाद्या विक्रेत्याने हमीपत्र उघडायला न सांगता नुसतेच वसुलीचें बिल पाठविले असेल तर ते सोडवतांना विकाव्या लागलेल्या परदेशीं चलनाची नोंद होईल. नंतर हमीपत्रावरील बिलें आल्यास ती बिलें वेळोवेळीं सोडवून घेतांना प्रत्यक्ष विकाव्या लागलेल्या विदेशी चलनाची त्या परवान्यावर नोंद होईल व सरते शेवटीं हमीपत्रासाठीं राखून ठेवलेल्या रकमेतील कांहीं रक्कम शिल्लक असल्यास, हमीपत्राची मुदत संपून गेल्यावर त्यापोटीं कुठलेही बिल येणार नाहीं। अशी बँकेची खात्री पटल्यानंतर ती परत वाटवली गेल्याची नोंदही होईल. आयात परवान्यावर बँक कशा नोंदी करते याचा नमुना खालीं दिला आहे.

[ आयातपरवाना रुपये १००००० वा. भा. वि. किंमतीचा ]

| | | | | | बँकेचा शिक्का व सही |
|---|---|---|---|---|---|
| नंबर १००१ हमीपत्रासाठी | | | १००००० | १००००० | |
| बाजूला | ५०००० | | | | |
| प्रत्यक्ष संरक्षण मूल्य विम्यासाठी | २५० | | | | |
| बोटीचे भाड्यासाठी | ५००० | | | | |
| | ५५२५० | | ४४७५० | ९४७५० | |
| नं. १००२ वा. भा. वि. हमीपत्रासाठी बाजूला | ४००० | | ४०७५० | ९४७५० | |
| महाराष्ट्र बँक विदेशी बिल नंबर ७२१४ | २८१९ | २८१९ | ३७९३१ | ९१९३१ | |
| हमीपत्र १००१ वरील बिल | | २०२८० | ३७९३१ | ७१६५१ | |
| हमीपत्र १००२ वरील बिल | | ३९८१ | ३७९३१ | ६७६७० | |
| हमीपत्र १००१ वरील बिल | | १५३१२ | ३७९३१ | ५२३५८ | |
| हमीपत्र १००१ वरील बिल | | १३७५८ | ३७९३१ | ३८६०० | |
| महाराष्ट्र बँक विदेशी बिल नंबर ८००४ | १९४३१ | १९४३१ | १८५०० | १९१६९ | |
| महाराष्ट्र बँक विदेशी बिल नंबर ८०८२ | १६४०० | १६४०० | २१०० | २७६९ | |
| हमीपत्र १००१ ची न वापरलेली रक्कम परत वाढविली | | ७६९ | २८६९ | २७६९ | |
| महाराष्ट्र बँक विदेशी बिल नंबर ९३१९ | | २७६० | १०९ | —९ | |

परवाना संपूर्ण वापरला. सबब रिझर्व बँकेकडे परत.

ज्यावेळेला परवान्याचे आधारावर हमीपत्र उघडलेले असते व हुंडी बँकेकडे येते तेव्हां बँकेची खात्री पटण्याचा प्रश्न राहत नाहीं. अन्यवेळीं निर्यातदाराचे केवळ बिलाचे ( हुंडीचे ) आधारावर विदेशी चलनाचा व्यवहार होऊं शकत नाहीं. अशा मुदती वा दर्शनी हुंडी बरोबर "नाविक निर्यातपत्र" हवेच. अशी हुंडी व कागदपत्रें बँकेकडेच वसुलीस आल्यास त्याबाबतही

कांहीं प्रश्न रहात नाहीं. मात्र कित्येकदां सोयीसाठीं विक्रेता आयातदाराकडे परस्परच नाविक निर्यातपत्रें पाठवतो व नंतर फक्त त्यापोटीं देणे रकमेची हुंडी बँकेकडे पाठवतो. अशावेळीं आयातदाराला, त्या हुंडीसाठी विदेशी-चलन खरेदी करण्याचेवेळी, त्याचेकडे कागदपत्र परस्पर आल्याचा व त्यावरील माल सोडवून घेतल्याचा पुरावा म्हणून बँकेला जकात खात्याकडील माल सोडविल्याची विनिमय नियंत्रणप्रत (Exchange Control Copy of The Customs Bill of Entry) हजर करावी लागते. कित्येक वेळेला माल पोस्टाने पाठविला गेला असल्यास त्याचे वेष्टन (Wrapper) व बीजक बँकेकडे पुरावा म्हणून द्यावे लागतात. कारण या प्रकरणांत उपर निर्दिष्ट जकातखात्याची प्रवेशपरवान्याची विनिमयनियंत्रणप्रत मिळत नसते. मात्र असा माल पोस्टपार्सल पद्धतीने पण Sea Mail ने असल्यास बिल यावयाचे वेळीं अशी प्रत दाखवता येत नाहीं किंवा Wrapper वगैरेचा पुरावाही देता येत नाहीं; तेव्हां विदेशी चलनाचा ए किंवा ए सात किंवा एस. ए. वन. हा फॉर्म भरताना त्याचे मागील बाजूस असा माल आलेला नाहीं पण तीन महिन्याचे आंत तो आल्याचा पुरावा म्हणून वरील प्रकारची बिल ऑफ एंट्रीची विनिमय नियंत्रणप्रत किंवा वेष्टणे दाखल करुं असे आयातदाराला खात्रीपत्र द्यावे लागते; व नंतर तसा पुरावा हजरही करावा लागतो. माल जेव्हां पोस्टाने आला असेल व पार्सल बँकेच्याच नांवावर येऊन तिनें ते पैसे भरल्यावर खातेदाराला दिले असेल तर व असा माल २५० रु. चे आंत असेल तर हल्लीं बँकेला ते रॅपर विनिमय-नियंत्रणखात्याकडे पाठवण्याची आवश्यकता नाहीं.

आयातदारावर विश्वास ठेऊन कित्येकवेळ्यं विक्रेता जसा माल पाठवून फक्त त्याचे कागदपत्र वसुलीसाठीं पाठवतो त्याचप्रमाणे कित्येकदां कांहीं कारणामुळें तो खरेदीदाराकडून आगाऊ रकमही मागतो. विशेषतः खूप मोठी रकम असल्यास कांहीं टक्के रकम आगाऊ म्हणून विसार असा मागण्याची व उरलेल्या रकमेचे हमीपत्र मागण्याची विक्रेत्यांची वा उत्पादकांची अट असते. ज्यावेळेला मालाचे पैसे पुरवठ्यानंतर एकदम-

न देतां हस्याहस्याने द्यावयाचे असतात त्यावेळींही अशी आगाऊ रक्कम उत्पादक मागतो. अशावेळीं आयातदाराला तशी मागणी करणारे विक्रेता वा उत्पादकाचे पत्र व त्याची एक प्रत चलनखरेदीच्या ए किंवा अन्य फॉर्म-बरोबर रिझर्व बँकेला सादर करून तिची, आगाऊ रक्कम पाठवण्यासाठीं संमति घ्यावी लागते. कित्येकदां आयातपरवाना देतानाच २५%रक्कम आगाऊ पाठवण्यासाठीं वैध असा शेरा मारलेला असतो. वरील दोन उदाहरणांसारखी उदाहरणे असल्यास आणि परवाना यंत्रसामुग्रीसारख्या उत्पादन वस्तूसाठी (Capital Goods) किंवा अवजड विद्युत यंत्रासाठीं (Heavy Electrical Plants) असल्यास आणि आगाऊ दिसार आल्याखेरीज विक्रेता वा उत्पादक व्यवहाराला तयार नाहीं असे असल्यास, तसें आयातदाराने लिहून दिल्यानंतरच रिझर्व बँक आगाऊ रक्कम पाठवायला अनुमति देते. नेहमीप्रमाणें बँकेला त्याची नोंद परवान्याचे मागील बाजूला करावी लागते. कित्येकदा अशी रक्कम आल्यावरच परदेशी उत्पादक त्या विशिष्ट यंत्रसामुग्रीचे उत्पादनास सुरवात करतो.

कांही कांही आयातदार खूप मोठ्या प्रमाणावर आयात करीत असतात तेव्हां, माल रवाना झाल्यावर त्याचे पैसे त्यांना विक्रेत्याला तावडतोब पाठवायचे असतात. कित्येक वेळां माल तयार झाल्यावर तो रवाना होण्याच्या बेतांत असतांनाही असे पैसे पाठवावे लागतात. अशा आयातदारांचे प्रतिनिधिच बऱ्याच वेळा परदेशांतून हा व्यवहार करीत असतात व त्यांना तिकडे माल खरेदी केल्यावर सर्व कागदपत्र तयार होऊन बँकेकडे वसुलीकडे देऊन मग पैसे येण्याची वाट बघणे शक्य नसते. अशावेळीं आयातदाराला आपल्या प्रतिनिधीकडून वा विक्रेत्याकडून माल तयार झाल्याची किंवा रवाना झाल्याची तार मागवावी लागते व ही तार, आणि पाठवावयाच्या रकमेसाठीं चालू असलेला परवाना (विनिमयनियंत्रणप्रत) अधिकृत बँकेकडे दाखल करावा लागतो. अशा आगाऊ रकमा पाठवण्यासाठी योग्य तो अर्ज रिझर्व बँककडे आल्यावर रिझर्व बँक परदेशांतील आयातदाराच्या शाखेला वा प्रतिनिधीला अशी रक्कम परस्पर पाठवण्याची अधिकृत प्रतिनिधीला कायमची अनुज्ञा देऊं शकते.

कुठल्याही आयातीसाठीं सर्वांना हल्लीं आयातपरवाना (मासिकें वगैरे कांहीं बाबतीत कांहीं रकमापर्यंतची आयात सोडून) लागतो. पण कांहींवेळां खासगी उपयोगासाठीं परदेशांतून लहान प्रमाणावर ह्मणजे पंचवीस-तीस रुपयापर्यंत भारतांत न मिळणारी औषधें, वगैरे सारख्या वस्तू मागवावयाच्या असल्यास रिझर्व बँक योग्य त्या ए, एस ए. वन, किंवा ए ७ फॉर्मवर, योग्य त्या पुराव्यासह (उदा: अंदाजबीजक, त्या औषधाची जरूरी असल्याबद्दलचें डॉक्टरचें सर्टिफिकेट व ते भारतांत मिळत नाहीं असे दाखवणारा पुरावा वगैरे) अर्ज आल्यास विदेशीचलन पाठवायला संमती देते. मात्र प्रत्येक वेळेला प्रत्येक बाबीचा स्वतंत्रपणे तिच्या आवश्यकतेवर व गुणावरच विचार केला जातो. अशा वस्तू पोस्टानेच मागवाव्या लागतात व त्याचे वेष्टन तीन महिन्याचे आत सादर करावें लागते.

कांहीं वेळेला माल निर्यात झाला तरी आयातदाराला मात्र त्याची अनेक कारणानें संपूर्ण डिलीव्हरी मिळत नाहीं. उदा: कांहीं माल वाटेतच हरवतो किंवा कांहीं माल खराब होऊन निकामी ठरतो. अशा वेळीं त्याचे बदली जर नवीन माल मागवावयाचा असेल तर त्यासाठीं ठराविक नियम आहेत. जर अशा मालाबाबत कुठल्ेही व्यापारी हमीपत्र उघडलेले नसेल किंवा वसुलीला आलेल्या बिलाची रक्कम चुकती न केल्यामुळें आयात परवान्यावर कुठलीही नोंद नसेल तर माल पाठवण्याचे मुदतीचे आंत, बदली माल आणण्यासाठीं तो परवाना वैध समजला जातो.

मात्र अशा परवान्यावर हुंडीची रक्कम चुकती केल्यामुळें किंवा हमीपत्र उघडले गेल्यामुळें जर नोंद झाली असेल तर ती नोंद रद्द करण्याची परवानगी मागण्यासाठीं रिझर्व बँकेकडे तसा अर्ज करावा लागतो व अशी परवानगी, विमा कंपनी किंवा अधिकृत बँकेतर्फे जर त्या मालापोटीं भरपाईची रक्कम भारतांत आली असेल व पर्यायानें विदेशीचलन घटले नसेल तरच मिळूं शकते व नंतर नव्या नोंदीवर परत बदली मालाची किंमत देता येते किंवा हमीपत्र उघडतां येते. मात्र असा मालही परवान्यातील निर्यातीच्या शेवटच्या दिनांकाचे आंतच निर्यात झालेला पाहिजे. परवान्याची मुदत

संपल्यानंतर जर असा माल निर्यात होणार असेल तर आयातदाराला बदली निर्यातीचा परवाना काढण्यासाठीं आयातनियंत्रण कचेरीकडे अर्ज करावा लागतो. असा परवाना देतांना त्याच्या विनिमय प्रतीवर रिझर्व बँकेच्या पूर्व संमती खेरीज पैसे पाठवण्यास परवानगी नाहीं असा शेरा व्यापारनियंत्रण-खात्यांकडून मारला जातो. अशा परवान्याचेवर जर हमीपत्र उघडावयाचे असेल तर त्या रकमेची परत विक्री करण्यासाठीं उपयोग करण्याची रिझर्व बँक तसा अर्ज केल्यावर परवानगी देते. मात्र त्यावेळींही बदलीपरवान्यावर पूर्वीं सांगितलेल्या योग्य त्या नोंदी कराव्या लागतातच.

ज्या वेळेला एकादा भारतीय व्यापारी एका देशांतून माल मागवून तो दुसऱ्या देशांत लगेच निर्यात करणार असतो व तो माल निर्यातीसाठीं जकातखात्याच्या गुदामांत रहाणार असतो (Bonded Warehouse) त्यावेळेला त्याला आयातपरवान्याची जरूर नसते. आणि तशा आयाती-बाबत त्याला विदेशी चलनही खरेदी करतां येत नाहीं. मात्र कित्येकदां कांहीं भारतीय व्यापारी अन्य देशांत व्हावयाच्या आयातीसाठीही आर्थिक जबाबदारी स्वीकारतात त्यावेळेला त्याला निर्यातदाराला परकीय चलनांत भरणा करावाच लागतो. जर अशी आयात एका स्टर्लिंग विभागांतील एका देशांतून त्याच विभागांतील दुसऱ्या देशांत होत असेल व त्या दुसऱ्या विभागांतून उलट भरणा भारतातच होणार असेल, तर निर्यातदाराला परकीय चलन पाठविण्याची मुभा आहे. पण नॉनस्टर्लिंग विभागात जर आयात होणार असेल तर किंवा स्टर्लिंग विभागांतील देशांतील आयातीसाठीं नॉनस्टार्लिंग विभागातले परकीय चलन खरेदी करावे लागणार असेल तर त्याला रिझर्व बँकेची आगाऊ संमती घ्यावी लागते.

कित्येकदा परदेशी व्यापारी भारतीय खरेदीदारांवर विश्वास ठेवून हमीपत्राऐवजी तसाच माल पाठवून मग बँकेतर्फे वसुलीला हुंडी व नाविक दस्तऐवज पाठवितो हे सांगितलेच आहे. पण आयात करणारी कंपनी खूपच मोठी असेल तर विक्रेता असे दस्तऐवज बँकेकडे न पाठवितां परस्पर त्या आयातदार कंपनीकडेच पाठवतो व मालाची विक्री झाल्यानंतर

पैसे घ्यावयालाही तयार असतो. अशा पद्धतीला हवाला पद्धत (Consignment Basis) म्हणतात. यांत आयातदारावर कांहीं वेळां दर्शनी हुंडीही पाठवली जात नाहीं व जसजशी विक्री होईल तसतसे त्या फर्मला निर्यातदाराकडे पैसे पाठवतां येतात. अशावेळीं त्या फर्मला रिझर्व बँकेबरोबर अशा चलनाच्या पाठवणीसाठीं खास पूर्वव्यवस्था करून घेता येते, व हिशेबतपासनीसांचे आयात मालांतील विक्री दाखविणारे अधिकृत शेरापत्रक दाखल केले कीं मग तिला परदेशीचलन विकत मिळूं शकते. अशा व्यवस्थेसाठीं करावा लागणारा अर्ज त्या कंपनीला रिझर्व बँकेकडे परस्पर करतां येतो किंवा अधिकृत बँकेतर्फेही सादर करतां येतो. विशेषतः असे व्यवहार एकाच कंपनीच्या पोटकंपन्या किंवा शाखा दुसरीकडे असतात तेव्हां होऊं शकतो. अशा पोटकंपन्या किंवा शाखा जर अन्य देशांत असतील तर त्यांच्यातर्फे त्यांच्या भारतांतील कचेरीला त्या परदेशी कचेरीतर्फे माल विकत घेतां येतो व विकताही येतो. अशावेळीं विकत घेताना पैसे पाठवणें व आपल्या मालाच्या विक्रीचे पैसे भारतांत आणणें असे सव्यापसव्य करण्याऐवजीं विकत घेतलेला माल जर जास्त किंमतीचा असेल तर त्याच्या फरकाचीच किंमत फक्त परदेशांत पाठवली तरी चालते. अशी रक्कम दरवेळी शेवटच्या आंकड्या पर्यंत न काढतां ठोक रकमाच पाठवल्या जातात. त्याचप्रमाणें वेळोवेळी परदेशांतील प्रतिनिधीला माल खरेदी करताना नक्की किती रक्कम लागेल याची माहिती नसल्यानें त्याबाबतीतही अशा खरेदीसाठीं व अशाच प्रकारच्या अन्य खर्चासाठीं ठोक रकमा पाठवण्याची सोय, रिझर्व बँकेच्या खास लेखी अनुमतीने करतां येते. मात्र ही सोय फक्त ब्रिटन किंवा स्टर्लिंग विभागांतील देशात पाठवावयाच्या रकमेबाबतच होऊं शकते. अशा बाबतचे अर्ज रिझर्व बँकेकडे वर अन्यत्र उल्लेखिल्या प्रमाणें त्या कंपनीला परस्पर किंवा अधिकृत बँकेतर्फेही करतां येतात. त्या अर्जांत अशा सवलतीची जरूर कां आहे याची पुराव्यासह कारणें द्यावी लागतात. तसेंच हा भरणा कशा पद्धतीनें व कशा प्रकारचा होईल याचाही उल्लेख करावा लागतो.

अशी सवलत देतांना, त्या कंपनीवर रिझर्व बँक परदेशी चलननिर्यातीचे मासिक परिपत्रक पाठवण्याची अट घालते. त्या परिपत्रकांत प्रत्येक भरण्याची रकम नोंदून त्या भरण्याबाबतचे कारण योग्य पुराव्यासहित घावें लागतें. अशा ठोक रकमा पाठवण्याची सवलत भारतांत काम करणाऱ्या परदेशी तेल कंपन्यांना दिली गेली आहे. त्यायोगें त्या अशा रकमा आपल्या मूळ कचेरीला पाठवू शकतात व नंतर पुराव्याच्या कागदपत्रांसह रिझर्व बँकेकडे मासिक परिपत्रक दाखल करतात.

अशा रोख रकमा पाठवण्यासाठी दिल्या गेलेल्या खास परवान्याचा दुरुपयोग केलेला जर आढळला तर तो परवाना रद्द होऊं शकतो. तो ज्या कारणासाठी दिला आहे त्याशिवाय अन्य कारणासाठी, बेकायदा परकीय चलन न पाठविण्याचे बंधन, तो धारण करणाऱ्यावर असतें.

आयात परवान्याखेरीज (जिथे तो लागत नाही अशा अपवादात्मक आयातीची उदाहरणें सोडून) जर कुठलीही बेकायदा आयात कुणी केली तर सरकारला असा आयात झालेला माल जप्त करण्याचा अधिकार आहे. याबाबत कायद्याच्या अज्ञानाची सबब चालूं शकत नाही. इतकेंच नाही

बाबत अन्य व्यवहार करताना बँका जागरूक रहातातच. त्यामुळें कुठल्याही परिस्थितीत आयातीबाबत वा त्याच्या कायद्याबाबत व परकीय चलन खरेदीबाबत माहीती नसल्यास कुठल्यातरी अधिकृत बँकेकडे आधी योग्य ती चौकशी करणे जास्त हितावह असते. याबाबतची सर्व माहिती अधिकृत बँका आनंदाने पुरवतात, व योग्य ती मदत करण्यास तयार असतात.

कित्येकदां परदेशांतील व्यक्तींकडून कांहीं व्यक्तींना त्यांच्या अन्योन्य संबंधामुळे कांही लहानलहान वस्तू भेट म्हणून येऊं शकतात. अशा आयातीबाबत रिझर्व बँकेंकडे अर्ज केल्यास व त्याबाबतचा पत्रव्यवहार वगैरे दाखल केल्यास ती सदर माल सोडवून घेण्यासाठीं "विनाहरकतीचें पत्र" ( No Objection Certificate ) देऊं शकते. मात्र असे पत्र मागताना रिझर्व बँकेची, या आयातीमुळे कुठलेही परदेशी चलन केव्हांही प्रत्यक्षपणे वा अप्रत्यक्षपणे बाहेर पाठवावे लागणार नाहीं याची खात्री पटवावी लागते व ती भेट येण्यासाठी दाखवलेला पुरावा तिला ग्राह्य असा असावा लागतो. अशा रिझर्व बँकेने दिलेल्या परवान्यावर जकातखाते माल सोडवून घ्यायला योग्य ती जकात घेऊनच परवानगी देते. असाच अर्ज भारतातील कंपनीला, कुणी नमुन्याच्या वस्तू किंवा जाहिरातीच्या वस्तू पाठवल्यास व त्या इथें विनामूल्य वाटल्या जावयाच्या असल्यास, करता येतो व त्या वस्तू सोडवून घेतां येतात. मात्र परदेशातील प्रवास संपवून परत येताना भेटीच्या, अगर जाहिरातीच्या अशा वस्तू कुणाच्या वैयक्तिक सामानसुमानांत असल्यास त्याबाबत रिझर्व बँक असा अर्ज स्वीकारत नाहीं. आणि तशा वस्तू जकातखात्याच्या नियमानुसार व अटीनुसारच सोडवल्या जाऊं शकतात. अशा रितीनें आयातीवर हरतऱ्हेची बंधनें असल्यानें कुठल्याही वस्तूची आयात करतांना त्या व्यक्तीनें त्यासंबंधी असलेल्या व्यापारनियंत्रणाच्या, विनिमयनियंत्रणाच्या व जकात खात्याच्या नियमाची माहिती आधी करून घेणें जरूर असते. कुठल्याही वस्तूची आयात म्हणजे विदेशविनिमयावर ताण अशी परिस्थिती असल्यानें ज्या ज्या देशांची व्यापारतुला तसेच प्रदानतुला समतोल नसते त्या त्या देशांत आयातीवरील नियंत्रण कडक असते, हा सर्वसामान्य सिद्धांत आहे.

## निर्यातीवरील विनिमयनियंत्रणें :

भारतीय व्यापारनियत्रणानें आयातीवर जशी बधनें घातली आहेत तसेंच निर्यातीवरही कांहीं निर्बंध ठेवले आहेत. आयातनियत्रणाबाबतचे सरकारचे धोरण दरवर्षी जसें रेड बुक मध्यें जाहीर होतें तसेंच निर्यातीबाबतचे धोरण ब्ल्यू बुक (Blue Book) द्वारा वेळोवेळीं जाहीर केले जातें. त्याखेरीज निर्यातवाढीसाठीं (Export Promotion) एक 'ग्रीन बुक' देखील व्यापार व उद्योगविभागाच्या केंद्रीय खात्याकडून प्रसिद्ध केलें जातें.

आयातीप्रमाणेंच निर्यातीवरचे हे निर्बंध दुसऱ्या महायुद्धाचे सुरवातीस सुरू झाले. प्रथमत सन १८७८ च्या सी कस्टम्स ॲक्टच्या आधारावर त्याबाबतचे अधिकार सरकारनें घेतले होते नतर डिफेन्स ऑफ इंडिया रूल्स खालीं ते अधिकार घेण्यात आले. त्यानतर १९४६ सालीं एक वटहुकुम काढून ते तसेच चालू ठेवण्यात आले होते व मार्च १९४७ मध्यें शेवटीं त्याबाबत आयातनिर्यात (नियत्रण) कायदा करण्यात आला. प्रथम तो तीन वर्षांपुरताच होता. पण १९५०, १९५५ व १९६० साली दर-वेळेला मुदत सपण्याचे वेळीं त्याची व्याप्ती वाढवण्यात आली व सध्याचा कायदा ३१ मार्च १९६६ पर्यंत लागू आहे. या कायद्यान्वयें आता (१) केंद्र सरकारनें स्वत केलेली निर्यात, (२) बाहेर जाणाऱ्या जहाजाचे व विमानाचे 'स्टोअर्स' या सदरात पडणारे सामान, (३) बाहेर जाणाऱ्या प्रवाशाचे वैयक्तिक सामान, (४) पोस्टल नोटिसाच्या नियमान्वयें झालेली निर्यात, (५) सर्वसाधारण मुक्त परवान्याखालीं झालेली निर्यात, (६) वदली प्रवासान्वये भारतीय बदरातून रवाना झालेला माल, (७) अन्य ठिकाणीं निर्यात करण्यासाठीं 'बॉंडेड' असलेला माल, (८) अन्य देशात पाठवण्यासाठीं पोस्टानें भारतात आलेल्या, संक्रमणाखालील वस्तू, (९) वैध आयात परवान्याखालीं न आल्यामुळें न कस्टम्स अधिकाऱ्याच्या हुकुमान्वयें केलेली त्याची निर्यात, येवढ्या प्रकारची निर्यात सोडून बाकी सर्व तऱ्हेच्या निर्यातीसाठीं परवाना काढावा लागतो. अशा ज्या वस्तूसाठीं परवाना काढावा लागतो त्याची यादी ब्ल्यू बुकमध्यें

दिली जाते. त्याखेरीज, काथ्या व त्याच्या वस्तू, चहा कॉफी, व मादक पदार्थ याची निर्यात अन्य वेगवेगळ्या कायद्यानें नियमित केली आहे तर सोने, चांदी, जडजवाहीर व नोटा, नाणी याची निर्यात विनिमयनियत्रणानें नियमित केलेली आहे. याखेरीज भारताबाहेर इतर कुठलीही निर्यात करून राष्ट्राच्या प्रदानतुलेंत भर घालण्याची कुणालाही परवानगी आहे. किंबहुना राष्ट्राचा विकास जास्तीत जास्त व्हावयाचा असेल तर निर्यात जास्तीत जास्त वाढवणें हाच एक मार्ग असतो. इतर कुठल्याही मदतीवर अवलंबून रहावयाचे नसेल आणि कर्ज़ही वाढू नयेत अशी इच्छा असेल तर आयाती-पेक्षा जास्त निर्यात करणेंच भारताला अपरिहार्य आहे. विकसित राष्ट्रांशी भारताच्या निर्यात व्यापाराची तुलना केली तर आपली निर्यात नगण्य आहे असेंच म्हणावे लागेल. यावावत आपल्यापेक्षा अनेक पटीनें ल्हान असलेल्या खालील काहीं राष्ट्रांची निर्यात आपल्या अनेकपट जास्त आहे असेंच दिसून येईल.

## वार्षिक निर्यात अंदाजे दशलक्ष डॉलर्समध्यें

| | | | |
|---|---|---|---|
| इंग्लंड (स्वाधीनतील बेटे धरून) | १०९२० | नेदरलँडस | ४५९९ |
| प. जर्मनी | १२९३६ | बेल्जम—लक्झेंबर्ग | ४२१२ |
| फ्रान्स | ७७२४ | भारत | १४७५ |
| इटली | ४८४२ | | |

ज्या भारतीय व्यापाऱ्याना निर्यात करावयाची असते त्यानी ब्ल्यू बुक, ग्रीन बुक व वेळोवेळीं प्रसिद्ध होणाऱ्या व साप्ताहिक आयातनिर्यातनियत्रण-पत्रकात समाविष्ट केल्या जाणाऱ्या प्रेस नोटीसा, ट्रेड नोटीसा, पब्लिक नोटीसा याची दखल घेणें जरुर असतें. ज्या वस्तूच्या निर्यातीस सर्वसाधारणपणें बंदी आहे त्याच्या निर्यातीस अगदी खास कारण असल्याखेरीज सहसा परवानगी दिली जात नाही. मात्र बाहेर जाणाऱ्या प्रवाशाना स्मरण वस्तू म्हणून अथवा अन्य काही वस्तू वैयक्तिक उपयोगासाठीं म्हणून न्यावयाच्या असतील तर त्यासाठीं परवान्याची जरुर नसते ज्या प्रवाशाना नतर भारतात परत

यावयाचे असेल त्यांनी, त्यावेळीं त्या वस्तूंची आयात धरली जाऊं नये म्हणून, सोने व त्याच्या वस्तू (मर्यादित रकमेपर्यंत), घड्याळे, कॅमेरा, टाईपरायटर, रेडियो, वगैरे वस्तू बरोबर नेल्यास त्यांचा निर्यातपरवाना घेऊन ठेवावा लागतो. हा परवाना जावयाच्या बंदरांतील, विमानतळावरील कस्टम्स अधिकाऱ्याकडून तिथल्या तिथे लगेच मिळू शकतो.

आयातपरवान्यासाठीं जे अधिकारी नियुक्त केले आहेत तेच अधिकारी निर्यात परवाना देऊं शकतात. त्याखेरीज अमृतसर, त्रिपुरा येथेही दोन निर्यात–अधिकारी नियुक्त केले गेले आहेत व पोर्ट ब्लेअर, अंदमान येथील चीफ कमिशनरलाही हा अधिकार दिला गेलेला आहे. ज्या वस्तूंच्या निर्यातीवर बंदी आहे त्याबाबतचे अर्ज नवीदिल्ली येथे मुख्य नियंत्रकाकडेच करावे लागतात. बाकीच्या बाबत, जिथून निर्यात होते त्या बंदराजवळच्या निर्यात–अधिकाऱ्याकडे अर्ज करावे लागतात. शिलाँग, त्रिपुरा, अमृतसर येथील अधिकारी खास करून पाकिस्तान व खुष्कीमार्गे अफगाणिस्तान व ब्रह्मदेश यांच्याकडे पाठवावयाच्या वस्तूंच्या निर्यातीबाबतचे अर्ज स्वीकारतात. ज्या वस्तूंची निर्यात सर्रास वैध आहे त्याबाबतचे सर्वसाधारण मुक्त परवाने (O. G. L.) सध्यां चार आहेत. या वस्तूंखेरीज परवाना घेऊनच जे अन्य वस्तूंची निर्यात करतात त्यांचे (१) तोच धंदा करणारे मान्य निर्यातदार (२) नवीन निर्यातदार व (३) उत्पादक–कारखानदार, खाणमालक व मळेकरी–असे तीन विभाग परवाने देण्यासाठीं केले जातात. कच्ची लोकर, अशुद्ध धातूची माती वगैरे बाबत परवाने देतांना एक 'कोटा' ठरवूनच ते दिले जातात. *कुठलाही निर्यातपरवाना हा निर्यातदारालाच* उपयोगांत आणतां येतो व तो दुसऱ्याच्या नांवे वर्ग करतां येत नाही. आयात व निर्यात याबाबत भारताप्रमाणें प्रत्येक देशाचेही निर्बंध असल्यानें व भारतीय निर्यात, ही अन्यत्र आयात होत असल्यानें त्या त्या देशांतून आयात व चलनाबाबत काय नियम निर्बंध आहे, याची भारतीय निर्यातदारानें प्रत्यक्ष वा अधिकृत बँकेनर्फे जरुर ती माहिती घेणें इष्ट असते. अशी माहिती त्या त्या देशांत असलेल्या भारत सरकारच्या व्यापारी प्रतिनिधितर्फेही मिळूं शकते.

भारताबाहेर जाणाऱ्या प्रवाशांना आपले वैयक्तिक सामान बरोबर नेताना (किंवा भारत सोडल्यापासून चार महिन्यांपर्यंत, ते नंतर स्वतंत्रपणें जात असेल तर) अन्यत्र वर उल्लेखिलेल्या अपवादाशिवाय निर्यातपरवाना लागत नाही. मात्र या वस्तूंचा व्यापारी उपयोग केला जाता कामा नये. ज्या वस्तू देणगी म्हणून वा व्यापारासाठीं पोस्टानें पाठवावयाच्या असतात त्यांचे नियम ५२ व ६३ क्रमांकाच्या पोस्टल नोटिसांमधून (सध्यां) केलेले आहेत. धान्य, डाळी, पीठ वगैरेचें पार्सल जर पांच पौंड वजनापेक्षां कमी असेल तर व दुधाचें पदार्थ २० पौंड वजनापेक्षां कमी असतील तर निर्यात-परवाना लागत नाही. अर्थात जिथे असा परवाना लागत नाही तिथेंही विनिमयनियंत्रणाचे निर्बंध पाळावेच लागतात, व योग्य ते चलन त्या बाबत केलेल्या नियमाप्रमाणें मुदतीत व योग्य प्रकाराने येत आहे हे दाखविण्यासाठीं जी. आर किंवा ई. पी. किंवा पी. पी. तऱ्हेचे फॉर्म भरून द्यावे लागतात.

# परकीय चलन खरेदी
## (आयातीखेरीज अन्य कारणासाठीं)

१९

ज्याप्रमाणें वस्तूंच्या आयातीबद्दल परकीय चलन खरेदी करावे लागते त्याचप्रमाणें इतर कांहीं व्यवहारांचे वेळीही परकीय चलन खरेदी करावें लागते. कुठल्याही राष्ट्राशी आपला तीन प्रकारचा व्यवहार होऊं शकतो.

१ मालाची आयात व निर्यात म्हणजेच दृश्य मालाची खरेदी विक्री.

२ सेवा किंवा अदृश्य वस्तूंची खरेदी विक्री वा आयात निर्यात.

३ [अ] प्रत्यक्ष रकमेची आयातनिर्यात म्हणजेच गुंतवणुकीसाठीं पाठविलेले किंवा आणलेले भांडवल व त्याची परतफेड व [ब] वैयक्तिक अशा अन्य व्यवहारांसाठीं पाठविलेल्या वा आलेल्या रकमा.

यातील आयातनिर्यातीचा व्यवहार हा अर्थातच मोठ्या प्रमाणावर होत असतो. पहिल्या भागांत दिलेल्या भारताच्या व्यापारतुलेकडे बघितलें म्हणजे परकीय देशांशीं झालेल्या अशा व्यवहारांत आयातनिर्यातीचे प्रमाण किती मोठ्या प्रमाणावर आहे याची कल्पना येऊं शकेल. दुसऱ्या प्रकारचा व्यवहार आणि तिसऱ्या प्रकारच्या व्यवहारांतील दुसरा भाग (ब) यासाठीं मात्र त्या मानानें कमी प्रमाणावर परकीय चलनाचा व्यवहार होतो. तरीपण अजून आपल्याकडे नौकानयनासाठीं फारशा भारतीय बोटी उपलब्ध नसल्याने, बोटींचे भाडे व मालाचा विमा यासाठीं आपल्याला बरीच रक्कम परकीय चलनांत खर्च करावी लागते, व त्याचा बराच ताण नाइलाजाने आपल्या प्रदानतुलेवर पडतो. पहिल्या प्रकारांतील आयातीच्या प्रदानाबद्दल स्वतंत्रपणें पूर्वीच्या प्रकरणांत उहापोह केला आहे.

त्याचप्रमाणें वैयक्तिक व्यवहारासाठीं बऱ्याच तऱ्हेने परकीय चलन खरेदी करावे लागत असल्याने त्याचाही स्वतंत्रपणे विचार-करणे आवश्यक ठरते. दरवर्षी अशी सुमारें १०० कोटी रुपयाइतकी परकीय चलनाची रक्कम आपल्याला बाहेर पाठवावी लागते. या बाबींबद्दल विनिमय-नियंत्रणाचे बरेच निर्बंध आहेत. व काहीं बाबतींत जरी अधिक रक्कम

[१] ज्यावेळेला एखाद्या विद्यार्थ्याला उच्च शिक्षणासाठीं परदेशांत जावयाचे असते त्यावेळेला त्याला जर शिष्यवृत्ती मिळाली नसेल तर स्वखर्चाने अथवा पालकाचे खर्चाने जावे लागते. कित्येक वेळां शिष्यवृत्ती मिळाली असली तरीही सुरवातीला कांहीं खर्च त्याला करावाच लागतो. प्रत्यक्ष प्रवासखर्चाबाबत अर्थात परकीय चलनाचा प्रश्न येत नाहीं. कारण भारतांत कुठल्याही विमानकंपनीला वा नौकाकंपनीला भारतीय चलनांत म्हणजे रुपयांत पैसे भरून तिकिट घ्यावे लागते. पण तरीही त्याखेरीज अन्य असे कांही खर्च असतातच. असे खर्च भागवण्यासाठींही कांहीं वेळां भत्तापरवाना घ्यावा लागतोच. कांहीं वेळां हा खर्च जर नंतर विद्यापीठाकडून वा अन्य संस्थांकडून मिळणार असेल तर तेवढे परकीय चलन परत पाठविण्याच्या अटींवर (Repatriation Condition) असा परवाना रिझर्व्ह बँक देते. इतर वेळीं मात्र अशा परवान्यावर तो धारण करणाऱ्या विद्यार्थ्याला किंवा त्याच्या पालकाला किंवा त्यांच्या बँकेला असे पैसे वेळोवेळीं परवान्यांत लिहिल्याप्रमाणें पाठवतां येतात. असे परवाने देतेवेळीं विद्यार्थ्यांची येथील गुणवत्ताही दिवसेंदिवस बघितली जाऊं लागली आहे. केवळ आर्थिक शक्यता आहे म्हणून परदेशात शिक्षण घ्यायला जाणाऱ्या विद्यार्थ्यांसाठीं परकीय चलन उपलब्ध न करतां ज्यांना उच्च शिक्षणाची जरूरी आहे व जे येथें दिले जाऊं शकत नाहीं, त्या शिक्षणासाठीं गुणी विद्यार्थ्यांकरतांच चलनपरवाना देण्याची प्रथा, परकीय चलनाच्या टंचाईमुळे पडूं लागली आहे. त्यासाठी विद्यार्थ्यांचे येथले पदवीचे प्रमाणपत्र (व कांहीं वेळां गुणही) मागितले जाते. अशा प्रमाणपत्राची एक जादा खरी प्रत काढून ती अर्जासोबत जोडावी लागते. तसेंच अशा परवान्याचा विचार करताना शक्यतो जे शिक्षण भारतांत मिळूं शकणार नाहीं अशा विशेष शिक्षणक्रमाला व पदव्युत्तर शिक्षणक्रमालाच प्राधान्य दिले जाते. कांही डिप्लोमा व खास प्रकारच्या धंदेवाईक शिक्षणासाठींही परवान्यावर परकीय चलन उपलब्ध करून दिले जाते.

असा भत्तापरवाना मिळवण्यासाठीं एका ठराविक अर्जावर अर्जदाराला आपली माहिती द्यावी लागते. हा छापील अर्ज कुठल्याही अधिकृत बँकेत किंवा रिझर्व बँकेच्या विदेशविनिमय कचेरींत मिळूं शकतो. हा अर्ज, शक्यतो जाण्याचे आधी तीन महिने करावा अशी विदेशविनिमय-खात्याची अपेक्षा असते. म्हणजे विद्यार्थ्याला योग्य वेळीं चलन उपलब्ध होण्यास अडचण पडत नाहीं. अशा अर्जाबरोबर पदवीप्रमाणपत्र व त्याच्या प्रतीबरोबरच, ज्या देशांत शिक्षण घ्यावयाचें आहे तिथे प्रवेश दिल्या-बद्दलचे त्या विद्यापीठ वा शाळेचे मूळ पत्र त्याच्या एक जादा प्रतीसह हजर करावे लागते. तसेच तिथें रहाण्यासाठीं व शिक्षणक्रमासाठीं किती खर्च साधारणपणे लागेल व शिक्षणक्रम किती कालावधीचा आहे याचा अंदाज देणारी रक्कमही अशा पत्रांत असावी लागते, तसेंच ती संस्था कांहीं पगार किंवा अनुदान ( तांत्रिक कंपन्यातून प्रात्यक्षिक शिक्षण घ्यावयाचें असल्यास ) देणार आहे कां याचाही त्यांत उल्लेख असावा लागतो, अथवा मागितलेल्या चलनासाठीं तें तितकें आवश्यक आहे असे दाखविणारा दुसरा कांहीं पुरावा दाखल करावा लागतो. तेव्हां परवाना मिळवताना असे पत्र वा माहितीपत्रक आणण्याची विद्यार्थ्यानें दखल घ्यायला पाहिजे. म्हणजे परवाना मिळण्यास त्रास पडत नाहीं. तसेंच प्रवेश मिळवण्यासाठींच्या अर्जासाठींही कांही रक्कम प्रवेशफी म्हणून द्यावी लागते तेव्हां देखील ही प्रश्नपत्रिका भरून द्यावी लागते. प्रवेश फीला परवानगी देतांना, पुढे प्रत्यक्ष शिक्षणासाठीं विदेशविनिमयाचा परवाना दिला जाईलच अशा तऱ्हेचे बंधन न स्वीकारता परवानगी दिली जाते. प्रवेश मिळाल्यावर संपूर्ण खर्च किती लागेल व ती रक्कम मासिक–त्रैमासिक–षण्मासिक वा वार्षिक हप्त्यानें पाठवायला हवी याबद्दलही अर्जदाराला त्यावेळचे प्रश्नपत्रिकेंत ( अर्जात ) खुलासा करावा लागतो. एकादा शिक्षणक्रम जरी वर्षाहून जास्त मुदतीचा असला तर विनिमय नियंत्रण फक्त एकाच वर्षापुरता परवाना देत असते. ते वर्ष पुरे झाल्यानंतर किंवा तत्पूर्वीही कांही काल, विद्यार्थी त्या संस्थेत शिक्षण घेत आहे व त्याला तो शिक्षणक्रम चालू ठेवण्याची अनुमति आहे;

तो शिक्षणक्रम अजून इतक्या मुदतीचा आहे व त्याला इतका खर्च लागेल अशा प्रकारचे पत्र विदेशांतील शैक्षणिक संस्थेकडून मागवावे लागते व दुसऱ्या वर्षाचा अर्ज करताना ते एका जादा प्रतीसह जोडावे लागते, म्हणजे पुढील वर्षासाठीं नवा परवाना मिळूं शकतो. परवान्यासाठीं प्रश्न-पत्रिका भरताना विद्यार्थ्याचे किंवा त्याच्या पालकांचे बाहेर परकीय चलन-खाते किंवा सिक्युरिटीज आहेत की नाही याबद्दलही एक प्रतिज्ञा पत्रक जोडावें लागते.

असा परवाना जेव्हां दिला जातो तेव्हां सुरवातीच्या अनुषंगिक खर्चासाठीं म्हणजे कपडेलत्ते वगैरेसाठी जादा अशी एक हजार रुपयाची रक्कम परवान्यांत जास्त उपलब्ध होऊं शकते. अर्थात् ती देणें न देणें विनिमयनियंत्रणावर अवलंबून आहे.

ज्या ज्या वेळेला परवान्यावर विदेशी चलन विकत घ्यावयाचे असते त्या त्या वेळेला तो परवाना अधिकृत बँकेकडे दाखल करावा लागतो. या परवान्यावर प्रत्येक विक्रीची नोंद व्हावी लागते. तसेंच चलनखरेदीचा जो 'ए' किंवा तत्सम फॉर्म भरावा लागतो त्यावरही या परवान्यांच्या क्रमांकांची माहिती द्यावी लागते. परवान्यातील रकमेइतके चलन पाठविले गेल्यावर तो परवाना अधिकृत बँकेकडे सादर करावा लागतो व अधिकृत बँक तो संपूर्ण उपयोगांत आणला गेला म्हणून रिझर्व बँकेकडे परत करते. त्या पर-वान्याचे जर नूतनीकरण करून घ्यावयाचे असले तर त्याबाबतचा अर्ज रिझर्व बँकेकडे अधिकृत बँकेमार्फत करावा लागतो. त्या अर्जांत आधीं मिळा-लेल्या परवान्याचा क्रमांक, वगैरे संपूर्ण माहिती द्यावी लागते.

असे परवाने देताना रिझर्व बँक धारकांचे सन १९४७ च्या विदेश विनिमय नियमन कायद्यांतील कलम ४ मधील तिसऱ्या पॅरेग्राफकडे लक्ष वेधीत असते. त्यानुसार, मिळालेल्या परवान्यान्वयें घेतल्या जाणाऱ्या परकीय चलनाचा उपयोग, ज्या कामासाठीं परवाना दिला गेला असेल त्यासाठीच करण्याचे धारकावर बंधन आहे व तसा तो करतां येत नसेल किंवा त्यांतील कांहीं भाग खर्च न होतां शिल्लक रहात असेल किंवा परवान्या-

तील खास अटींचे पालन करतां येत नसेल तर धारकाला विनाविलंब तो परवाना परत करावा लागतो किंवा त्यावर घेतलेले व शिल्लक असलेले परदेशी चलन अधिकृत बँकेला विकावे लागते किंवा अन्य मिळकतीपैकी कांहीं रक्कम शिल्लक राहिली असेल तर ते चलनही अधिकृत बँकेला विकावे लागते. या चलनातून भारतांत आयात करण्यासाठीं किंवा वस्तु विकत घेण्यासाठीं चलन खर्च करण्याची परवानगी नसते, तसेंच या चलनांतील कांहीं भाग तसाच किंवा रुपयांत पैसे घेऊन दुसऱ्या कुणाला देतांही येत नाहीं. तसेच परवान्याचे पैसे पाठवताना सदर विद्यार्थी अजून ते शिक्षण परदेशी घेत आहे असें लिहून द्यावे लागते.

विदेशविनिमयाचा परवाना घेणाऱ्या विद्यार्थ्याला नाममात्र रक्कम देऊन आजारपण, इस्पितळाच्या खर्चाबाबत, जर्मनी अमेरिकासारख्या देशांत प्रचलित असलेला विमा घ्यावयाची इच्छा असेल तर, भारतसरकारच्या त्या त्या देशांतील शैक्षणिक प्रतिनिधीकडून तशी माहिती घेता येते व त्याची सोय करून घेता येते.

परदेशी गेलेला एकादा विद्यार्थी जर सुट्टीसाठीं भारतांत परत आला तर रिझर्व बँकेकडे त्याबाबतची माहिती देऊन, त्याला आपल्या परवान्यांत योग्य तो बदल करून घ्यावा लागतो, तसेंच शिक्षणक्रम संपल्यावर परत येण्यासाठीं लागणाऱ्या तिकीटांचे पैसे त्याला किंवा त्याचे कुटुंबियाना भारतीय रुपयात देता येतात. व त्यासाठी विदेशी चलन मुक्त केले जात नाहीं. शिक्षणक्रमासाठीं गेलेल्या विद्यार्थ्याला जर नंतर तिथे संपूर्ण किंवा अंशकाल नोकरी मिळाली किंवा स्टायपेंड किंवा शिष्यवृत्ती मिळाली तर त्याची माहिती योग्य ती नेमणूक करणाऱ्या अधिकाऱ्याकडून घेतलेल्या पुराव्याच्या पत्रासह रिझर्व बँकेकडे कळवावी लागते. त्यांत पगाराची रक्कम, नोकरीची मुदत याबाबतची माहिती देणें आवश्यक असते.

भरयाचा अर्ज केल्यानंतर असा परवाना मिळाला तरी त्यावर पैसे पाठवायला मग कुठलीही अडचण नसते असे समजून चालणार नाहीं. कारण तो परवाना, प्रत्यक्षपणे खरोखरच खर्च होणार असेल तरच वैध असतो.

अन्यथा परवाना मिळाल्यानंतर विदेशी जावयाचे रद्द झाल्यास, परवाना निरुपयोगी असतो. अशा परवान्याचे आधारे अधिकृत बँकाना विदेशी चलन विकताना दोन अटींचे पालन करावे लागते. ते ह्मणजे अशा विक्रीचे वेळीं अर्जदाराने योग्य ते विमानकंपनीचे या बोटीचे तिकीट काढले आहे हें बघावे लागते व असे चलन प्रत्यक्ष प्रवासाचे तारखेआधी फक्त पंधरा दिवसच विकतां येते. त्याचप्रमाणे अशी विक्री केल्यावर त्याची नोंद अधिकृत बँकेला त्या परवान्याचे पाठीमागे करावी लागते. असा परवाना मिळाल्यावर दरवेळीं तो बँकेत नेण्याऐवजी बँकेकडेच तो ठेवून त्याचे आधारे ठराविक दिवशी विद्यार्थ्याला ड्राफ्ट किंवा मेल टान्स्फरद्वारे पैसे पाठविण्यांची कायमची सूचनाही देऊन ठेवतां येते. सोयीचे दृष्टीने व परदेशांत वेळेवर पैसे न मिळाल्यानें अडचण होऊं नये म्हणून विद्यार्थ्यानें परदेशी गेल्यावर विदेशांतील बँकेत आपले खाते उघडून त्याचा खाते क्रमांक व बँकेचे नांव भारतीय बँकेला कळविल्यास अशा कायमच्या सूचनानुसार ह्या बँकेला त्या खात्यांत रक्कम जमा करणे सोपे जाते व ड्राफ्ट वगैरे गहाळ होण्याचीही विद्यार्थ्याचे दृष्टीने काळजी रहात नाही.

अशा परवान्यासाठीं किंवा त्यांच्या नूतनीकरणासाठी करावयाचा अर्ज अधिकृत बँकेतर्फेही रिझर्व बँकेकडे पाठवता येतो, व त्यासाठीं पुष्कळदां बँका आकारही घेत नाहींत. अशा अर्जाचा नमुना शेवटीं दिला आहे.

ज्यावेळीं अशा शिक्षणासाठीं किंवा प्रात्यक्षिक ज्ञानासाठीं सरकारतर्फे किंवा सरकारी संस्थेतर्फे अथवा सरकारी कायद्याने स्थापन झालेल्या संस्थेतर्फे विद्यार्थ्याला किंवा नोकरीतील व्यक्तीला, विदेशीं पाठविले जाते, तेव्हां असा अर्ज नव्या दिल्लीतील केंद्रीय अर्थ खात्याकडे करावा लागतो. मग तो रिझर्व्ह बँकेकडे येऊन आवश्यक ते विदेशीचलन उपलब्ध करणारा परवाना दिला जातो.

शिक्षणासाठीं किंवा प्रात्यक्षिक ज्ञानाखेरीज इतर बाबतीतही विदेशगमन जरुरीचे ठरते. वेगवेगळ्या व्यापारासाठीं अशी भेट द्यावयाची असल्यास त्यासाठीं जाणाऱ्या प्रवाशाला धंदेवाइक भेटीबद्दल परकीय चलनाच्या परवान्या-

साठीं वेगळी प्रश्नपत्रिका असते, ती भरून पाठवावी लागते. ही प्रश्नपत्रिका अधिकृत बँकांतून वा रिझर्व बँकेतील विदेशविनिमयविभागातर्फे मिळूं शकते व ती पाठविताना अशी भेट आवश्यक असल्याची कारणें व शक्य असल्यास तत्संबंधीचा पुरावा द्यावा लागतो.

सरकारी अधिकाऱ्याना जेव्हां खात्याच्या कामासाठीं किंवा अधिकृत दौऱ्यासाठीं, अधिवेशनासाठीं किंवा शिष्टमंडळातर्फे विदेशीं जाणे जरूर असते तेव्हां लागणाऱ्या विदेशविनिमयासाठी, केंद्रीय अर्थखात्याच्या आर्थिक व्यवहार-खात्याची, अनुज्ञा लागते. अशी अनुज्ञा मिळाल्यावर तत्संबंधीचे पत्र रिझर्व बँकेकडे पुरावा म्हणून दाखल करावे लागते, व मगच योग्य ते परकीयचलन उपलब्ध करणारा परवाना रिझर्व बँकेतर्फे दिला जातो.

याखेरीज भारतांत जर विशिष्ट रोगासाठी उपाययोजना होणे शक्य नसेल व खास तज्ञांचे सल्यासाठीं वा उपाययोजनेसाठीं परदेशीं जाणे जरूर असेल तर त्याबाबतही वेगळ्या तऱ्हेची प्रश्नपत्रिका भरून अधिकृत बँकेतर्फे किंवा परस्पर रिझर्व बँकेत विनिमय विभागाकडे पाठवावी लागते. ही प्रश्न-पत्रिकाही अधिकृत बँकांतून मिळूं शकते. मात्र अशा वेळीं ॲडमिनिस्ट्रेटिव्ह मेडिकल ऑफिसरची सही असलेले, प्रेसिडेन्सी सर्जनने दिलेले शिफारसपत्र आवश्यक असते. अशी उपाययोजना किंवा सल्ला परदेशी मिळण्याची शक्यता असेल तरच परकीय चलन उपलब्ध केले जाते. याबाबतींत प्रत्येक रोग्याची किती जरुरी आहे हे बघूनच प्रत्येक अर्जाच्या पात्रतेवर परकीय चलनाची रक्कम ठरविण्यांत येते. तसेंच ती उपाय योजना किती दिवसाची आहे व कशा प्रकारची आहे याचाही त्यावेळीं विचार करण्यांत येतो. रोग्याबरोबर अन्य कुणी जाणें आवश्यक असेल तर मेडिकल ऑफिसरच्या अर्जावर तसा उल्लेख असावा लागतो.

असा परवाना दिल्यावर नंतर प्रत्यक्ष इस्पितळांत राहण्याचा किंवा सॅनॅटोरीयममधील खर्च जास्त झाला तर जादा परकीय चलनासाठी कराव-याच्या अर्जासोबत इस्पितळाची बिले व रोग्याची देखभाल करणाऱ्या डॉक्टरचे शिफारसवजा पत्र आवश्यक ठरते.

किल्येकदां परदेशी गेल्यानंतर एखाद्या प्रवाशाला अशा प्रकारचा खर्च आवश्यक झाला किंवा दुखणे येऊन त्यावर औषधोपचाराची गरज निर्माण झाली तर त्या प्रवाशानें. त्याबाबतच्या वेगळ्या विदेशी चलनासाठी तो जिथे असेल त्या देशांतील भारतीय वकिलामार्फत आपला अर्ज पाठवावा लागतो. अशा अर्जासोबत भारतीय सरकारी प्रतिनिधीने मान्य वा नियुक्त केलेल्या दोन डॉक्टरांचे सही केलेले शिफारस पत्र जोडणे जरूर असते.

वैयक्तिक शिक्षणासाठीं, धंदेवाईक भेटीसाठीं किंवा औषधोपचारासाठी ज्याप्रमाणे परकीय चलन खर्च करण्यासाठी मंजुरी दिली जाते, त्याचप्रमाणे धार्मिक यात्रेसाठींही कांहीं प्रमाणांत असे चलन देण्यासाठी परवाने दिले जातात. केवळ हौशीसाठी परदेशी प्रवास करण्यावर मात्र हल्लीं विदेशविनिमयाच्या टंचाईमुळे बरेच निर्बंध घालण्यांत आले आहेत.

कुठल्याही प्रवाशाला प्रवासी—चेक किंवा त्याचे नांवाचा ड्राफ्ट दिल्यावर अधिकृत व्यवहारी त्याची नोंद त्याच्या पासपोर्टवर त्याबाबत ठेवलेल्या पानावर आपल्या शिक्यानिशी करतो. ज्यावेळेला पतीच्याच संयुक्त पासपोर्टवर (स्वतंत्र पासपोर्ट न घेतां) पत्नी प्रवास करीत असते तेव्हां संयुक्त पासपोर्टवरही ती नोंद करावी लागते. वडिलांच्या पासपोर्टवर मुले प्रवास करीत असतांना अशा नोंदीचे वेळीं ते चलन मुलांचे परवान्यावर दिले गेले आहे असा शेरा आवश्यक असतो. मुलांच्या आईवडलांचा जर स्वतंत्र वेगवेगळा पासपोर्ट असेल किंवा एकाद्या प्रवाशाला द्विनागरिकत्व असेल असें बँकेला वाटले तर, दोन्ही पासपोर्ट मागून तिला दोन्ही पासपोर्टावर ती नोंद करावी लागते.

ज्याप्रमाणें विदेशी चलन विकल्यावर त्याची पासपोर्टवर नोंद होते त्याप्रमाणें परत आल्यावर उरलेले चलन विकत घेणाऱ्या बँकेला त्या खरेदीची नोंदही पासपोर्टवर करावी लागते.

भारतीय नागरिकांच्या परदेशीय पत्नींचे पूर्वीचे राष्ट्रीयत्व अबाधित असले तरी विदेशविनिमयासाठीं भारतांत त्यांचे राष्ट्रीयत्व भारतीयच आहे असे · जले ज‍ ्यांना जर आपल्या स्वतःच्या देशाला भेट

द्यावयासाठीं, चलनाची जरुरी लागत असेल तर तसा रिझर्व बँकेकडे अर्ज करावा लागतो.

वेगवेगळ्या प्रवासाचे निमित्तानें लागणारे विदेशी चलन विशिष्ट परिस्थितीत अधिकृत व्यवहारीना विकतां येते, त्याचप्रमाणें विदेशी क्लब, संस्था याच्या सदस्यत्वाबद्दलच्या वर्गणीसाठीं बँका आपल्या अधिकारांत विदेशी चलन, क्लब व संस्थांच्या अधिकृत सदस्याना विकूं शकतात. मात्र शास्त्रीय किंवा शैक्षणिक किंवा व्यावसायिक स्वरुपाचेच हे क्लब वा संस्था असाव्या लागतात व अशी वर्गणी वार्षिक २०० रु. चे वर असता कामा नये. ही वर्गणी याहून जास्त असेल तर विनिमयनियंत्रणाची पूर्वसंमति आवश्यक ठरते. करावयाच्या खरेदी अर्जावर ( ए फॉर्मवर ) संस्थेचे नांव व पत्ता, वर्गणीची रक्कम व ती कुठल्या मुदतीची आहे याचे उल्लेख करावे लागतात व त्यासाठीं पूर्वीच्या वर्गणीची पावती, जाहिरात, किंवा संस्थेकडून आलेले पत्र / स्मरणपत्र, पुरावा म्हणून अधिकृत बँकेकडे द्यावे लागते. अधिकृत बँका एक हजार रु. किंमतीपर्यंतच्या अशा ड्राफ्टसाठीं एक रुपया आकार घेतात व ती वर्गणी टपालवदलीनें पाठवायची असल्यास किंवा तो ड्राफ्ट परस्पर संस्थेकडे पाठवावयाचा असल्यास रजिस्टर्ड टपालखर्चासाठीं २/३ रुपये वेगळे घेतात.

३ वरील वर्गणीप्रमाणेच खासगी उपयोगासाठीं बंदी नसलेली परदेशी मासिके किंवा नियतकालिके यांची वार्षिक वर्गणी देण्यासाठीं बँका लोच विनिमय विकूं शकतात. ही सवलत खासगी व्यक्ती, सरकारी खातीं, क्लब, ग्रंथालये व संस्था यांना उपलब्ध आहे. पण त्यांना जर एखाद्या पुस्तकविक्रेत्यातर्फे ही वर्गणी भरावयाची असेल तर मात्र त्या पुस्तकविक्रेत्याचा संबंधित खरेदी अर्ज अधिकृत बँकेला रिझर्व बँकेकडे पूर्वसंमतीसाठीं पाठवावा लागतो. अशी वर्गणी आजीव देखील ( Life Subscription ) पाठवता येते. मात्र अशा मासिकांची एकाहून जास्त प्रत मागवतां येत नाहीं ( ही सवलत पुस्तकांसाठीं नाहीं; फक्त नियतकालिकासाठींच असते ) व खरेदीच्या अर्जावर प्रकाशकांचे किंवा पाठवणाऱ्या विक्रेत्याचे नांव व पत्ता, मासिकाचे नांव व

वर्गणीची मुदत याचा उल्लेख करून त्याबाबतची जाहिरात, पत्रें, वगैरे पुरावा बँकेकडे हजर करावा लागतो.

## टपाली शिक्षणक्रम :

ज्या भारतीय रहिवाशांना परदेशाहून टपालानें कॉलेजे किंवा संस्था यांचे शिकवणी स्वरूपांतले अभ्यासक्रम घ्यावयाचे असतात त्यांचेसाठीं योग्य ते चलन अधिकृत बँका लगेच उपलब्ध करून देऊ शकतात. मात्र असा अभ्यासक्रम ठराविक विषयातील तांत्रिक वा शास्त्रीय शिक्षणाचाच असावा लागतो. तसेच या कोर्सची वार्षिक वर्गणी दर विद्यार्थ्यामागें रुपये दोनशेपेक्षां जास्त असून चालत नाही. खरेदीअर्जावर शिक्षणक्रम देणाऱ्या संस्थेचें नांव व पत्ता, फीची रक्कम, शिक्षणक्रमाचे वर्णन व मुदत देणें जरूर असते. तांत्रिक वा शास्त्रीय उदा. स्थापत्य शास्त्र, विद्युतशास्त्र वगैरे, शिक्षणक्रम नसल्यास टपाली शिक्षणक्रमाचे विनिमयासाठीं रिझर्व बँकेची पूर्वसंमति खरेदीअर्ज पाठवून मागवावी लागते. अर्जासोबत विद्यार्थ्याचें संपूर्ण नांव पत्ता, शिक्षणक्रमाची मुदत, ही संपूर्ण माहिती, व वार्षिक फीचा खुलासा करणारे संस्थेचे पत्र ही जोडणे आवश्यक असते. तसेच तो शिक्षणक्रम घेणाऱ्याची शैक्षणिक पात्रता व चालू व्यवसाय, तो शिक्षणक्रम निवडण्याची कारणें व पूर्वी तसाच शिक्षणक्रम घेतला असल्यास त्याची माहिती, हे सर्व द्यावे लागते.

## परीक्षांची फी :

या शिक्षणक्रमानंतर द्यावयाच्या किंवा अन्य तांत्रिक परीक्षांचे फीची रक्कम परदेशीं जास्तीत जास्त दरविद्यार्थ्यास दीडशे रुपयापर्यंत पाठवतां येते. मात्र अशी परीक्षा भारतातच होणार आहे असे त्यानें लिहून द्यावे लागते व परीक्षेचा फॉर्म, वगैरे योग्य तो पुरावा पाहून मगच विनिमयविक्री

खरेदीचा अर्ज केला तर त्याना योग्य ती विक्री करण्याचा अधिकार अधिकृत बँकेला आहे त्याचप्रमाणे परदेशी प्रतिनिधींनी लिहिलेल्या खास लेखासाठी सुद्धा विनिमयाची विक्री करता येते या विक्रीचे वेळीं ग्राहकाचे (Beneficiary) नाव व पत्ता, ज्यासाठीं पैसे दिले त्या लेखाचे नाव, पैसे एकदाच द्यावयाचे आहेत कीं पुन्हा पुन्हा हप्त्यानें द्यावयाचे आणि तो कुठल्या मासिकात व कधीं प्रसिद्ध झाला आहे त्याची माहिती द्यावी लागते. मात्र हिंदी वृत्त-पत्राना आपले पत्रप्रतिनिधी परदेशात दीर्घ मुदतीनें नेमावयाचे असतील तर त्याच्या पगारासाठीं किंवा भत्त्यासाठीं रिझर्व बँकेकडे अर्ज करून परवाना काढून घ्यावा लागतो

१ या रकमाशिवाय अभारतीय नागरिकाना परदेशात विनिमय पाठवण्यासाठीं विक्री करण्याचे अधिकृत व्यवहारी बँकाना जे अधिकार आहेत त्याचा उल्लेख अभारतीयाचे व्यवहाराबद्दल पुढील प्रकरणात माहिती दिली आहे तिथे संपूर्ण येईल.

# आयातीखेरीज अन्य बाबींसाठीं होणारे परदेशी चलनाचे व्यवहार

## २०

### विमापत्रें :

मागील प्रकरणांतून आयात व अन्य कांही व्यवहाराबाबत विचार केलेला आहे. पण विदेश विनिमयाचा विचार करतांना प्रदानतुलेच्या प्रत्येक बाबीचा विचार करावा लागतो. त्यांतील अदृश्य स्वरूपाच्या व्यवहारांत विमाव्यवहाराचाही अंतर्भाव होतो. विमापत्र काढताना इंग्रजीत कधीकधीं "विमा विकणें" ( To sell insurance ) अशीच संज्ञा वापरांत आणली जाते व एका अर्थाने ती विक्रीच होय. विमापत्र विकणारी कंपनी त्याद्वारा आपली सेवा किंवा हमीच संरक्षण निधिच्या रकमेची किंमत घेऊन विकत असते. अशा विमापॉलीसीद्वाराही अस्थायिकांचा भारतीय रुपयांवर हक्क येतो किंवा भारतीय स्थायिकांचा परकीयचलनावर हक्क येऊं शकतो. मात्र परदेशी विमाकंपनीकडून विमापत्र घेतले तर अशा विम्याचे संरक्षण हप्त्यासाठीं प्रथम परकीय चलन बाहेर पाठवावे लागेल. सध्या भारतांत विमा कॉर्पोरेशन आयुष्यविमा उतरवीत असल्याने भारतीय रहिवाशाना अन्य चलनांतील आयुष्यविम्याची पॉलीसी काढण्यास परवानगी नाहीं. अस्थायिक भारतीय नागरिक आणि भारतांत तात्पुरते राहणारे परदेशी नागरिक यांना मात्र असा परदेशी चलनांतील विमा घेतां येतो. तरी पण जर त्यांच्या किंवा इतर भारतीय रहिवाश्यांच्या पूर्वीच्या विमापॉलिसी रुपयांतील असतील तर त्याचे विदेशी चलनातील विमापत्रांत रूपांतर करावयाचे असल्यास रिझर्व बँकेची पूर्वसंमति घ्यावी लागते व अशा विमापत्रासंबंधीचे योग्य ते कागदपत्र व पूर्वेतिहास जर भारताबाहेरील विमाकचेरीस पाठविणें असतील तरीही अशी संमति, आवश्यक आहे. त्याचप्रमाणें कुठल्याही विमापत्राचा तब्दील व्यवहार अन्य

अस्थायिकाचे नांवे भारतीय रहिवाशाला करतां येत नाहीं. किंवा अस्थायिक व्यक्तीलाही दुसऱ्या अस्थायिकाच्या नांवाने भारतांत विमापत्रे वर्ग करतां येत नाहींत. याला फक्त एक अपवाद केलेला आहे. असा तबदील व्यवहार जर कुठलीही किंमत न घेतां म्हणजे विमापत्र बेचन न करता, केवळ प्रेम व जिव्हाळ्यामुळें अस्थायिक अशा विमापत्रधारकाच्या अन्य नातेवाइकाच्या नांवानें होत असेल तर तो व्यवहार अधिकृत व संमत धरला जातो.

भारतांत असलेल्या परदेशी रहिवाशांची विमापत्रे जर विदेशी चलनांत असतील व ते भारतांत असतां त्याचा संरक्षणनिधि जर विदेशी चलनांत भरावयाचा असेल तर त्यासाठीं योग्य ते परकीय चलन त्याना उपलब्ध केले जाते. सर्वसामान्यपणें, अस्थायिक किंवा परदेशी रहिवाशांना वेळोवेळीं भारतावाहेर त्यांच्या तेथील कुटुंबियांचे व अन्य अनुषंगिक खर्चासाठीं पैसे पाठवण्यांकरतां जें पुरेसे चलन नेहमीच उपलब्ध केले जाते, त्यांतून ते अशा प्रकारचे संरक्षणनिधि भरूं शकत असल्याने शक्यतों असा निधि भरण्यासाठीं पुन्हा वेगळें- विदेशीचलन मंजूर करण्याचा प्रश्न सहसा येत नाहीं.

## आयुष्य विमापत्रें :

कुठल्याही आयुष्यविम्याची मुदत भरल्यामुळें किंवा विमाधारकाच्या निधनामुळें त्या विमापत्राची रक्कम जर परदेशांत पाठवावयाची असेल तर त्याचे संमतीसाठी खालीलपैकी कुठली तरी परिस्थिती अस्तित्वांत असावी लागते.

( १ ) ज्या विमाकंपनीकडून ती हक्कपूर्ती होईल त्या विमाकंपनीने एकाद्या अस्थायिकाला आपले विमापत्र विकले असेल व त्याचा संरक्षणनिधि त्याचे मुदतीत किंवा धारकाचे निधनापूर्वी, त्या धारकाच्या अस्थायिक रुपयांच्या खात्यांतून गोळा केलेला असेल किंवा वेळोवेळीं- अशी रक्कम भारताबाहेरून त्या अस्थायिकाने पाठवली असेल, तर हक्कपूर्तीचे पैसे परदेशी चलनांत पाठवतां येतात.

( २ ) तसेच येथील विमाकंपनी कॉर्पोरेशनने जर एकाद्या परदेशी रहिवाशाला विमापत्र विकले असेल तर, किंवा

ii ( ३ ) भारतांतील रहिवाश्यानें अन्यत्र उल्लेखिल्याप्रमाणें आपल्या अस्थायिक नातेवाईकाच्या नांवे, पैसे न घेता स्वतःचे विमापत्र जर वर्ग केले असेल तरी देखील या दोन्ही परिस्थितींत विम्याची रक्कम परदेशी पाठवतां येते किंवा परकीय चलन रूपांतरित करतां येते. तसेच कुठल्याही अस्थायिकाच्या अधिकृत बँकेतील भारतीय रुपयांतील खात्यांत मुदत भरलेल्या विमापत्राचे पैसे जमा करण्यास ती रक्कम कितीही असली तरी विमा कॉर्पोरेशनला ( पूर्वी विमाकंपन्याना ) सर्वसामान्य संमति आहे.

## नाविकविमापत्रें :

भारतांतील आयातदार जेव्हां परदेशांतून माल मागवितो तेव्हां त्याबाबतचा विक्रीकरार बहुतांशी निर्यातदार वा. भा. वि प्रकारचा करीत असल्याने त्याबाबतचा विमा परदेशांत उतरला जातो. त्याबाबतची जास्त माहिती आयातप्रदान ( Import Payments ) या प्रकरणांत दिलेली आहे किंत्येक मोठे आयातदार असा व्यवहार वा. भा. प्रकारचाच करून भारतीय विमाकंपन्याना नाविक विम्याचा व्यवहार देतात व पर्यायाने परकीय चलनाची स्तुत्य अशी बचत करतात. पण असा विमा व्यवहार, नौकानयन भाडे, यासाठीं अजूनही भारताला खूप मोठ्या प्रमाणांत परदेशी चलन खर्चावे लागते. तरीपण जर विक्रीकरार वा. भा. वि. स्वरूपाचा असेल किंवा ज्या प्रकारचा विमा भारतात उतरवला जात नाहीं अशा प्रकारचे संरक्षण हवे असेल तरच भारताबाहेर विमा उतरवण्यास परवानगी दिलेली आहे व अशा व्यवहारांत अभारतीय कंपनीची विमापत्रे घेण्यासाठीं परकीय चलन संरक्षणाकार म्हणून पाठवतां येते. ( वा. भा. वि. प्रकारच्या विक्रीत विम्याची किंमत एकूण किंमतीतच समाविष्ट असल्याने अशी रक्कम वेगळी पाठवण्याचा प्रश्न येत नाहीं ) त्याचप्रमाणे किनारी वाहतुकीबाबतचे विमे, हे फक्त भारतीय चलनांतच उतरवतां येतात. विमा पत्राचे पैसे जर दुर्दैवाने घ्यावेच लागले तर ते मिळणाऱ्या धारकाला ती रक्कम परदेशीचलन अधिकृत प्रतिनिधींना विकून भारतीय रुपयांतच घ्यावी लागते. अशी परदेशी चलनाची विमापत्राखालीं आलेली रक्कम अन्य प्रकारे

चापरावयाची असेल तर त्यासाठी रिझर्व बँकेची परवानगी लागत व त्यासाठीं त्याबाबतचा योग्य पुरावा देऊन अर्ज करावा लागतो. त्याचप्रमाणें भारतीय निर्यातीचे बाबत वा. भा. वि. पद्धतीच्या करारामुळें भारतीय निर्यातदाराला नुकसान भरपाईच्या मागणीची रक्कम जर द्यावी लागली व ती परकीय चलनद्वारें द्यावयाची असेल तर त्यासाठीं तत्संबंधीचे कागदपत्र परदेशांतील आयातदाराला पोचून मालाची प्रत्यक्ष मालकी त्याने किंमत भरल्यामुळे त्याचेकडे गेलेली असावयास लागते. म्हणजेच या परिस्थितीत परदेशी चलन त्या निर्यातीचे पोटीं भारतांत आलेले असावे लागते. या उलट भारतीय आयातदाराकडे जर अशी आयातीची कागदपत्रें पोचून, त्याने विदेशी चलनांत पैसे भरल्यावर नुकसान झाले असेल तर त्याला भरपाईची रक्कम परकीय चलनांत मिळावी लागते. हुंडीचे पैसे भरल्यामुळे आयातदाराकडे मालकी गेलेली नसेल व जर विम्याची रक्कम नुकसान होऊन कंपनी देणे लागेल तर मात्र ती परदेशी निर्यातदाराला त्याचे देशांतच मिळूं शकते.

## इतरप्रकारचीं विमापत्रें :

आयुष्य आणि नाविक विमापत्राखेरीज अन्य मालमत्ता, स्थावर वगैरेच्या विम्यांचे बाबत जर ती मालमत्ता हिंदुस्थानांत असेल तर इथल्या रहिवाशांना तिचा आग चोरी, दंगाधोपा वगैरे बाबतच्या संरक्षणाबाबतचा विमा भारतीय चलनांतच उतरवावा लागतो. पण ती मालमत्ता जर भारताबाहेर असेल तर असा विमा भारतीय चलनांत किंवा परकीय चलनांत उतरला तरी चालतो. अस्थायिकांची जर भारतांत मालमत्ता असेल तर तिचा विमा ते भारतांत घेऊं इच्छित असल्यास संरक्षणाकाराची रक्कम त्यांना बाहेरुन विदेशी चलनांत पाठवावी लागते किंवा त्यांच्या अस्थायिक रुपयांच्या खात्यांतून नावे टाकून घेऊन, देतां येते. जर भारतीय रहिवाशांना परकीय चलनांत विमा उतरवण्याची परवानगी दिली तर त्या अन्वयें त्यांच्या संरक्षणाकारही विदेशी चलनांत पाठविण्याची परवानगी देण्यांत येते.

आयुष्य किंवा आगीचे विम्याप्रमाणेच अशा सर्वसाधारण विम्यांतही दुर्दैवानें अपघातामुळें रक्कम देणें झाल्यास व ती भारताबाहेर द्यावयाची

असल्यास रिझर्व बँकेची अनुमती लागते. अस्थायिकाचे मागणीबाबत (Claims) मात्र अशी परवानगी सरसकट देण्यात येते

कुठल्याही विमाकंपनीला आपल्यावरील जोखीम कमी करण्यासाठीं पुनर्विमा (Re Insurance) घ्यावयाचा असेल व त्यासाठीं विदेशी चलनात रक्कम द्यावयाची असेल तर त्याबाबतचे करार झालेले कागद पत्रासह योग्य तो अर्ज रिझर्व बँकेकडे केल्यास रिझर्व बँक त्याला परवानगी देऊ शकते.

## अभारतीय रहिवाशांना देण्यांत आलेले हक्क :

भारतात असलेल्या अभारतीय रहिवाशात, नोकरी धद्यानिमित्त काम करीत असलेले विदेशी रहिवासी व विदेशातील कंपन्यांच्या येथे काम किंवा उत्पादन व विक्री करीत असलेल्या सहाय्यक किंवा पोटकंपन्या किंवा शाखा कचेऱ्या यांचा समावेश होतो. भारतात प्रवासासाठीं येणाऱ्या प्रासंगिक प्रवाशाचा विचार वेगळ्या ठिकाणीं केलेला आहेच.

कुठल्याही विदेशी नागरिकाला जर नोकरीवर ठेवायचे असले तर त्या कंपनीला रिझर्व बँकेची संमति घ्यावी लागते त्यासंबंधीच्या करावयाच्या अर्जात कुठल्या कामासाठीं ही नियुक्ती होत आहे, ज्याना नोकरीसाठीं बोलावले आहे त्याची निवड कुठल्या कारणानें केली गेली आहे व त्याना पगार, इतर भत्ता, सवलती वगैरे कोणत्या मोबदल्यावर बोलावले आहे त्याची साद्यंत माहिती द्यावी लागते. अशा परकीय नागरिकाना नोकरी मिळाल्यावर, भारतात असताना जे खातें बँकेत ठेवावे लागते ते 'स्थायिक खातें' समजले जातें, मात्र तत्वत हे खाते अस्थायिक स्वरूपाचे असल्याने या खात्यातील प्रत्येक व्यवहाराबद्दल ए सेव्हन फॉर्म भरावयास त्रास पडू नये म्हणून खातें उघडण्याचेवेळीं क्यू ए २२ हा फॉर्म भरून द्यावा लागतो हा फॉर्म ज्या बँकेत (ती बँक अधिकृत व्यवहारी असावी लागते) खाते ठेवले जाईल तिला करावयाचा एक प्रकारचा अर्जच असतो. या अर्जात, सदर खात्यात वेळोवेळीं ज्या रकमा जमा होतील त्या माझ्या भारतातील दैनंदिन व्यवहारासंबंधीच्याच आहेत व त्या अमक्या अमक्या कारणामुळें जमा होतील, असे अर्जदाराला लिहून द्यावे लागते. या खात्यात दुसऱ्या अस्थायिक खात्यातून वर्ग होऊन

जमा होणाऱ्या रकमाखेरीज इतर बाबतीत ए ७ फॉर्मची माफी दिल्यामुळें, मी माझ्या हातांत असलेले परकीय चलन रुपयांचे बदली भारतीय रहिवासी / संस्थांना देणार नाही. तसे करावयाचे असल्यास, त्याचे रुपये माझे खात्यांत जमा करण्यासाठीं, मी विनिमयनियंत्रणाची पूर्वसंमति घेईन; तसेच माझे खात्यांत अर्जात निर्देशिलेल्या कारणाखेरीज अन्य कारणामुळें किंवा बाहेरून पैसे आल्यामुळे कुठलीही जमा होत असल्यास त्यासाठीं ए ७ हा फॉर्म भरीन असे कबूल करणारा तो अर्ज असतो. अर्जदाराने त्यांत, आपली भारतांत येण्याची तारीख, राष्ट्रीयत्व, धंदा व पत्ता ही माहितीही द्यावी लागते व ती बरोबर आहे याबद्दल अधिकृत बॅंकेस त्या अर्जावर शेरा मारून तो खाते ठेवण्याची परवानगी घेण्यासाठीं दोन प्रतीत पाठवावा लागतो. असा परकीय नागरिक भारतांत तात्पुरता स्थायिक होणार नसेल तर मात्र या फॉर्मची जरूर नसते.

भारतांत नोकरी करीत असलेल्या अभारतीय रहिवाशाला त्याच्या कुटुंबियाच्या सोयीसाठीं पैसे पाठविण्यास सहसा फारशीं बंधने नाहींत. भारतांत काम करीत असलेल्या पाकिस्तानी व अफगाणिस्तानी नागरिकांना मात्र असे पैसे पाठविण्यास थोडे वेगळे नियम आहेत. भारतांत काम करीत असताना केवळ तो परराष्ट्रीय नागरीक आहे किंवा भारताबाहेर त्याची जन्मभूमी आहे एवढ्याच कारणावरुन मात्र त्याला विदेशी रहिवासी समजून सढळ हक्क मिळतील असे नाहीं. सर्वसामान्यपणे एखादी व्यक्ती भारतांत अनेक वर्षें रहात असेल व येथील प्राप्तिकर भरत असेल तर विदेशविनिमयासाठीं ती जरी अभारतीय असली तरी 'रहिवाशीच' समजली जाईल. भारतांत राहूनही स्वतः ची गणना अभारतीय रहिवाशी अशीच व्हावी अशी एखाद्याची इच्छा असेल तर तो खरा परराष्ट्रीय रहिवासीच आहे याबाबतचा पुरावा त्याने द्यावा लागतो. विदेशविनिमयाचे व्यवहारात, त्याचे हक्क ठरवतांना भारतांतील त्याचा रहावयाचा असलेला काल व

असेल व अन्य राष्ट्रात त्याचे अर्थाअर्थी कुठलेही हितसंबंध नसतील तर विदेश विनिमयाबाबतच्या हक्काचा विचार करताना ती व्यक्ती भारतीय रहिवासीच समजली जाईल. त्याचप्रमाणे भारतीय राष्ट्रीयत्वाच्या नागरिकाच्या विदेशीय पत्नींचे राष्ट्रीयत्व वेगळे समजले जात नाहीं व त्याना खास हक्क मिळू शकत नाहींत. अशा भारताबाहेर जन्मलेल्या स्त्रियांचे राष्ट्रीयत्व त्यानीं भारतीय राष्ट्रीयत्व स्वीकारलेले नसले तरी भारतीयच समजले जाईल मात्र त्याच्या वेगळ्या देशातील जन्मस्थानामुळें त्या देशाचे नियमाप्रमाणे शक्य असेल तर त्याना तेही राष्ट्रीयत्व ठेवता येईल व इतर कारणाचे वेळीं ह्मणजे स्वत च्या देशास भेट देण्याचे वेळीं वगैरे सांगता येईल पण विदेशविनिमयाचे व्यवहारात ते निराळे समजले जाणार नाहीं. त्याचप्रमाणे भारतीय व्यक्तींच्या भारताबाहेर जन्म झालेल्या किंवा परराष्ट्रीय पत्नीपासून झालेल्या संततीचे राष्ट्रीयत्वही वेगळे समजले न जाता त्याना 'भारतीय राष्ट्रीयत्वच' मिळा-ल्याचें समजले जाते व विदेश विनिमयाचेबाबतचे विदेशी रहिवाशाना देण्यात येत असलेले खास हक्क त्याना मिळू शकत नाहींत. कुठल्याही व्यक्तीचे बाबत तिचा विदेशविनिमयासाठीं कुठला दर्जा ( Status ) व राष्ट्रीयत्व समजावें याचा संदेह असल्यास त्याबाबत विनिमयनियंत्रणाकडे खुलासा मागता येतो.

ज्याचे राष्ट्रीयत्व अशा रितीने सर्व अपवाद सोडून, केवळ अभार-तीयच असेल अशा परराष्ट्रीय रहिवाशापैकीं स्टर्लिंग विभागातील पाकिस्तान सोडून अन्य देशाच्या नागरिकाना आपल्या चालू उत्पन्नातून आपल्या कुटुंबियाच्या पोषणासाठीं व तत्सम अन्य खर्चासाठीं दरमहा १५० पौण्ड म्हणजे जवळजवळ २००० रुपये इतकी रकम विनानिर्बंध पाठवता येते. यातच त्यानी तिकडे भरावयाच्या विम्याच्या संरक्षणाकाराचाही सर्वसामान्यपणें वेगळी जरूरी नसेल तर समावेश होतो अशा मासिक हप्त्यासाठीं रिझर्व बँकेची परवानगी लागत नाहीं. अधिकृत बँकेकडे या बाबतचा योग्य तो पुरावा दाखल करुन ही रकम परदेशी पाठवता येते. मात्र असा पुरावा बरोबर बघण्याची जबाबदारी अधिकृत बँकेवर आहे, व त्याची खात्री

पटल्यास १५० पौण्डापर्यंत असे चलन विकण्याचा अधिकार अधिकृत बँकांना दिला गेला आहे. ही सवलत कुटुंबप्रमुखासाठींच देण्यांत आली असून त्यालाच आपल्या बायकामुलांसाठीं अशी रक्कम पाठवतां येते. इकडे नोकरी करणारी व्यक्ती जर स्त्री असेल तर तिला, पतीला किंवा मुलांना आपल्या आईवडिलासाठीं पैसे पाठवण्याचे बाबत ही सवलत दिली गेलेली नाहीं. मासिक १५० पौण्डापेक्षा ह्मणजे रु. २००० पेक्षां जर अशी रक्कम जास्त पाठवावयाची असेल तर रिझर्व बँकेकडे रीतसर अर्ज करावा लागतो.

पाकिस्तानच्या नागरिकांना किंवा ज्यांचेवर त्यांचे पाकिस्तानातील नातेवाईक अवलंबून आहेत अशा हिंदुस्थानांतील रहिवाशांना तिकडील अवलंबून असणाऱ्या लोकांसाठी अल्पशी रक्कम पाठवतां येते, व त्यासाठींही योग्य तो परवाना काढावा लागतो. वरील सवलत अन्य राष्ट्रांचे बाबतीत पाठवल्या जाऊं शकणाऱ्या विनिमयाप्रमाणे त्यांना नाहीं. हा अर्ज दोन प्रतीत ठराविक नमुन्याच्या अर्जावर, ती व्यक्ती जेथे राहत असेल त्या जिल्ह्याच्या कलेक्टर किंवा कमिशनरकडे करावा लागतो व या अधिकाऱ्यांना कांहीं ठराविक मुदतीसाठीं दरमहा रुपये पन्नासपर्यंतच असे परवाने देण्याचा अधिकार आहे. असा मिळालेला परवाना अधिकृत बँकेकडे दाखल केल्यावर त्यावर नोंद करून अधिकृत बँक त्या अर्जदाराला तसे चलन विकूं शकते. मात्र पन्नास रुपयांवर जास्त रक्कम पाठवावयाची असेल तर त्याबाबतची सबळ कारणें दाखवणारा पुरावा दाखल करून, रिझर्व बँकेकडे अर्ज करावा लागतो.

नॉनस्टर्लिंग विभागाच्या नागरिकांना आपल्या भारतांतील चालू उत्पन्नांतून आपल्या कुटुंबियांना अशी रक्कम पाठवावयाची असेल तर त्यासाठीं अधिकृत बँकेचे द्वारा रिझर्व बँकेकडे अर्ज करुन परवाना काढावा लागतो. अशा अर्जाचा विचार करताना, ज्या देशाचा तो नागरिक असेल त्याच देशांत त्याच्यावर अवलंबून असणारी मंडळी असतील तर त्या देशाच्या चलनांतच ती रक्कम पाठविण्यास परवानगी मागितली जात आहे कीं नाहीं ही गोष्ट रिझर्व बँक विचारांत घेते. तसेच असा

अर्ज करताना अर्जदाराला आपल्या मासिक उत्पन्नाची किंवा पगाराची सपूर्ण माहिती, (प्राप्तीकर वजा जाता मिळणाऱ्या) व ठरानिक किती मुदतीने अशी किती रक्कम पाठवावयाची आहे तिची माहिती द्यावी लागते. अर्जदारावरील अवलंबित व्यक्ती कांहीं कारणाने त्याच्या राष्ट्रीयत्वाच्या देशाखेरीज अन्यत्र राहात असल्यास त्याबाबतची खात्री पटल्यासच त्या दुसऱ्या देशात रक्कम पाठवण्यास रिझर्व बॅंक खास परवानगी देऊ शकते.

## निवृत्तिवेतन व निवृत्त्युत्तर व्यवहार :

भारतातर्फे अन्यराष्ट्राच्या नागरिकाना जर काही निवृत्तिवेतन दिले जात असेल तर अशा निवृत्तिवेतनाची रक्कम स्वदेशी पाठवण्यास पाकिस्तान सोडून उर्वरित स्टर्लिंग विभागातील अन्य नागरिकाना अशी मुभा आहे. अशी रक्कम पाठवण्यासाठीं रिझर्व बॅंकेची अनुज्ञा लागत नाहीं. मात्र निवृत्त झालेला इसम / ज्यास निवृत्तवेतन मिळावयाचे आहे ती व्यक्ती ज्या देशात अशी रक्कम पाठवावयाची असेल त्या देशातच रहात आहे याचा पुरावा अधिकृत बॅंकेकडे दाखल करावा लागतो. निवृत्तिवेतनाची रक्कम पाकिस्तान किंवा नॉनस्टर्लिंग विभागातील राष्ट्रात पाठवावयाची असेल तर रिझर्व बॅंकेची पूर्वसमति घ्यावी लागते.

पाकिस्तानखेरीज अन्य स्टर्लिंग विभागीय राष्ट्राचा नागरिक निवृत्त झाल्यानंतर त्याच्या मालमत्तेच्या व जिंदगीच्या विक्रीची रक्कम त्यास परदेशी पाठवयाची असेल तर रिझर्व बॅंकेकडे अर्ज करावा लागतो. या अर्जात अर्जदार प्रत्यक्ष स्टर्लिंग विभागात निवृत्तीनंतर कायम राहण्यासाठीं जात आहे आणि परदेशी पाठवावयाची रक्कम अर्जदाराची स्वतःची मिळकत असून तीवर त्याचा सपूर्ण हक्क आहे व त्या रकमेवरील अद्यावत असे सर्व कर (प्राप्तीकरासह) दिले गेले आहेत याबाबतचे पुराव्याचे कागदपत्र दाखल करावे लागतात. स्टर्लिंग विभागाच्या नागरिकाला अशी रक्कम नॉनस्टर्लिंग विभागात पाठवावयाची असेल तर स्टर्लिंग पौंड पाच हजार इतक्या रकमेपर्यंत परवानगी देण्यात येते.

स्टर्लिंग विभागांतील नागरिकांप्रमाणें नॉनस्टर्लिंग विभागाचे नागरिकांनाही निवृत्तीनंतर आपल्या मिळकतीची रक्कम नॉनस्टर्लिंग विभागांत पाठवावयाची असेल तर त्यासाठीं रिझर्वबँकेकडे अर्ज करावा लागतो व त्याबाबत त्यांना जे जाहीर आवेदन द्यावे लागते तेही ठराविक नमुन्याप्रमाणें द्यावे लागते. अशा निवृत्त होणाऱ्या व्यक्तिला सर्वसाधारणपणे त्याची शिल्लक, शेअर्सवरील मिळालेली व्याजे, वेगवेगळीं कमिशन्स, भविष्यनिधि (Provident Fund) वगैरे संपूर्णपणें परदेशी पाठवण्याची परवानगी मिळते. त्याचप्रमाणे त्यानी भारतांत ज्या स्थावर वा अन्य मिळकती व शेअर्स वगैरेत रक्कम गुंतवली असेल त्याची विक्री केलेली असल्यास प्रत्येक धारकाचे नांवे कमाल रुपये एक लाख पंचवीस हजार इतक्या मर्यादेपर्यंत अशी रक्कम वेगळी पाठवण्याची मुभा मिळते. मात्र अशी परवानगी निवृत्त इसम आपल्या मायदेशीं परत जात असेल व अशी रक्कम स्वतःचे देशांतच पाठवूं इच्छित असेल तरच मिळते.

## परदेशी गुंतवणूक, व भांडवलाची आयात निर्यात :

जाते. मात्र प्रत्यक्ष उद्योगधंद्यात घातलेल्या रकमेबाबतच ही सवलत असून, १ जानेवारी १९५० नंतर भारत सरकारच्या परवानगीशिवाय जर स्टॉक एक्स्चेंजवर शेअर्स खरेदी करून काहीं गुंतवणूक, केलेली असेल तर त्या शेअर्सच्या विक्रीने मिळालेल्या रकमेबाबत ती लागू नाहीं.

अर्थात गुंतवणुकीच्या परतफेडीबद्दल जरी वरील नियम सर्वसामान्य-पणे केलेले असले तरी १ जानेवारी १९५० आधीं व सरकारी संमति न घेतां केलेल्या गुंतवणुकीबाबत, किंवा परदेशी रहिवाशांनी मग ते स्टर्लींग वा नॉनस्टर्लींग कुठल्याही विभागातील असोत—केलेल्या कुठल्याही गुतवणुकीची रक्कम मोकळी करून ती स्वदेशात न्यावयाची असेल तर त्याला रिझर्व बँकेच्या विचारार्थ अर्ज करता येतो व प्रत्येक अर्जदाराच्या अर्जाचा साधक-बाधक विचार करून रिझर्व बँक योग्य वाटल्यास त्याबाबतची परवानगी देऊं शकते.

सर्वसाधारणपणे भारताच्या राष्ट्रीय आर्थिक धोरणास अनुसरून जर कुणी परकीय नागरीक अशी गुतवणूक करीत असेल तर त्यास उत्तेजन दिले जाते. कारण परदेशी भाडवल भारतात जितके येईल तितके आज हवे आहे. मात्र तें शक्यतो विनानिर्बंध यावे व कुठल्याही परिस्थितीत त्याच्या परतफेडीसाठीं, भारताच्या विदेशविनिमयावर ताण पडू नये अशा धोरणानेच भारत सरकार वागत असते. भारतात ठराविक क्षेत्रात व विशिष्ट उद्योगधंद्यात वाढ होण्याचे दृष्टीनें शेअरभाडवल काढण्यावर जसे नियंत्रण आहे त्याच-प्रमाणें परकीय लोकांच्या गुतवणुकीवरही असे नियंत्रण आहे. एकदा भारतात भाडवल गुतवल्यानंतर त्यापासून होणारा फायदा स्वदेशी पाठवण्याबाबत अभारतीयाना अनिर्बंध परवानगी दिली जाते, त्यामुळें भाडवल घालण्याचे सुरवातीलाच त्याबद्दलची कसून चौकशी केली जाते.

भारताच्या औद्योगिक धोरणाबाबत ६ एप्रिल १९४८ रोजीं भारत-सरकारतर्फे जे धोरण जाहीर करण्यांत आले त्याचा जास्त खुलासा ६ एप्रिल १९४९ रोजीं भारतीय संसदेपुढे पतप्रधान नेहरूंनी केला होता व त्याचप्रमाणे गेल्या १२–१३ वर्षांत जरी ढोबळपणे धोरण ठेवण्यात आले तरी वेळोवेळीं

योग्य वाटल्याप्रमाणे व पंचवार्षिक योजनाच्या सोयीप्रमाणे खाजगी विभाग व सार्वजनिक विभाग यांत बदल करण्यांत आले आहेत. एकादा धंदा वाढावा किंवा नवीन निघावा असे वाटत असेल तर उपरनिर्दिष्ट धोरणाप्रमाणे जरी ती बाब किंवा तो धंदा सार्वजनिक क्षेत्रांत पडत असला तरी त्याबाबत खासगी विभागांतही गुंतवणूक करण्यास उत्तेजन देण्यांत आले आहे. परकीय भांडवल भारतांत येत असताना तें शक्यतो आवश्यक अशा उद्योगविभागांत येत आहे याची दखल घेण्यांत येते. विशेषतः असे भांडवल भारतीय कंपन्याबरोबर संलग्न होऊन परकीय सस्था घालत असेल तर त्याचा खास विचार करण्यांत येतो. नवीन उत्पादनक्षेत्रांत व जिथें अजूनही उत्पादन अपुरे असल्याने त्याची वाढ आवश्यक आहे अशा उद्योगधंद्यांत अभारतीय भांडवलाला उत्तेजन देण्यांत येते तर आर्थिक क्षेत्रांत किंवा व्यापारी क्षेत्रांत असे भांडवल घालण्यास शक्यतो संमति दिली जात नाहीं. असे भांडवल आल्यानें जे उत्पादन होईल त्या योगें, जर त्या तऱ्हेच्या वस्तूंची आयात थांबेल किंवा कमी होईल व / अथवा त्या वस्तूंना योग्य अशी बाहेरची बाजारपेठ मिळून ती निर्यात होऊं शकेल तर ते महत्वाचे समजलें जातें. कारण अशा भांडवलामुळें अप्रत्यक्षपणें भारताच्या विदेशविनिमयाचे परिस्थितींत, आयाती-वरील खर्च कमी झाल्याने वा निर्यातीमुळें परकीय चलनांतील उत्पन्नामुळें सुधारणाच होते. त्याचप्रमाणें असे विदेशी भांडवल भारतांत येत असले तरी त्यावेळीं त्या संस्थांतून .भारतीय नागरिकांनाच व्यवसाय मिळेल आणि ती संस्था चालवण्यासाठीं लागणाऱ्या महत्त्वाच्या स्थानांवरही भारतीय व्यक्तींनाच शिक्षण दिले जाऊन त्यांची नेमणूक होईल अशी अट प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्षपणें घालण्यांत येते. या सर्व बाबींचा विचार, असे भांडवल घालण्या-साठीं अर्ज आल्यानंतर केला जातो.· व शक्य तितक्या जास्त प्रकाराने, वेळप्रसंगीं थोडे निर्बंध सैल करूनही अशा भांडवलास उत्तेजनच देण्यांत येते.

अभारतीय भांडवलाबाबत विदेशविनिमयनियमन कायद्यांत कांहीं खास कलमे घालण्यांत आली आहेत. त्यायोगे भारतीय भांडवलांत किंवा शेअर्स या कर्जरोख्यांत किंवा अन्य कुठल्याही गुंतवणुकीत अथवा तारणांत,

वर्गव्यवहारामुळे ( Transfers ) जर अभारतीय मालकी येत असली किंवा त्याना त्यात कुठलेही हितसबंध मिळत असले तर त्याचाही विचार 'अभारतीय भांडवल' या सदराखालींच वरील कायद्यात करण्यात आला आहे व त्यायोगें अशा कुठल्याही वर्गव्यवहारासाठीं रिझर्व बँकेची पूर्वसमति आवश्यक करण्यात आली आहे. भारताबाहेर कुणाचेही नावे जर कर्जाबाबतची कबुली द्यावयाची असेल तर त्यास अशीच परवानगी लागते. तसेच भारतीय धंदा अभारतीय नागरिकाला सुपूर्द करावयाचा असेल, भारताबाहेरील कुणा व्यक्तिला, संस्थेला किंवा अशा व्यक्तींचा ज्यात हितसंबंध आहे अशा संस्थांना कर्ज द्यावयाचे असेल तर ही संमति लागते. पण बँकाचा फक्त यास अपवाद करण्यात आला आहे. भारतीय रहिवाशावर वरीलप्रमाणें जसें निर्बंध आहेत तसेच ते अभारतीय रहिवाशावरही अन्य अभारतीय रहिवाशाबरोबर वरील व्यवहार करताना लागू आहेत.

विदेश विनिमय कायद्याप्रमाणें 'तारण' या शब्दात शअर्स, स्टॉक्स, डिबेंचर्स, सर्व तऱ्हेचे बॉंडस, सरकारी कर्जरोखे किंवा त्यासबंधीच्या सुरक्षापावत्या ( Safe Custody Receipts ) व्याजाची कूपने किंवा डिव्हिडंड वॉरंटस आणि सर्व तऱ्हेच्या आयुष्यविमापत्राचा समावेश करण्यात आला आहे.

भारतात कुठल्याही उद्योगधंद्यात विदेशीयाना भांडवल घालावयाचे असल्यास भारताच्या मध्यवर्ती व्यापार व उद्योगखात्याकडे ( औद्योगिक धोरण विभाग ) नवी दिल्ली येथें अर्ज करावा लागतो. याबाबतचा ठराविक अर्जाचा नमुना भारतातील कुठल्याही चेंबर ऑफ कॉमर्सकडून उपलब्ध होऊ शकतो. सदर अर्जाच्या चार प्रती पाठवाव्या लागतात असे भांडवल खालील दोन प्रकारच्या कारणाने येऊ शकते.

( १ ) भारतात सरकारतर्फे आवश्यक ठरवलेल्या उद्योगधंद्यात नवीन कारखाना काढण्यासाठीं.

( २ ) सद्यस्थितींत असलेल्या कंपन्याच्या वाढीसाठीं.

वरील दोन्ही प्रकारात विदेशी भांडवलदार स्वतंत्रपणें किंवा भारतीय कंपनीशी सहकार्य करून कंपनी काढू शकतो. त्यामध्यें चालू असलेल्या

कंपनीच्या नवीन शेअर्समध्यें ( भाग भांडवलात ) अस्थायिकांना शेअर्स देण्यास किंवा नवीन निघणाऱ्या कंपनीच्या नव्या भाग भांडवलांत अस्थायिकांना असे भाग देण्यास परवानगी देऊन असें भांडवल भारतसरकार भारतांत येऊं देऊं शकते. भारताबाहेर असलेल्या किंवा भारतांतच पण जिचे सर्व भाग अभारतीय रहिवाशांचे मालकीचे आहेत अशा कंपन्यांना जर नवीन भांडवल काढल्यावर भारतीय रहिवाशांप्रमाणे अभारतीय नागरिकांनाही असे भाग ( भांडवल ) विकावयाचे असले तरीही ही बाब वर उल्लेखिलेल्या प्रकारांत मोडते.

अशा अर्जाचा विचार केल्यानंतर त्याचा निर्णय त्या कंपनीला किंवा भांडवलदाराला जरी भारतसरकार कळवीत असलें तरी विदेशविनिमयनियमन कायद्यानें द्यावी लागणारी अधिकृत परवानगी रिझर्व बँकेकडून दिली जाते. या दोन्ही कचेऱ्यांखेरीज अभारतीय कंपनीस ( भांडवलदाराला ) भारताच्या 'कंट्रोलर ऑफ कॅपिटल इश्यूज' या मध्यवर्ती सरकारच्या अर्थखात्याच्या उपविभागाची संमति घ्यावी लागते. मात्र या विभागाची संमति जर एकूण काढलेले भांडवल रुपये दहा लाख अगर त्यापेक्षां जास्त असेल तरच लागते. या विभागाची अनुमति त्याखालील रकमेसाठीं जरी आवश्यक नसली तरी विदेशविनिमय नियंत्रणाची अनुमति मात्र रक्कम कितीही लहान मोठी असली तरी लागते. कंपनीचे एकूण काढलेले भागभांडवल जर दहा लक्ष रुपयापेक्षां जास्त असेल तर विदेशविनिमयाचे परवानगीसाठीं ज्या वेळेला मध्यवर्ति व्यापार व उद्योग विभागाकडे अर्ज केला जातो त्याचवेळीं 'कंट्रोलर ऑफ कॅपिटल इश्यूज' या विभागाकडेही अर्ज केल्यास वेळेची बचत होऊं शकते. शक्यतो अशी गुंतवणूक मोठ्या प्रमाणावर सीमिति संस्था (Limited Companies) किंवा नोंदलेल्या संस्था (Registered Firms) करीत असल्या व त्यामुळें त्याना असे अर्ज करावे लागत असले तरी वैयक्तिक गुंतवणूक करूं इच्छिणाऱ्या एखाद्या, विदेशी भांडवलदाराला जर भारतांत असें भांडवल घालावयाचे असले तरी त्यासुद्धां असा अर्ज कायद्याप्रमाणें करणें आवश्यक आहे, व त्यांस कुठल्याही प्रकारे वैयक्तिक गुंतव-

करण्यास आडकाठी नाही. नवीन निघणाऱ्या भागभांडवलात सहभागी होऊन जशी अस्थायिकाना किंवा अभारतीयाना गुंतवणूक करता येते त्याच प्रमाणें आधीच अस्तित्वात असलेल्या कंपन्याच्या भागाची किंवा डिबेंचर्सची खरेदी भारतीय रहिवाशाकडून करूनही ती करता येते. मात्र त्यात खऱ्या अर्थाने नवीन भांडवल येत नसते ही गोष्ट मात्र दृष्टीआड करून चालणार नाही. भारतीय रहिवाशाना आपले भाग जर विक्री करून विदेशी रहिवाशाचे नावे वर्ग करावयाचे असले तर त्यास प्रथम रिझर्व बँकेची संमति लागते. तसेच एखाद्या अभारतीय रहिवाशाला भारतीय कंपनीचे असे असलेले त्याचे मालकीचे भाग जरी दुसऱ्या विदेशीय रहिवाशाला वर्ग करावयाचे असले तरीही रिझर्व बँकेची परवानगी लागते हे अन्यत्रही उल्लेखिलेले आहेच. वरील दोन्ही प्रकारात विकणाराला ज्याप्रमाणे परवानगी लागते त्याप्रमाणे त्यात अन्य कुठलाही वाव राहू नये म्हणून असे भाग वर्ग करणाऱ्या कंपनीनरही, तसा व्यवहार आपल्या पुस्तकात नोंदण्यापूर्वी त्याची माहिती रिझर्व बँकेकडे कळवून तिची परवानगी घ्यावी असें बंधन आहे. अशा रितीनें अशा व्यवहारात दोन्ही बाजूनीं नियंत्रण आणल्याने रिझर्व बँकेस कुठल्याही परिस्थितीत अशा व्यवहाराची माहिती मिळू शकते

## कागदपत्रांची आयात निर्यात :

तारणातील कुठल्याही प्रकारचे कागदपत्र भारताबाहेर स्वत बरोबर नेण्याचे वेळीं किंवा ते पोस्टाने पाठवून त्याची निर्यात करावयाचे वेळीं रिझर्व बँकेची संमति लागते अशा कागदपत्रात चेक्सचाही समावेश होतो. मात्र अधिकृत बँकाना वसुलीसाठीं असे चेक्स बाहेर पाठवण्याची सर्वसामान्य परवानगी दिली आहे. त्याचप्रमाणें कुठल्याही व्यक्तिला, अधिकृत बँकानी आपल्या विदेशी प्रतिनिधिवर दिलेले ड्राफ्टस अशा संमतिविना पाठवता येतात. ज्यानेळेला शेअर्स वगैरेचा वर्ग व्यवहार करण्याची परवानगी बँकेला दिली जाते त्यावेळेलाही अशा निर्यातीसाठीं स्वतंत्रपणे वेगळी परवानगी (अधिकृत बँकानाही) घ्यावी लागतेच. मात्र कुठल्याही तऱ्हेचे 'तारण' (Securities) समजले जाणारे कागदपत्र स्वत बरोबर किंवा पोस्टाने

भारतांत आणण्यास परवानगी लागत नाहीं. अशा तारणांत भारतीय किंवा विदेशी तारणांचा समावेश होतो, पण चलनी नोटा व नाणीं या बाबत मात्र वेगळे निबंध आहेत. [ते वेगळ्या प्रकरणांत दिलेले आहेत.] तसेंच १५ जुलै १९४७ पूर्वीच्या, भारतसरकारने काढलेले व पाकिस्तानांतील गांवी प्रदान केले जाईल अशी नोंद असलेले सरकारी कर्जरोखे भारतांत आणण्यास बंदी असून त्यासाठीं रिझर्व बँकेकडे अर्ज करण्याची आवश्यकता आहे.

नियंत्रणाद्वारें योग्य व आवश्यक मालाचीच आयात करावयाची परवानगी दिली जाते व परकीय चलन हात राखून खर्च केले जाते त्याचवेळीं निर्यातीला उत्तेजन देऊन सरकार परकीय चलन जास्तीत जास्त उपलब्ध कसें होईल हें बघते अशा निर्यातीनें उपलब्ध होणाऱ्या चलनावरही सरकार आपला अधिकार ठेवते व तें चलन कशा मार्गानें आलें पाहिजे, कुठल्या पद्धतीनें आलें पाहिजे याचे नियम घालून देते तसेच ते चलन किती मुदतीत आलें पाहिजे याचीही बंधनें निर्यातदारावर असतात केवळ तो निर्यात करतो म्हणून त्याला ते चलन स्वतःचे समजून खर्च करण्याचा अधिकार मिळत नाहीं जास्तीत जास्त सहा महिन्यात त्याला हें चलन आयातदाराकडून ठरलेल्या स्वरूपातच मिळावें लागते व त्याबद्दलची माहिती अधिकृत बँकेतर्फे रिझर्व बँकेकडे कळवावी लागते जर सहा महिन्याचेवर विक्रेत्याला उधार विक्री करावयाची असेल तर तसा रिझर्व बँकेकडे अर्ज करून परवानगी घ्यावी लागते व ती देणें आवश्यक व योग्य आहे असे वाटले तरच रिझर्व बँक ती परवानगी देते व या परवानगीचा उल्लेख जी आर फॉर्मवर विक्रेत्याला करावा लागतो मालाची विक्री करताना सर्वसाधारणपणे पाच टक्क्यावर सूट किंवा कमिशन द्यावयाचे असले तर त्यासाठींही मध्यवर्ति बँकेची अशी परवानगी भारतात घ्यावी लगते पुस्तकाच्या धंद्यात किंवा अन्य धंद्यात २०–२५ टक्क्यापर्यंतही अशी सूट देतात, तेव्हा अशी परवानगी सुरवातीस घेऊन ठेवणें इष्ट असते इतर वेळीं अशी सूट ही सुमारे पांच टक्क्यापर्यंत असल्यास ती व्यापारी प्रघाताप्रमाणें आहे याचा पुरावा म्हणून अंदाज बीजक ( मान्य केलेले ) किंवा कॅटलॉग यासारखे कागदपत्र निर्यातदाराला हजर करावे लागतात आयातीचे वेळीं, विदेशी निर्यातदारानें काहीं सूट दिलेली असल्यास किंवा त्या व्यवहारावद्दलचे कमिशन म्हणून भारतातल्या त्याच्या प्रतिनिधीला काहीं रक्कम रुपयात द्यायला सांगितली असली तरीही आयातपरवान्यावर नोंद करताना अशा सुटीच्या किंवा कमिशनचा विचार न करता मूळ रकमेइतकीच नोंद करावी लागते म्हणजे १०० पौंडाच्या बीजकात रोख रक्कम दिल्याने २ टक्के किंवा हमीपत्र उघडल्यानें १ टक्का सूट

मिळाली असेल व पैसे देताना ९८ किंवा ९९ पौंडच दिले गेले तरी आयात-परवान्यावर १०० पौंडाची, १३३७ रुपये ९८ पैसे इतकी रक्कम वजा केली जाईल. या सर्वसामान्य निर्बंधाखेरीज आयातनिर्यातीच्या विनिमयव्यवहाराबाबत इतरही बरेच नियम आहेत. माल आयात करताना विनिमयनियंत्रणानें त्या आयातीचे पैसे कुठल्या प्रकारे दिले जातील याबद्दल कांहीं अटी घातलेल्या आहेत हें आपण पूर्वीच्या प्रकरणांत बघितले आहे. अर्थात् या अटी त्या त्या अन्यराष्ट्रांच्या निर्यातीबाबतच्या व्यापार व विनिमयनियंत्रणाच्या ( ते असल्यास ) विरुद्ध नाहीत हे बघावे लागते. एखाद्या राष्ट्रानें आपल्या निर्यातीबद्दल दुसऱ्याच देशाच्या एक ठराविक चलनांत भरणा मागण्यास सुरवात केली तर राष्ट्राराष्ट्रांतील चलनव्यवस्थेचे समतोलन बिघडून जाईल. ह्मणून शक्यतो परस्पर सहकार्यानेच ह्या गोष्टी ठरवल्या जातात. कांहीं कांहीं राष्ट्रे कांहीं वेळां अन्य राष्ट्रांच्या परिस्थितीचा विचार करीत नाहीत पण अशी परिस्थिती फार थोड्या वेळीं असते. सर्वसामान्यपणें ज्या राष्ट्रांत माल तयार झाला असेल त्या राष्ट्राकडून त्याची आयात केल्यास, निर्यात करणाऱ्या त्या राष्ट्राच्या चलनांत त्याचा भरणा देण्यास कांहींच आडकाठी नसते व हेच तत्व भारतीय विनिमयनियंत्रणातही पाळले जाते.

त्याच प्रमाणें आपल्या चलनांत म्हणजे भारतीय रुपयांतही अस्था-यिक खात्यांतून असा भरणा केला तरी भारतीय विनिमयनियंत्रणास तें

माल जर झेकोस्लोव्हाकियातील व्यापाऱ्याकडून खरेदी केल्याने झेकोस्लोव्हाकियातून निर्यात होत असेल तर त्यासाठीं झेकोस्लोव्हाकियन चलनात भरणा करून चालणार नाहीं. ते मना केलेले आहे. पण स्वीडन ज्या परिवर्तनीय चलन गटात आहे त्या गटातील राष्ट्रांपैकी कुणाच्याही चलनात, त्या गटातील राष्ट्रात असलेल्या झेकोस्लोव्हाकियन निर्यातदाराच्या खात्यास पैसे जमा करून, भरणा करता येईल. या यादीत दिलेल्या मान्य प्रकाराऐवजीं अन्य मार्गाने भरणा करावयाचा झाल्यास त्यासाठीं रिझर्व बँकेची आगाऊ परवानगी घ्यावी लागते.

आयातीबाबतचे हेच गट निर्यातीबाबतचे व्यवहारासाठी ठेवले गेले आहेत. अस्थायिक बकाच्या रुपयातून नावें रक्कम लिहून किंवा पौंड स्टर्लिंग मध्यें निर्यातीबाबतची रक्कम मिळाली तरी चालते. तसेच ज्या गटात तो माल निर्यात होतो त्यातील कुठल्याही राष्ट्राच्या चलनात त्याचा विनिमय मिळाला तरी चालतो. या सर्व नियमनिर्बंधाची व्यापाऱ्याला माहिती असणे, नियत्रणभग होऊ नये ह्मणून आवश्यक असते. अधिकृत व्यवहारी त्याला याबाबत मदत करण्यास नेहमीच तत्पर असतात.

आयातदारापेक्षा निर्यातदाराचे काम हे जास्त किचकट असते व निर्यातदाराला त्यासाठीं अनेक गोष्टींची माहिती असणें अत्यावश्यक ठरते. आयातदार त्याचे कामाबाबत आर्थिक व्यवहारासाठीं त्याच्या बँकेवर व माल सोडविण्याच्या व्यवहारासाठीं क्लिअरिंग एजटवर जबाबदारी टाकून मोकळा होऊ शकतो. पण निर्यातदाराला अशी जबाबदारी सपूर्णपणें वर्ग करता येत नाहीं. कारण तसे करण्यापूर्वी अनेक गोष्टी त्याला स्वत ला कराव्याच लागतात. त्याला आयातदाराशीं आधीं विक्रीकरार करावा लागतो. आयातदारानें मागितलेले कागदपत्र तयार करणें, सांगितल्याप्रमाणें पॅकिंग करणें व निर्यातखुणा करणें ही कामे त्यांचीच असतात. तसेच हमीपत्राखालीं जर माल पाठवावयाचा नसेल तर त्याला परदेशातील ग्राहक दस्तऐवज सोडवून घेईपर्यंत आपले पैसेही अडकवावे लागतात. त्याचप्रमाणें जियें माल पाठवावयाचा आहे तेथे कशा तऱ्हेचे नियत्रण (व्यापार व विनिमय) आहे याचीही

माहिती असावी लागते, व पुष्कळदां परदेशांतील खरेदीदाराची संपूर्ण माहिती नसली तरी त्यावर विश्वासही ठेवावा लागतो. यांतील शेवटच्या धोक्यांपासून हल्लीं वेगवेगळ्या देशांत निर्यातीस उत्तेजन देण्याचे दृष्टीने स्थापन झालेल्या विमाकंपन्या या सरकारी संस्थाकडून कांहीं प्रमाणांत (सुमारें ६० ते ९० टक्केपर्यंत) संरक्षण मिळण्याची सोय झाली आहे. अशी सोय आपल्याकडे आहे कीं नाहीं व असल्यास आपल्याला तिचा फायदा कसा करून घेतां येईल याचेही ज्ञान निर्यातदाराला असणें हितावह ठरते. भारतात अशी सोय आहे.

अनेकदां निर्यातीसाठीं जे वेगवेगळे फॉर्म वापरावे लागतात त्याचें तांत्रिक ज्ञान सुरवातीला भारतीय निर्यातदाराला असणें शक्य असत नाहीं. अशावेळीं त्याच्या नांवाचे हमीपत्र त्याचे हातांत असूनही त्याबरहुकुम वेळेवर कागदपत्र करून बँकेत दाखल करण्याचे न जमल्याने त्याला बराच त्रास सोसावा लागतो. हमीपत्र आल्यावर ते कसे तपासून घ्यावे याचे त्याला ज्ञान नसते. एकदां आयातनिर्यातीचा व्यवहार करण्याचे ठरल्यानंतर त्याबाबत बेफिकिर राहून चालणार नाहीं. निर्यातदाराच्या दृष्टीने तर दिवसेंदिवस सरकार जास्तीत जास्त मदत करायला पुढे येत आहे, कारण भारताची परकीय चलनाची शिल्लक वाढवायला निर्यातदार हीच खरी शक्ती आहे. त्या दृष्टीनें निर्यातदारानें आपण केवळ व्यापारच करीत नसून राष्ट्रीय कार्यालाही महत्वाचा हातभार लावीत आहोत हे ध्यानांत ठेवून, व परदेशी आयातदारालाही कुठल्या प्रकारे त्रास होणार नाहीं वा फशीं पडल्यासारखे वाटणार नाही अशा प्रकारें व्यवहार शेवटपर्यंत हाताळला पाहिजे. विशेषतः त्यांतील तांत्रिक ज्ञानाची माहिती करून घेतली पाहिजे व आयातदाराकडून आलेल्या इंडेंटप्रमाणे सर्व व्यवहार होत आहे ना याची खात्री केली पाहिजे. कित्येकदां हे काम एक्स्पोर्ट एजंट ठेवून करून घेतां येते. अर्थात बँका, चेंबर ऑफ कॉमर्स वगैरे संस्था या कामांत त्याला मदत देण्यात तत्पर असतात पण निर्यातदार स्वतः जाणता असेल तर व्यवहार सुकर होऊ शकतो. चांगला निर्यातदार परदेशांत प्रतिनिधी नेमून, वेगवेगळ्या प्रकारच्या जाहिराती करून, परदेशीं भेटी देऊन, ठिकठिकाणीं प्रदर्शनात आपल्या

मालाची मांडणी करून, बाजाराची पहाणी करून, अन्य कंपन्यांच्या वस्तूंशीं तुलना करून, तसेच उत्पादन किंमत कशी कमी करता येईल किंवा त्याच किंमतीत मालाचा दर्जा कसा वाढवता येईल याचे प्रयोग करून आपली निर्यात वाढवू शकतो.

कुठल्याही राष्ट्रातून निर्यातीवर सहसा बंधन नसते. असलेच तर ते फार थोड्या प्रमाणावर, किंवा अत्यावश्यक वस्तूचा स्वत:चेच राष्ट्रात पुरेसा पुरवठा नसेल त्या वस्तूंबाबत असते. युद्धकालात आणि युद्धानंतर कांहीं वर्षे जेव्हा सर्वत्र चणचण होती तेव्हा निर्यातीवरही कांहीं राष्ट्रांनी नियंत्रणे आणली होती. पण आता चणचण संपून मालाचा उठाव कसा होईल याचीच काळजी असल्याने व निकासासाठीं परकीय चलन जास्त उपलब्ध व्हावे अशी सरकाराची इच्छा असल्याने आता सर्वत्र निर्यातीस उत्तेजनच दिले जात आहे. ज्या गोष्टी देशातच राहिल्या पाहिजेत, ज्याचा देशाच्या आर्थिक उन्नतीसाठीं उपयोग आहे व ज्याची चणचण आपल्याच देशात भासून चालणार नाही अशा अत्यावश्यक उदा. लोखंड वगैरे वस्तूंच्या निर्यातीवरच आता भारत सरकारची नियंत्रणे आहेत. त्याचप्रमाणे सोने, जडजवाहीर व मूल्यवान खडे याचीही अप्रत्यक्षपणें चलनातच जमा होत असल्याने त्यांची निर्यात कुणाला करता येत नाहीं व करावयाची असल्यास त्यासाठीं रिझर्व बँकेची विशिष्ट वा सर्वसामान्य परवानगी घ्यावी लागते. मात्र निर्यातीवरील व्यापारनियंत्रण अशा रीतीने आता बरेच शिथिल असले तरी निर्यातीच्या येणाऱ्या किंमतीवर किंवा परदेशी चलनाच्या मिळकतीवर मात्र सरकारचे रिझर्व बँकेतर्फे संपूर्णपणें नियंत्रण आहे. म्हणजेच निर्यातदाराला त्याच्या निर्यातीमुळे उपलब्ध होणारे विदेशी चलन मुक्तपणें स्वत:साठीं वापरता येत नाही तर ते अधिकृत बँकेतर्फे सरकारला विकावे लागते व या निर्यातीचे पैसे कशा प्रकारें भारतात आणले पाहिजेत, केव्हा आणले पाहिजेत या सर्व गोष्टींबाबत रिझर्व बँकेचे जे नियम व ज्या अटी आहेत त्या पाळाव्या लागतात. निर्यातीमुळे मिळालेले चलन त्याला परदेशातच ठेवता येत नाही व त्याची गुंतवणूक किंवा आपल्या आयातीसाठीं उपयोग

करतां येत नाही. तसेच सर्वसामान्यपणें खरेदीदाराकडून हे चलन निर्यातदाराला जास्तीत जास्त सहा महिन्यांत मिळालेच पाहिजे असे एक बंधन आहे. पाकिस्तान आणि अफगाणिस्तान मधील निर्यातीबाबत तर हे बन्धन तीनच महिन्याचे आहे. बहुधा आधी विक्रीकरार होऊनच मग निर्यात होत असल्यानें असे चलन लगेच उपलब्ध होते व निर्यातदारांनी याबाबत, ते जास्तीत जास्त लौकर मिळविण्याचा कटाक्ष ठेवावा अशी विनिमय-नियंत्रणाची अपेक्षा आहे. सहा (किंवा तीन) महिन्यांपेक्षां दीर्घ मुदतीच्या हुंडीवर जर माल निर्यात करावयाचा असेल तर निर्यातदाराला त्यासाठीं कारणें देऊन व आयातदाराची माहिती देऊन रिझर्व बँकेकडून सर्वसामान्य किंवा खास अनुज्ञापत्र मिळवावे लागते. जर असे अनुज्ञापत्र नसेल, किंवा कांहीं बांधामुळें बिल जर सोडवले गेले नसेल किंवा वसूल झाले नसेल तर निर्यातदाराला बिल वसूल होऊन, अधिकृत बँकेला परकीय चलनाची विक्री कां होऊं शकली नाहीं याची कारणें देऊन जास्त मुदत मागून घेण्यासाठीं रिझर्व बँकेकडे अर्ज करावा लागतो. दर्शविलेली परिस्थिति जर मान्य होण्यासारखी असेल व मुदत देणें इष्ट ठरत असेल तर रिझर्व बँक अशी मुदत वाढवून देते. जर अशी मुदत देणें जरूर वाटत नसेल तर दुसऱ्या व्यक्तीला तो माल विकून परकीय चलन ठरविलेल्या मार्गानें पाठविण्यासाठी रिझर्व बँक हुकुम देते. किंवा तो माल भारत सरकारच्या किंवा सरकारतर्फे [illegible] जाणाऱ्या व्यक्तीच्या नावें करून देण्याचा हुकुम देते. रिझर्व बँकेच्या अशा खास आदेशांचा किंवा विनिमयाबाबतच्या सर्वसामान्य नियमांचा भंग हा

गेली आहे. त्यासाठी त्याला माल बोटीने पाठविला जायचा असल्यास जी. आर. फॉर्म पैकीं एक फॉर्म व पोस्टाने पाठविला जावयाचा असल्यास पी. पी. फॉर्म भरावा लागतो व जकात अधिकाऱ्यानी किंवा पोस्ट अधिकाऱ्यानी निर्यात मान्य करुन ती पुढें सोडल्यावर त्याच्या उरलेल्या प्रती अधिकृत बँकेकडे दाखल कराव्या लागतात.

## निर्यातीचे कंट्रोल फॉर्म्स :

या फॉर्मद्वारे निर्यातदाराने माहिती दिल्याखेरीज निर्यातमाल रवानाच होऊ शकत नाही. हा फॉर्म जकातखात्याचे तिथे किंवा पोस्टात भरून निर्यातदाराला तीन गोष्टींची हमी घ्यावी लागते. (१) निर्यात केल्या जाणाऱ्या मालाची सपूर्ण किंमत वसूल होणारी आहे; ती सर्व भारतात आणली जात आहे व ती ठराविक मुदतीत नियत्रणाधीन केली जाईल. (२) त्या निर्यातीचे दस्त ऐवज हे अधिकृत बँके मार्फतच वटवले जातील. (Consignment Basis वर पाठविल्या जाणाऱ्या मालाबाबत हे बंधन लागू आहे) व (३) निर्यातीचे परकीय चलन नियत्रणद्वारे घालून दिलेल्या पद्धतीनुसारच आणले जाईल व त्याचे पैसे घेतले जातील.

निर्यातदाराकडे ऑर्डर आल्यानतर त्याला बोटीने माल पाठवायचा असल्यास त्याने तो योग्य पद्धतीने पॅकिंग करून आपल्या नौव्यवहारप्रतिनिधीतर्फे (Shipping Agents) बदरात पाठविला पाहिजे. तो पाठविण्यावर नियंत्रण नसल्यास निर्यातजकात अधिकारी तो पास केल्याचा शेरा मारील. त्यानतर नाविक निर्यातपत्र हे बरोबर व अस्सल आहे याची खात्री झाल्यावर मालाची किंमत, वर्णन, तऱ्हा या बाबतीत खात्री करून घेण्यासाठीं जकात अधिकाऱ्याला कुठलेही पॅकिंग उघडण्याचा अधिकार आहे. नाविक निर्यातपत्रात लिहिल्याप्रमाणेंच माल जात आहे, व तो जास्त किंमतीचा, वेगळ्या तऱ्हेचा नाहीं, किंवा काहीं अनधिकृत निर्यात होत नाहीना याबद्दल खात्री करून घेण्याचें जकात अधिकाऱ्याना सपूर्ण स्वातंत्र्य असते. अशा उघडल्या जाणाऱ्या मालाच्या पॅकिंग बद्दल आयातदाराला शका येऊ नये म्हणून निर्यात पत्रावर 'जकाततपासणीसाठीं पेटी क्रमाक...उघडली' असा शेरा मारला जातो.

सागरी निर्यातीबाबत निर्यातदाराला जी आर. फॉर्म भरावा लागतो हे वर सांगितलेच आहे. तो कशा पद्धतीनें भरला जातो हें बघणे इथे इष्ट ठरेल.

## जी. आर. फॉर्म :

कुठल्याही निर्यातीचे वेळीं जे फॉर्म निर्यातदाराला भरावे लागतात त्यात पाठविलेल्या मालाचे वर्णन, मालाची संपूर्ण बीजक किंमत ( Invoice Price ) परकीयचलन कुठल्या पद्धतीनें येणार आहे ती पद्धत व दस्तऐवज कुठल्या अधिकृत बँकेतर्फे पाठविले जातील तिचे नांव या गोष्टी द्याव्या लागतात.

सर्व सामान्यपणें निर्यातीसाठीं जी. आर. १ हा फॉर्म भरावा लागतो. ( जी. आर. २, जी. आर. ३ व जी. आर. एक्स हे कधी भरावे लागतात त्याची माहिती स्वतंत्रपणें पुढें येईलच. )

जी. आर. १ हा फॉर्म तीन प्रतीत ( In Triplicate ) भराव लागतो. पहिली प्रत ही जकात अधिकाऱ्याची तपासणी झाल्यावर तो ठेऊन घेतो. दुसरी व तिसरी प्रत निर्यातदाराला बीजकाच्या एका जादा प्रतीबरोबर अधिकृत बँकेकडे द्यावी लागते. या. जी. आर. फॉर्मची दुसरी प्रत ती बँक लगेच बीजकाचे प्रतीसह रिझर्व बँकेकडे पाठवते व त्यांत दस्तऐवज आमचेतर्फे पाठवले गेले आहेत / व त्याचे पैसे सांगितलेल्या मुदतीत सांगितलेल्या पद्धतीने येतील असा आपला शेरा मारते, व तिसरा फॉर्म परकी चलनाची वसुली होईपर्यंत स्वतःजवळ ठेवून घेते. या निर्यातीचे परकीय चलन हातांत आल्यावर मग या तिसऱ्या प्रतीवर तसे चलन कुठून व कशाप्रकारे मिळाले याचा खुलासा देणारा शेरा मारून मग तो रिझर्व बँकेकडे पाठवून देते. अशा रीतीने प्रत्येक निर्यातव्यवहारावर विनिमयनियंत्रणातर्फे आपोआपच नियंत्रण ठेवले जाते. कारण बंदरांतून गेलेल्या प्रत्येक मालाबाबतची माहिती जकात खात्याकडील फार्मनुसार गोळा होते; त्याचे कागदपत्र अधिकृत बँकेमार्फतच पाठवले गेले आहेत याची खात्री तिच्याकडून दुसरी प्रत आली की होते व तिसरी प्रत आल्यानंतर चलन मिळाल्याचा पुरावाही सादर होतो. म्हणजेच तिसरी प्रत हातांत पडेपर्यंत रिझर्व बँकेतील विनिमयनियंत्रणखाते

तो व्यवहार आपल्या दप्तरीं अपुरा म्हणून शिल्लक ठेवीत असते. जी. आर. फॉर्म १ हा मान्य केलेल्या चलनांत घालून दिलेल्या नियमांतील पद्धती-प्रमाणे चलन आणले जात असताना भरावा लागतो. मात्र पाकिस्तान आणि अफगाणिस्तानमध्ये होणाऱ्या निर्यातीला हा फॉर्म भरून चालत नाही तर ई. पी. फॉर्म भरावा लागतो.

## ई. पी. फॉर्म :

हा ई. पी. फॉर्मही जी. आर. फॉर्मप्रमाणे तीन प्रतीतच भरावा लागतो व त्याची विल्हेवाट जी. आर. फॉर्म प्रमाणेंच लावावी लागते. तो इतर सर्व बाबीतही जी. आर. १ फॉर्मप्रमाणेच असतो.

ई. पी. एक हा फॉर्म जी. आर. तीन या फॉर्मप्रमाणेच असतो. पण तो स्टर्लिंग विभागांतील पाकिस्तान व नॉनस्टर्लिंग विभागांतील अफगाणिस्तान या देशांत करावयाच्या निर्यातीसाठी वापरावयाचा असतो. आणि जिथे त्या निर्यातीचे मिळणारे चलन त्या देशातून करावयाच्या आयातीची किंमत देण्यासाठीं वापरावयासाठीं त्याच देशातून ठेवावयाची रिझर्व बॅंकेकडून खास अनुमति मिळवली असते तिथेच तो वापरतां येतो. या दोन देशातील अन्य प्रकारच्या निर्यातीबद्दल नेहमीप्रमाणे चलन भारतात येणार असल्यास नुसता ई. पी हाच फॉर्म वापरला जातो. ई. पी व ई. पी एक हे फॉर्मही तीन प्रतीतच भरावे लागतात.

## जी. आर. २ फॉर्म :

ज्या वेळेला मालाची निर्यात अफगाणिस्तान सोडून, नॉनस्टर्लिंग विभागांत काही विशिष्ट पद्धतीनुसार होत असते त्यावेळेला जी आर २ हा फॉर्म भरावा लागतो. या विशिष्ट पद्धतीत ( १ ) ग्रेटब्रिटन मधील भारतीय निर्यातदाराच्या प्रतिनिधीनें बॅंक ऑफ इंग्लंडला योग्य ते परकीय चलन सादर करण्याचा किंवा ग्रेट ब्रिटन मधील बॅंकेतील स्टर्लिंग नॉनरेसिडेंट अशा खात्यातून योग्य ते स्टर्लिंग, किमतीच्या भरपाईसाठीं घेण्याच्या दिलेल्या खात्रीवर मालाच्या निर्यातीसाठीं पैसे पुरविले जावे लागतात किंवा ( २ ) नॉनस्टर्लिंग विभागांत जाणाऱ्या निर्यातीबाबत मिळणारे स्टर्लिंग रूपांतील

चलन, निर्यातदाराच्या ग्रेट ब्रिटनमधील प्रतिनिधीकडे निर्यातदाराला लागणाऱ्या परदेशांतील आयातीचे पैसे देण्यासाठीं किंवा नियंत्रणानें संमति दिलेल्या अन्य प्रकारच्या खर्चाच्या तरतुदीसाठी ठेवावे लागतें.

जी. आर. २ या फॉर्मच्याही तीन प्रती भराव्या लागतात. पहिली जकातखात्याजवळ रहाते, व पुढील दोन प्रती एका जादा बीजक प्रतीसह अधिकृत बँकेकडे द्याव्या लागतात. त्यांतील दुसरी प्रत जी. आर. १ फॉर्म प्रमाणेच, अधिकृत बँक आपल्या शेऱ्यासह व बीजकाच्या प्रतीसह विनिमय-नियंत्रण विभागाकडे रिझर्व बँकेत पाठवते. तिसऱ्या प्रतीची विल्हेवाट मात्र जी. आर. एक फॉर्मप्रमाणे लावतां येत नाही तर जी आर दोन फॉर्मच्या तिसऱ्या प्रतीची विल्हेवाट जी. आर तीन फॉर्मप्रमाणेच लावावी लागते कारण परकीय चलन भारतात आलेले नसते.

## जी. आर. ३ फॉर्म :

जी. आर फॉर्म तीन हा स्टर्लिंग विभागात जाणाऱ्या निर्यातीबद्दल असतो. पण अशा निर्यातीनें उपलब्ध होणारे परकीय चलन, रिझर्व बँकेबरोबर केल्या गेलेल्या खास तरतुदीप्रमाणें निर्यातदाराला भारतात न आणतां आपल्या ग्रेट ब्रिटनमधील अथवा अन्य स्टर्लिंग विभागांतील देशांतील शाखेकडे किंवा प्रतिनिधीकडे, आपल्या पुढें होणाऱ्या भारतांतील आयातीचे पैसे देण्यासाठीं किंवा अन्य संमत खर्चासाठीं ठेवता येते. हा फॉर्मही तीन प्रतीत भरावा लागतो. मात्र त्यांतील दुसरी प्रत ज्या महिन्यांत निर्यात होते त्या महिन्याचे शेवटीं पाठवावी लागते आणि तिसरी प्रत निर्यातदाराच्या खातीं बँकेने रुपयात रक्कम जमा केल्यावर बँकेला पाठवावी लागते. स्टर्लिंग विभागातील पाकिस्तान मात्र या तरतुदीतून वगळले आहे व त्यासाठीं वेगळ्या फॉर्मची तरतूद केली आहे, तो म्हणजे ई. पी. एक हा फॉर्म होय.

कित्येक वेळां निर्यातदारानें पुढे होणाऱ्या निर्यातीबद्दल खरेदीदारावर आधीच नुसती दर्शनी हुंडी काढली तरी असे निर्यातनियंत्रण फॉर्म भरावेच लागतात व नंतर प्रत्यक्ष निर्यात झाल्यावरही तसे फॉर्म भरणें बंधनकारक आहे. म्हणजेच एकाच निर्यातीबद्दल अशा वेळी दोनदां

फॉर्म भरावे लागतात. हुंडी काढल्यानंतर निर्यातदार त्या फॉर्मची फक्त दुसरी व तिसरी प्रतच भरतो व ती हुंडी वटवून निर्यातदाराला पैसे दिल्यानंतर अधिकृत बँक दोन्ही प्रती रिझर्व्हबँकेकडे पाठवते व या फॉर्मची निर्यात नंतर होणार आहे असा शेरा मारते. प्रत्यक्ष निर्यात झाल्यानंतर जो नवीन फॉर्म भरला जातो त्यातील पहिली प्रत रिवाजाप्रमाणें जकात खात्याकडे राहते आणि दुसरी व तिसरी प्रत ज्या अधिकृत बँकेने पूर्वी हुंडी वटवली असेल तिच्यातर्फे रिझर्व्ह बँकेकडे जाते, व त्या प्रतीत दर्शवलेल्या निर्यातीची रक्कम पूर्वी अमुक अमुक प्रतीत कळवल्याप्रमाणे आधीं जमा झाली आहे असा शेरा मारला जातो.

त्याच प्रमाणें निर्यातदार कित्येकदा मालाच्या संपूर्ण किंमती ऐवजी काहीं टक्के किंमतीचीच सुमारे ७० ते ९० % ची दर्शनी हुंडी खरेदीदारावर काढतात. उरलेल्या रकमेच्याबाबत मुदती हुंडी काढली जाते व ती आयातदाराकडून स्वीकारली जाते. हे उरलेले पैसे खरेदीदाराने माल प्रत्यक्ष आल्यानंतर द्यावयाचे असतात किंवा माल सोडवल्यानंतर तपासणी करून समाधान झाल्यावर द्यावयाचे असतात, म्हणूनच अशी हुंडी काढली जाते. काही वेळेला आयातदाराला उधार सवलत द्यावयाचाही त्यात उद्देश असतो. अशा वेळीं निर्यातदाराला ज्या बँकेतर्फे असे बिल पाठवले जाते, तिला, योग्य मुदतीत, किंमतीच्या उरलेल्या टक्क्याची हुंडी वसुलीसाठीं देण्याचे म्हणजेच उरलेले परकीय चलनही योग्य मुदतीत भारतात उपलब्ध करण्याचे लिहून द्यावे लागते. जी. आर. फॉर्मची दुसरी प्रत रिझर्व्ह बँकेकडे पाठविण्यापूर्वी अधिकृत बँक मग त्याप्रमाणें खरी हकीकत दर्शविणारा शेरा मारते आणि तिसरी प्रत ही शंभर टक्के किंमत वसूल झाल्यानंतर मगच रिझर्व्ह बँकेकडे रवाना होते. ई. पी. फॉर्म भरल्यानंतर त्यातही अशी अंशतः वसुलीच आधी होणार असेल तर जी. आर. फॉर्मचीच पद्धत अनुसरली जाते.

त्याप्रमाणें आयातीचे वेळीं जागड पद्धतीवर ( Consignment Basis ) वर आयातदार माल मिळवू शकतो त्याचप्रमाणें तीच सवलत भारतीय निर्यातदारालाही आपल्या परदेशातील खरेदीदाराला द्यावी लागते.

विशेषतः प्रत्यक्ष माल पाहिल्याखेरीज ज्यावेळी खरेदीदार ते त्याच्या गिऱ्हाइकाला विकूं शकत नाही अशावेळीं, किंवा माल मोठ्या प्रमाणांवर मागितला असल्यास ही सवलत द्यावी लागते. अभ्रकाचे निर्यातीबाबत विशेषतः हा अनुभव येतो. अशा निर्यातीचे वेळीही नेहमीचे निर्यातनियंत्रण फॉर्म भरावे लागतात. फक्त त्याची तिसरी प्रत पाठवतांना विक्रीचा संपूर्ण हिशोब देणारा तक्ता जोडावा लागतो.

## पी. पी. फॉर्म :

ज्या वेळेला थोडा माल पाठवावयाचा असतो त्यावेळीं तो बदरावून पाठविण्याऐवजी पोस्टपार्सलने पाठवतात. असा माल अर्थात् पुढें विमानाने किंवा बोटीनेही जाऊं शकतो. या दोन्हीसाठीं हशील वेगवेगळे असते. पी. पी. पद्धतीने माल पाठविण्यांतला फरक एवढाच की बदरांत बोटीच्या मालकाकडे माल देण्याऐवजी व जकातीचे नियमाप्रमाणे पालन करण्याऐवजी निर्यातदाराला परदेशीं पाठवल्या जाणाऱ्या मालाचे पार्सल कुठल्याही पोस्ट ऑफिसमध्यें देतां येते. पोस्टांत असे पार्सल दिल्यावर त्याबद्दल पोस्टाची पावती मिळतेच. मात्र ही पावती नौनिर्यातपत्राप्रमाणे निगोशिएबल दस्तऐवज धरतां येत नाहीं. त्याचप्रमाणे मालावरील अधिकार सांगणारा असा ( Document of Title to Goods ) तो दस्तऐवज धरत नाहींत. त्यामुळें नाविक दस्तऐवजाचा जसा वटाव करता येतो तसे पोस्टपार्सलांचे पावत्यांबाबत होऊ शकत नाहीं. केवळ पोस्टखात्याला माल मिळाला यापलीकडे त्या पावतीला महत्व नाहीं. नाविकपत्र ज्याप्रमाणें माल सोडवण्यासाठीं दाखल करावेंच लागते त्याप्रमाणे ही पावती दाखल करावी लागतेच असे नाहीं.

अशा रीतीनें पोस्ट पार्सलने माल पाठवून त्याचे परकीय चलन जर येणार असेल तर तो माल कितीही किंमतीचा असला तरी त्याबद्दल पी. पी. फॉर्म हा भरावाच लागतो. असा माल ५० रुपये किंमतीच्या खालीं असला तर हा फॉर्म भरावा लागत नाही अशी कित्येकांची समजूत असते, पण ती चुकीची आहे. पी. पी. फॉर्म फक्त दोन बाबतींतच न भरण्याची सवलत आहे.

( १ ) ज्यावेळेला त्या निर्यातीत विदेशविनिमयाचा कुठलाच संबंध येत नाहीं म्हणजेच त्या वस्तू आपल्या नातेवाईकांचे उपयोगासाठीं वाजवी किंमतीइतक्या व विनामूल्य ह्मणून किंवा भेट म्हणून अन्यत्र पाठविल्या जात असतील तर अशा वस्तू ५० रु. चे किंमतीखालीं असल्यास त्याबाबत त्या पाठविणारानें पोस्टाला एक प्रतिज्ञापत्र लिहून द्यावे लागते व त्यांत अशा वस्तूंची किंमत इतके रुपये आहे व ती पाठविताना विदेशविनिमयाचा संबध येत नाही असे जाहीर करावे लागते. अशा वस्तूची किंमत जर ५० रुपयापेक्षां जास्त पण २७० रुपयापेक्षां कमी असेल तर त्याबाबत अधिकृत बँकेचे तसे प्रतिज्ञापत्रक पार्सल पाठविणाऱ्याला पोस्टऑफिसमध्यें दाखल करावे लागते. तसे प्रतिज्ञापत्रक देण्यापूर्वी बँक त्या पार्सलमध्यें काय पाठविले जात आहे ते पहावयाला मागूं शकेल व त्याची किंमत दर्शविणारी बिले वगैरे कागदपत्रही मागू शकेल. बँकेची किंमतीबाबत व विदेशविनिमयाचा त्यांत संबंध येत नाहीं याबाबत खात्री पटली म्हणजेच ती तसे प्रतिज्ञापत्र देते व त्याबद्दल कांहीं वेळा नाममात्र आकार लावते. याखेरीज इतर अन्य वेळीं पी. पी. फॉर्म न भरण्यासाठीं, अशा निर्यातीत विदेश-विनिमयाचा संबंध येत नाहीं असे रिझर्व बँकेचे शिफारसपत्र पोस्टांत दाखल करावे लागते. तसेच भेट वस्तूची किंमत रु. २७० चे वर असेल तरी रिझर्व बँकेची आगाऊ संमती घ्यावी लागते.

( २ ) एकादे पार्सल जर सरकारी व सैनिकी आदेशानुसार पाठविले जात असेल तर त्यासाठीं असा पी. पी. फॉर्म न भरण्याची सवलत आहे.

पार्सल-पोस्टान्वयें जर जडजवाहीर व मौल्यवान खड्यासारख्या वस्तू ५० रु. चे वर पाठविल्या जात असतील तर त्यांच्या किंमतीची खात्री करण्यासाठीं ते पार्सल जकात अधिकाऱ्यांसमोर दाखल करावे लागते. ते दाखल केल्यावर जकात अधिकारी त्या पार्सलवर आपले सील लावतात व बीजकावर आपला शिक्का मारून देतात. या दोन्ही गोष्टींची खात्री करून घेऊन मग अशा पार्सलांचे बाबत अधिकृत बँक आपले प्रतिज्ञापत्रक देते किंवा पी. पी. फॉर्मवर आपली सही करते.

पी. पी. फॉर्म, जी. आर. फॉर्मप्रमाणे तीन प्रतींतच भरावा लागतो. पोस्टांत पार्सल दाखल करण्यापूर्वी त्यातील पहिल्या प्रतीवर पार्सल ज्याला पाठवावयाचें त्याचे नांव, पत्ता, किंमत व ज्या बँकेतर्फे परकीय चलन विकलें जाईल तिचे नांव निर्यातदाराला घालावें लागतें व त्या मालाच्या बीजकाची एक प्रत व पी. पी. फॉर्मची दुसरी व तिसरी प्रत आपले जवळ ठेवून (किंवा सही न करतां परत करून) बँक पहिल्या प्रतीवर आपली सही देते. हा फॉर्म पोस्ट ऑफिसमध्यें पार्सल बरोबर द्यावा लागतो व नंतर बँकेकडे दुसरी व तिसरी पी. पी. फॉर्मची प्रत आणून द्यावी लागते. यांतली दुसरी प्रत अधिकृत बँक जी. आर. फॉर्म प्रमाणेच लगेच बीजकाच्या प्रतीबरोबर

कुठल्याही परिस्थितीस विनिमयनियंत्रण व व्यापारनियंत्रण याना तोच जबाबदार असतो. तरी पण बऱ्याच अधिकृत बँका, चेंबर ऑफ कॉमर्स-सारख्या संस्थातर्फे वा स्वतःच्या खात्यातर्फे, निर्यातदाराला योग्य ती मदत करावयास तयार असतात.

कित्येकदा निर्यातदारानें माल पाठविल्यावर त्याची बीजकें (विशेषतः पोस्ट पार्सलने माल गेल्यास) वगैरे कागदपत्र तोच आयातदाराकडे परस्पर पाठवतो व आयातदाराकडून त्याला परस्पर चेक किंवा ड्राफ्ट (अथवा कधीं-कधीं मेलट्रान्स्फर) द्वारा रक्कम येणे. अशावेळीं तो चेक/ड्राफ्ट भरताना वा मेल ट्रान्स्फर स्वीकारताना निर्यातदारानें ही रक्कम ज्या विशिष्ट निर्यातीबद्दल वा फॉर्मबद्दल असेल तिची माहिती अधिकृत बँकेला द्यावी लागते. नाहीतर असा चेक स्वतंत्रपणें वसूल होईल व त्याची कल्पना न आल्याने, पी. पी. फॉर्मच्या तिसऱ्या प्रती मात्र अधिकृत बँकेजवळ तशाच शिल्लक राहतील.

सर्वसामान्यपणे निर्यातीची किंमत भारतीय रुपयात, स्टर्लिंग पौंडात किंवा स्टर्लिंग विभागाचे देशातील चलनात किंवा विशिष्ट निर्देशित चलनात यावी लागते. ग्रेट ब्रिटनमध्यें कुणाजवळही एक ठराविक चलन आल्यावर ते तिथल्या अधिकृत बँकेला विकलेच पाहिजे असे तेथील सरकारनें बंधन घातले आहे. या विशिष्ट यादींतील चलनाना 'विशिष्ट निर्देशित चलनें' (Specified Currencies) अशी संज्ञा आहे. त्यात ऑस्ट्रिया, बेल्जियम, [illegible]लंड, जर्मनी, फ्रान्स, इराक, इटली, नॉर्वे, स्वीडन, डेन्मार्क, पोर्तुगाल, स्विझर्लंड व युनायटेड स्टेट्स या देशाच्या शिलिंग, बेल्जियन फ्रँक्स, गिल्डर्स, मार्क्स, फ्रँक्स, दिनार लिर, क्रोनर, एस्क्युडो, स्विस फ्रँक्स व डॉलर्स या चलनाचा अंतर्भाव सध्या केलेला आहे. या शिवाय कुठल्या कुठल्या पद्धतीनें प्रत्येक देशातून निर्यातीच्या किंमतीबद्दलचे परकीय चलन आणल्यास चालू शकेल त्याची यादी वेगवेगळ्या देशाचे विभाग करून परिशिष्टात दिलेली आहे.

# नोटा, नाणीं, सोनें, चांदी, जडजवाहीर यांची आयात व निर्यात :

## नोटा व नाणीं :

२१

विदेश-विनिमयनियंत्रणानें सर्व वस्तू, अदृश्य व्यापार आणि आर्थिक स्वरूपाचे कागदपत्र, चेक्स वगैरेच्या व प्रत्यक्ष चलन यांच्या आयातनिर्यातीवर निर्बंध घातले असल्यानें भारतीय चलनातील नाणीं आणि नोटा व विदेशीचलनाच्या नोटा व नाणीं यांच्या आयातनिर्याती-वर कांहीं निर्बंध असणें स्वाभाविक आहे. भारतीय रुपयांवर परकीय राष्ट्रांतील व्यक्तीचा असलेला हक्क म्हणजे भारताच्या देणें रकमेंत भरच होय. तर या उलट भारतांतील रहिवाशांच्या हातांत म्हणजेच त्यांच्या परदेशांतील बँकांतील खात्यांतही असलेलें विदेशी चलन म्हणजे भारताच्या परकीय चलनाच्या गंगाजळीत किंवा शिंदगीत भर होय. याबाबतचा जास्त विचार स्थायिक व अस्थायिक खात्यांचा विचार जेथे केला आहे तिथें किंवा भारतीय रहिवाशांनीं केलेल्या गुंतवणुकीचे उल्लेख आहेत तेथें केलेला आहेच. या प्रकरणांत प्रत्यक्ष चलनाचे बाबत विदेशविनिमयनियंत्रणाचे काय नियम आहेत त्याचा उहापोह केलेला आहे.

या चलनांचे बाबत विचार करताना त्याचे दोन भाग पाडतां येतील. (१) भारतीय चलन व (२) विदेशी चलन. त्याचप्रमाणें प्रवाशांनीं प्रत्यक्ष आपल्याबरोबर घेतलेली / नेलेलीं / आणलेली नाणीं व नोटा व स्वतःबरोबर न आणतां बाहेर पाठवलेले किंवा बाहेरून पोस्टद्वारा आणलेले चलन असाही वर्गीकरणाचा दुसरा प्रकार करतां येईल.

प्रवाशांचे बाबतीत चलनाच्या आयातनिर्यातीचा जास्त संबंध येत असल्यानें त्याचा विचार आधी करणें इष्ट ठरेल. भारतांतून बाहेर जाताना

कुठल्याही प्रवाशाला आपल्याबरोबर रिझर्व बँकेच्या समतिपत्राशिवाय रुपये पचाहत्तरपर्यंत भारतीय चलन किंवा तितक्या किंमतीचे विदेशी चलन–नाणी वा नोटा या स्वरूपात–नेता येते. असें विदेशी चलन त्यास अधिकृत व्यवहारींकडून किंवा विक्रेत्याकडून विकत मिळू शकते. असे चलन विकल्यावर, प्रवासी चेक, ड्राफ्टप्रमाणेच प्रवाशाचे पासपोर्टवर त्याची नोंद विक्रेत्याकडून केली जाते. भारतीय रुपयाच्या नोटा नेताना अशी नोंद करण्याची जरुरी नसते. या नोटा परदेशात बदलून घेऊन त्याऐवजीं त्या प्रवाशास तितक्या किंमतीचे परकीय चलन विकत घेता येते. मात्र पाकिस्तान व अफगाणिस्तान या देशाचे बाबतीत ही कमाल मर्यादा ७५ रुपयाची नसून फक्त ५० रुपयाचीच आहे.

हिंदी व परदेशी चलनाबाबतची ही पचाहत्तर रुपयाची कमाल मर्यादा संयुक्त आहे. म्हणजेच प्रवाशाला जास्तीत जास्त भारतीय चलन ७५ रुपयाचे नेता येईल किंवा जास्तीत जास्त विदेशी चलन ७५ रुपयाचे किंमतीपर्यंत नेता येईल किंवा १५ रुपयाचे किंवा २५ रुपयाचे भारतीय चलन व साठ रुपये वा ५० रुपये किंमतीपर्यंत विदेशी चलन असें दोन्ही प्रकारचे पण रुपये पचाहत्तरपर्यंतच किंमतीचें एकूण चलन नेता येईल. मात्र पाकिस्तानला जाणाऱ्या प्रवाशाना भारतीय ५० रुपयाचे खेरीज शिवाय १०० पाकिस्तानी रुपयाचे चलन बरोबर नेता येईल. मात्र अफगाणिस्तान-बाबत वरील मर्यादेच्यावर जादा असे अफगाणिस्तानी चलन कितीही म्हणजे अमर्यादित असे नेता येईल

याखेरीज हाज यात्रेला जाऊ इच्छिणाऱ्या मुस्लिम प्रवाशाचे बाब-तीत हाजसाठी काढलेल्या खास नोटा नेण्याचे बाबतीत अपवाद करण्यात आला आहे. मात्र ही रक्कम ठराविक अशी नसून ती प्रत्येक हाजयात्रेच्या वेळीं ठरवली जाते व ती प्रवाशागणिक वेगळी असू शकते या नोटा फक्त रिझर्व बँकेत किंवा हाज कमिटीकडेच मिळू शकतात.

तसेच भारतात तात्पुरते आलेल्या व नंतर भारताबाहेर जाणाऱ्या अभारतीय प्रवाशाचे बाबत थोडे. वेगळे निर्बंध आहेत. अशा प्रवाशाना

भारतात येताना ७५ रुपयापर्यंत भारतीय चलन आणता येईल, पण विदेशी-चलन मात्र कितीही रकमेचे आणतां येते. भारतात विमानानें किंवा बोटीनें उतरल्यावर आपल्याजवळ नोटा व नाण्याचे स्वरुपात किती भारतीय वा विदेशी चलन आहे हे त्याना कस्टम कचेरीत एका प्रकटपत्रान्वये (Declaration Form) जाहीर करावें लागतें. अशा जाहीर केलेल्या चलनापैकीं, त्या रकमेतील काही रकम भारतात खर्च झाल्यानतर जितकी रकम शिल्लक राहिली असेल तेवढीच त्याना परत नेता येईल. भारतीय रहिवासी परदेशातून मायदेशीं परत येतो तेव्हा त्याला भारतीय चलन रु. ७५ पर्यंत व विदेशींचलन अमर्यादित आणता येते. मात्र ज्या देशाचे चलन आणले जाते त्या देशाचे चलननिर्यातीबद्दल काय नियम आहेत हे बघणें त्यास आवश्यक असते. व हे चलन आणल्यावर वरीलप्रमाणेंच प्रकटपत्र भरून मग एक महिन्यात ते चलन त्याला अधिकृत व्यवहारीला विकावे लागते.

रुपये पचाहत्तरपर्यंत अशा नोटा मात्र प्रवाशाला आपल्याबरोबर आणण्याची परवानगी दिलेली आहे. त्यातही पाकिस्तान व अफगाणिस्तान मधून येणाऱ्या प्रवाशाना या रकमेतच एक रुपयाच्या नोटा पाचपेक्षा जास्त आणण्यास बंदी आहे.

सोदी अरेबियातील हाज नोटा किंवा इराणी आखातातील वेगवेगळी बेटे, मस्कत, ओमान, बहरिन, कुवेत, दुबाई, अबूढाबी, शारजाह, उमुल-अवार्टन, कलबा, रास-अल, खैमाह, अजमान व फुजैरा या ठिकाणीं अधिकृत चलन असलेल्या भारत सरकारच्या खास नोटा जर परत न्यावयाच्या नसतील तर अशा रितीनें त्या जाहीर करण्याची आवश्यकता नाहीं. तसेंच वर अन्यत्र उल्लेखिलेल्या पचाहत्तर भारतीय रुपयाचे खेरीज या नोटा जास्त आणण्यास परवानगी आहे,

मात्र तात्पुरत्या प्रवाशाना परत जाताना जर त्या पैकीं काहीं नोटा परत न्यावयाच्या असतील तर वरील प्रमाणेंच भारतातून जाताना त्या कस्टम खात्याकडे जाहीर करणें आवश्यक आहे. ही सवलत फक्त अभारतीय प्रवाशाना किंवा भारतात तात्पुरता प्रवास करणाऱ्यानाच आहे. परदेशातून परत

येणाऱ्या भारतीय उतारूना किंवा आल्यानंतर भारतातच बराच काल राहणाऱ्या परकीय व्यक्तींना देखील, बरोबर आणलेले चलन, एक महिन्याचे आत अधिकृत व्यवहारींना विकण्याची सक्ती आहे

वरील प्रमाणे स्वत बरोबर न नेता किंवा न आणता, जर पोस्टाने भारतीय वा परकीय चलन न्यावयाचे आणावयाचे असेल तर त्यासंबंधचे नियम वेगळे आहेत. रिझर्व बॅंकेच्या समतिपत्राखेरीज अशा रितीने पोस्टानें कुणालाही नोटा व/वा नाणीं निर्यात करता येत नाहीत. इतकेच नव्हे तर विदेशविनिमयाचा अधिकृत व्यवहार करणाऱ्या बॅंकाना सुद्धा त्याबाबत सवलत नसून नोटा व नाण्याचे निर्यातीसाठीं त्याना देखील वरील प्रमाणें समतिपत्र घ्यावें लागतें अशा नोटा विदेशात असलेल्या आपल्या परकीय चलनाचे खात्याला त्याची रक्कम जमा करण्यासाठींच या बॅंका पाठवत असतात व त्यानी त्या प्रवाशाकडून विकत घेतलेल्या असतात असें समतिपत्र रिझर्व बॅंक दोन प्रतीत देते. त्यातील एक प्रत त्या नोटा निर्यात करताना त्याबरोबर पाठवणें आवश्यक असतें त्यायोगे जकात अधिकाऱ्याना ही निर्यात अधिकृत होत आहे हे कळू शकतें. अशा नोटा पाठवण्यासाठीं पोस्टेज खर्च बराच येत असल्याने त्या खरेदी करताना बॅंका स्वस्त दरानेच खरेदी करतात. म्हणजे चलनाचे बदली, त्या, प्रवाशाला कमी भारतीय रुपये देत असतात. खास प्रकारच्या भारतीय नोटा ज्या भागात चालतात त्या इराणी आखातातील बॅंकानी तिकडील प्रवाशाना विकण्यासाठीं त्या मागितल्या तर पोस्टाने त्या पाठवण्यासाठीं रिझर्व बॅंक अनुमति पत्र देतें.

भारतीय नोटा ज्याप्रमाणें पोस्टानें बाहेर पाठवण्यास बंदी आहे त्याचप्रमाणें पोस्टाने त्याची आयात करणेही परवानगीशिवाय अवैध आहे.

वरील विवेचनावरून परदेशी चलन व भारतीय चलन-नोटा व नाणीं-याच्या प्रत्यक्ष आयातनिर्यातीच्या कलमाचा खुलासा होईल. भारतीय चलनात, रिझर्व बॅंक व भारत सरकार यानी ( १ ) भारतात वापरासाठीं काढलेल्या ( २ ) इराणी आखातात वापरण्यासाठीं काढलेल्या व ( ३ ) सौदी अरेबियान हाज यात्रेसाठीं जाऊ इच्छिणाऱ्यासाठीं खास काढलेल्या

हाज नोटा या तीन्ही प्रकारांचा समावेश होतो. पूर्वी भारतीय नोटांचा एकच प्रकार तीन्ही बाबतीत चालू होता. पण अशा नोटांचा दुरुपयोग होत असल्याचे आढळून आल्याने इराणी आखातांत वापरण्यासाठीं व हाज यात्रेच्या वापरासाठीं वेगळ्या प्रकारच्या नोटा जून १९६१ पासून सुरू करण्यांत आल्या.

## सोनें व चांदी :

भारतात कुठलेही चलन—नोटा अगर नाण्यांचे स्वरूपांत—आणण्यास कांहीं निर्बंध आहेत, तसेंच त्यांचे निर्यातीबरही कांही बंधनें आहेत. त्याचप्रमाणे सोने व चांदी या दोन धातूंचा नाण्यांसाठी उपयोग केला जातो व विशेषतः सोन्याला तर आंतराष्ट्रीय चलनाचे स्थान असल्याने या दोन धातूंच्या आयातनिर्यातीबद्दलही कांही नियम करण्यांत आले असून त्यांचा व्यवहार मुक्तपणें करतां येत नाही. तसेंच जडजवाहीर व मौल्यवान खड्यांची संपत्तीतच गणना होत असल्यानें त्यांचा व्यापार किंवा त्याबाबतचा वैयक्तिक व्यवहारही कांही निर्बंधास पात्र आहे.

दिवसेंदिवस सोन्याचा उपयोग नाणीं करण्यासाठीं कमी होऊं लागला असला तरी राष्ट्रांराष्ट्रांतील व्यवहारपूर्ततेसाठी सर्वमान्य चलन म्हणून सोन्याची गणना केली गेली आहे. आंतरराष्ट्रीय निधिनेंही प्रत्येक राष्ट्राचे चलनपरिमाण सोन्याच्या परिमाणातच ठरवले आहे. निधिनें ठरवलेली सोन्याची किंमत एका चोख औंसासाठीं पस्तीस युनायटेड स्टेट्स डॉलर्स इतकी आहे. म्हणजेच अडीच तोळ्याला सुमारें १६६·६७ रुपये अशी त्याची किंमत होते. १९५९ पूर्वी भारतीय चलनांत असलेल्या सुवर्णाची किंमत या किंमतीपेक्षांही कमी दरानें करण्यांत येत होती व त्याचा फायदा घेऊन शिलकी सुवर्णसांठ्यांचे फेब्रुवारी १९५९ सालीं पुनर्मूल्यन (Revaluation) करण्यांत येऊन भारतीय तिजोरीत विदेशविनिमयाचे व सुवर्णगंगाजळीचे प्रमाण किमान ८५ कोटी रुपये व ११५ कोटी रुपये इतकें असलें पाहिजेत. असें ठरवण्यांत आलें.

विदेशविनिमयाचे व्यवहारासाठीं केल्या गेलेल्या सोन्याचे व्याख्येत कुठल्याही प्रकारच्या सोन्याची किंवा सुवर्णमिश्रित वस्तूची गणना करण्यात आली आहे. त्यात जुन्या, नव्या, व्यवहारात चालू किंवा चालू नसलेल्या कुठल्याही राष्ट्राच्या, कुठल्याही नाण्याचा, सोन्याच्या चिपा किंवा गोळे किंवा बार, चोख किंवा कमी चोख असलेल्या शुद्ध वा अशुद्ध सोन्याचा, आणि संपूर्णपणें किंवा अंशत ज्यात सोने वापरले गेले आहे अशा सर्व प्रकारच्या दागिन्याचा, वस्तूचा, जडजवाहिराचा समावेश होतो. या उपरनिर्दिष्ट वस्तूच्या बाबत परदेशाशी कुठलाही व्यवहार असेल किंवा त्याची खत साठीं किंवा व्यापारासाठीं आयातनिर्यात करावयाची असेल तर त्यासाठीं रिझर्व बँकेची परवानगी लागते. अशा प्रकारचे परवाने हल्ली सहसा दिले जात नाहीत, पण विदेशीय व्यक्तीकडून जर भारतात कारागिरीसाठीं सोने पाठवले जाणार असलें व त्याचे दागिन्यात परिवर्तन करून जर ते परत निर्यात होणार असले तर त्यासाठीं मात्र योग्य ते परवाने अशा व्यवहारात असणाऱ्या जडजवाहीर किंवा सोन्याच्या दागिने घडविणाऱ्या सराफ, सोनारांना दिले जातात आणि त्यावेळीं ते सोने विदेशीय निर्यातदार व्यक्तीच्या नावें आले आहे असा उल्लेख त्यात करण्यात येतो. असा परवाना काढण्यासाठी अर्ज करताना अर्जदाराने अर्जासोबत ज्या विदेशी निर्यातदाराकडून सोने यावयाचें असेल, त्याने आपल्या राष्ट्रातून अशा निर्यातीसाठीं लागणारा निर्यात-परवाना काढला आहे याची खात्री पटवणारा पुरावा द्यावा लागतो. तसेच त्या सोन्याची जडणघडण होऊन नंतर ते जडजवाहीर किंवा दागिने या स्वरूपात पुन्हा निर्यात केले जातील याची हमी द्यावी लागते. अर्थात् अशी हमी दिली तरी प्रत्यक्ष निर्यातीचेवेळीं आवश्यक असणारे निर्यातीबाबतचे विदेशविनिमयाचे नियमाचे परिपालन करावे लागतेच. तसेच त्याबाबत मजुरीसाठीं येणाऱ्या विदेशविनिमयाचे बाबत योग्य तो फॉर्म भरावा लागतो. केवळ परवाना मिळाला म्हणून या तांत्रिक बाबींतन मुक्तता होत नाहीं.

सोन्याप्रमाणें चादीबाबतही जवळजवळ असेच निर्बंध आहेत. विदेशविनिमयापुरती चादीची व्याख्या करताना त्यात भारतात वा अन्य

देशांत व्यवहारमान्य असलेले, तसेच चालू नसलेलें चांदीचे चलन (नाणीं) व चांदीचे पत्रे, बार, चिपा वगैरे सर्व प्रकारच्या स्वरूपाच्या चांदीचा समावेश केलेला आहे. चांदीच्या व्यवहारांत रिझर्व बँकेचा फक्त आयाती पुरताच संबंध येतो. व आयातीसाठीं बँकेची योग्य ती परवानगी घ्यावी लागते. अशा आयातीसाठीं बँकेकडून हल्लीं कुठल्याही स्वरूपाचे परवाने दिले जात नाहींत. चांदीचा निर्यातव्यवहार हा मध्यवर्ति सरकारच्या व्यापार व उद्योगखात्याच्या कक्षेत येत असून त्याबाबत आयातनिर्यात-प्रमुखनियंत्रक (चीफ कंट्रोलर ऑफ इंपोर्ट्स अॅन्ड एक्स्पोर्ट्स) यांचा अधिकार चालतो.

## जडजवाहीर :

जडजवाहिरांत अंशतः अगर संपूर्ण प्लॅटिनम वापरून केलेल्या वस्तू, व सर्व प्रकारचे हिरे, मोती नीलमणी, पाचू वगैरेसारखे मौल्यवान खडे आणि अंशतः सोन्याच्या केलेल्या वस्तूंची गणना होते. त्याचे आयाती-बाबतही—मग ती प्रवाशाने स्वतः बरोबर आणून किंवा पोस्टाने केलेली असो—व्यापारनियंत्रण खातें तसेच जकातखाते यांचा अंमल चालतो. या दोन्हीं खात्यांच्या वेळोवेळीं केल्या जाणाऱ्या नियमांचे याबाबत पालन करावे लागते. सोन्याच्या जडजवाहिराबाबत जर ती आयात पोस्टामार्फत होणार असेल तर रिझर्व बँकेची अशा आयातीसाठीं परवानगी लागते. जकातखात्याच्या नियमाप्रमाणें दिल्या गेलेल्या मर्यादेबाहेर, जर प्रवाशानें स्वतःबरोबर त्या वस्तू आणून अशी जडजवाहीराची आयात केली असेल तर मर्यादेबाहेरच्या वस्तू जकात खातें ठेवून घेते व मग त्यांची आयात कायदेशीर करण्यासाठीं प्रवाशांना रिझर्व बँकेकडे अर्ज करून तिची परवानगी घ्यावी लागते. मात्र भारताबाहेर जाताना प्रवाशांनी त्यावेळीं चालू असलेल्या जकात नियमानुसार आपल्याबरोबर जे जडजवाहीर किंवा दागिने नेले असतील त्या बाबत जकात अधिकाऱ्याकडून निर्यात परवाना घेतलेला असल्यास त्यांच्या पुनरायातीस परवानगी दिली जाते. घड्याळांचा देखील या बाबतीत जवाहिरांतच अंतर्भाव केला जातो.

जडजवाहीर व मौल्यवान खडे याच्या व्यापारी निर्यातीस मात्र रिझर्व बँकेची सर्रास परवानगी लागते. पूर्वी लिहिल्याप्रमाणें परवानगी घेऊन कलाकुसरीच्या किंवा जडण घडणाच्या कामासाठीं सोने आयात केलेले असले तर त्या सोन्याच्या केलेल्या किंवा घडलेल्या वस्तूच्या निर्यातीस परवानगी दिली जाते. त्याची मजुरी कुठल्या प्रकारे भारतात येत आहे याचा खुलासा मात्र त्यावेळीं द्यावा लागतो. इतर वेळीं जर व्यापारी-विक्रीसाठीं या तत्सम व्यवहारासाठीं अशी निर्यात करावयाची असेल तर पाठवावयाच्या सोन्याच्या संपूर्ण माहितीसह निर्यातदाराला रिझर्व बँकेकडे अर्ज करावा लागतो.

सोनें नसलेल्या अन्य जडजवाहिराच्या वस्तू व मौल्यवान खडे व मोती याच्या निर्यातीसाठीं रिझर्व बँकेची पूर्वसमति लागत नाहीं. मात्र अशा वस्तू पोस्टानें पाठवल्या गेल्या पाहिजेत व त्याचे किंमतीइतके विदेशी चलन भारतात कसे येईल त्याचा खुलासा देणारा पी. पी फॉर्महो त्यावेळीं भरला पाहिजे. तसेच अशा वस्तू पाठवताना प्रथम त्या जकातखात्याला दाखवून व त्याच्या किंमतीबाबतचा पुरावा देऊन त्याचे पार्सल त्या खात्याकडून 'सील' करून घ्यावे लागते व नतर पी. पी. फॉर्म अधिकृत बँकेकडे हजर करावा लागतो अशा वस्तू परदेशात असलेल्या व्यक्तीला जर देणगी म्हणून पाठवावयाच्या असतील तर मात्र रिझर्व बँकेकडून त्यासाठीं निर्यात परवाना काढावा लागतो.

अशा वस्तू अन्य देशात पाठवताना त्याचेवर याखेरीज दुसरे निर्बंध नसले तरी भारतातील पोर्तुगीज वसाहती व नेपाळ याचा मात्र पूर्वी अपवाद केला गेला होता. पोर्तुगीज वसाहती आता भारतात आल्यानें त्याना अन्य भारतीय प्रदेशाप्रमाणेंच नियमनिर्बंध लागू आहेत

पूर्वी गोवा, दीव, दमण या पोर्तुगीज वसाहतींत एका दिवशीं कमाल रुपये दीडशेच्या मर्यादेपर्यंतच अशा वस्तू निर्यात करता येत होत्या ही कमाल मर्यादा नेपाळसाठीं एका दिवशीं रुपये दोन हजारची आहे या कमाल मर्यादेपर्यंत नेपाळमध्यें रिझर्व बँकेच्या पूर्वसमतिविना अशा वस्तू

निर्यात करतां येतात. व या मर्यादेनंतर मात्र रिझर्व बँकेकडे योग्य अर्ज करून तिची परवानगी घ्यावी लागते.

भारताबाहेर जाताना प्रवाशांना आपल्याबरोबर जे जडजवाहीर विनापरवानगी नेतां येतें त्याबाबतचे वेळोवेळचे निर्बंध प्रवाशानें जाण्यापूर्वी बघणे इष्ट असते. याबाबत सध्यां खालीलप्रमाणें नियम अस्तित्वांत आहेत.

१) पाकिस्तान, अफगाणिस्तान, इराणी आखातांतील बंदरें व इराण येथें जाऊ इच्छिणाऱ्यांना दर माणशीं असे दागिने, जडजवाहीर व मौल्यवान खडे रुपये २००० च्या मर्यादेपर्यंत नेतां येतात.

२) वरील प्रदेश सोडून इतर कुठेही जाणाऱ्या प्रवाशांना अशा वस्तू प्रत्येकी रुपये पांच हजार किंमतीपर्यंत नेतां येतात. पाकिस्तानखेरीज अन्य देशाचे रहिवासी जर भारतातून परत आपल्या मायदेशी जात असतील तर त्याचेसाठीं ही मर्यादा १५००० रुपयांइतकी ठेवण्यांत आली आहे. तसेंच विदेशी नागरिकांना मायदेशीं जातांना त्यांची स्वतःची या प्रकारची असलेली संपत्ति संपूर्णपणें नेतां येते. तर भारतीय नागरीक ज्यावेळेला तात्पुरते बाहेर जातात त्यावेळेला जकातखात्याकडे जाहीर केल्यास पुनः त्या वस्तू परत येतेवेळीं आणण्याच्या अटीवर त्यांना सध्यां रुपये दोनहजारपर्यंत अशा वस्तू बरोबर नेतां येतात. (अशा जडजवाहिरांत घड्याळाचाही समावेश केला जातो.)

३) भारतांतील पोर्तुगीज वसाहतीत जाणाऱ्या प्रवाशासाठीं पूर्वी ही मर्यादा कमी होती. त्या प्रदेशासाठीं स्त्रीप्रवाशांसाठीं अशा निर्यातीची कमालमर्यादा प्रत्येक माणशीं रुपये १००० पर्यंत (यांत अज्ञान व्यक्तींचा समावेश नव्हता) होती.

वरील मर्यादेबाहेर जर प्रवाशांना अशा वस्तू न्यावयाच्या असतील तर त्यासाठीं 'जे' फॉर्मवर रिझर्व बँकेकडे परस्पर किंवा अधिकृत व्यवहारी बँकेमार्फत अर्ज करावा लागतो. या फॉर्मचा नमुना रिझर्व बँकेत किंवा कुठ-

रकम म्हणून किंवा कमिशन वगैरेसारख्या कुठल्याही कारणामुळे या व्यवहारामुळें येवो. भारतात तात्पुरत्या आलेल्या व रहाणाऱ्या व्यक्तींखेरीज, भारतात जे कायम रहातात अशा सर्व व्यक्तींवर अशी रकम हातात आल्यावर ती एक महिन्याचे आत रूपांतर करून घेऊन, अधिकृत बँकाना विकली पाहिजे असा निर्बंध आहे. ज्याना परदेशात खाते ठेवण्याची वा रकमा ठेवण्याची खास परवानगी दिली गेली आहे अशाचा, या निर्बंधाला फक्त अपवाद आहे. ८ जुलै १९४७ पूर्वी ज्याचा खातीं स्टर्लिंगमध्ये परदेशात होती त्याना त्या दिवशी त्या त्या खात्यावर असलेली रकम विनानिर्बंध वापरण्याची व अशा रितीनें बँकाना न देण्याची सवलत दिली गेली होती. या गोष्टीला आता चोदा वर्षें होऊन गेली असल्याने असे खाते असणें वा त्यावरील रकम अजून शिल्लक असणें अशक्य आहे. पण अनवधानाने काहीं खातीं अजूनही राहिली आहेत असे दिसल्याने सन १९६१ मध्यें रिझर्व बँकेने कुणाची अशीं खातीं असल्यास ती जाहीर करावीत असा हुकुम काढला होता. तसेच ज्या ज्या व्यक्तींना बाहेरील व्यक्तीकडून परदेशी चलन मिळणार असण्याची शक्यता असते त्याना अशी रकम उशीरा वगैरे करून न घेता त्या लगेच वर्ग करून घेण्याचेही बंधन आहे त्याचप्रमाणे अशी रकम भारतात येणे असूनही ती येणें शक्य होणार नाही असें कुठल्येही कृत्य करण्यास सर्व भारतीय रहिवाशाना बंदी आहे

भारतात विदेशी चलन स्वागतार्हच असल्याने त्यानुसार करावयाच्या तांत्रिक बाबी व नियम शक्यतो कमी ठेवण्यात आल्या आहेत. व त्या फक्त आकडेवारी गोळा करण्यासाठीं किंवा विदेशी चलनाचे आगमन सुनियंत्रित करण्यासाठींच ठेवल्या आहेत. कारण असे सर्व चलन भारताच्या एकूण निर्धीत भर घालण्यासाठींच असते भारताबाहेरून येणाऱ्या प्रवाशाना त्यामुळेंच आपल्याजवळील विदेशी चलन अधिकृत बँका किंवा विदेश विनिमयदलालाना विकून त्याचे रुपये करून घेण्याची मुक्त परवानगी आहे. तसेच कुणाही व्यक्तीच्या नावे आलेले ड्राफ्ट, किंवा मेल ट्रान्सफर व केबलद्वारा आलेले पैसेही अधिकृत बँकामार्फत लगेच बदलून

घेण्याची परवानगी ठेवण्यात आली आहे. भारतीय रहिवाशावर किंवा भारतात येणाऱ्या प्रवाशावर व आयातीवर, तसेंच भारतातून बाहेर जाणाऱ्या व्यक्तीवर, चलनावर, वस्तूवर जसे निर्बंध आहेत त्याप्रमाणें अस्थायिक लोकांनीं, मथानी, व्यक्तीनी भारतात ठेवलेल्या रुपयातील खात्यावरही निर्बंध आहेत कारण भारतीय चलनावर अस्थायिकाचे हक्क असल्यावर त्याचें रूपातर करण्याचेवेळीं विदेशी चलनात पैसे द्यावे लागल्याने त्यावरदेखील नियमन असणें अपरिहार्य आहे अशा खात्याचे तीन विभाग करता येतील. (१) भारतीय बँका बाहेर विदेशी चलनात खातीं ठेवतात तशाच प्रकारे अभारतीय परदेशी बँकानी दैनदिन व्यवहारपूर्ततेसाठीं भारतीय बँकाकडे ठेवलेलीं खाती (२) भारतीय बँकातून, राष्ट्रीयत्वानें भारतीय असलेल्या पण नोकरींधद्यानिमित्त बाहेर गेलेल्या व्यक्तींनी ठेवलेली खातीं (३) अभारतीय सस्था, व त्याच्या शाखा, इथे नोकरीस असलेले विदेशी रहिवासी वगैरेनीं ठेवलेली खाती या खात्याबाबत काय काय निर्बंध आहेत त्याची माहिती खाली दिलेली आहे

## बँकाचीं अस्थायिक खातीं :

१ ) अभारतीय बँकाना भारतातील कुठल्याही अधिकृत व्यवहारीकडे पूर्वसमतिविना खाते ठेवण्याची परवानगी आहे या खात्याबद्दलची माहिती ते उघडल्यावर रिझर्व बँकेला देताना, ते खाते कुठल्या कारणासाठीं वापरले जाईल, खात्यात पैसे कश ठेवले जातील हे कळवावे लागते. अधिकृत व्यवहारी (बँके)च्या भारताबाहेर असलल्या शाखेचे असे खातेही अस्थायिकच समजले जाते या खात्यात जमा होणाऱ्या रकमा या परदेशीं पाठवल्या जाणाऱ्या रकमा होत असेच धरलेले आहे, व त्यासाठीं ए ७ हा अर्ज भरून, अन्य रकमा परदेशीं पाठवताना ज्यावेळीं पूर्व समती घ्यावी लागली असती, अशा सर्व व्यवहाराचे बाबतीत ए ७ अर्ज विनिमयनियत्रणाकडे पाठवून त्याची समति घ्यावी लागते एकाच परदेशी बँकेच्या एका ठिकाणच्या अस्थायिक खात्यातून दुसऱ्या ठिकाणा रकमा वर्ग करावयाच्या असल्या तरीही रिझर्व बँकेला तो

लागतो. तसेच या खात्यांतील व्यवहाराचा मासिक तक्ता अधिकृत व्यवहारींना रिझर्व्ह बँकेकडे पाठवावा लागतो. भारतातून एखादी व्यक्ती दीर्घकाळ बाहेर गेली की तिची खातीं अस्थायिक ठरतात, त्याचप्रमाणें भारताबाहेर रहाणाऱ्या व्यक्ती व संस्थांची खातींही अस्थायिक समजली जातात हे वर विशद केलें आहेच. पण त्याचप्रमाणे भारतीय बँकाच्या भारताबाहेरील शाखाची, भारतात असलेल्या बँकेतील शाखातून असणारी खातीही, अस्थायिक स्वरूपाचीच गणली जातात. अधिकृत भारतीय बँकाना आपल्या शाखाची किंवा एक्स्चेंज बँकाना आपल्या परदेशांतील मुख्य कचेरीची व एकूण सर्व अधिकृत बँकाना अन्य विदेशी बँकाची खातीं ठेवावयाची असतात, तेव्हा रिझर्व बँकेकडे तीं खातीं कुठल्या कारणासाठी ठेवली जात आहेत व त्यात भरणा कशाप्रकारें केला जाऊन शिल्लक ठेवली जाईल याचा खुलासा द्यावा लागतो. अभारतीय बँकाच्या खात्यातून जमा व नावे अशा होणाऱ्या प्रत्येक प्रकारच्या व्यवहारानें परकीय चलनाचाच व्यवहार होतो आहे असें समजले जाते; व त्यातल्या प्रत्येक नोंदीसाठीं योग्य तो फॉर्म वेगवेगळ्या तक्त्याबरोबर दाखल करावा लागतो. अशा व्यवहाराचे स्वरूप खालीलप्रमाणें असतें.

भारतात ज्यावेळीं परदेशी बँका काही बिलें वसुलीसाठीं पाठवतात त्यावेळीं त्या बँका स्वत चे देशातील चलन मागण्याऐवजी काहीवेळा ती रक्कम भारतातच त्याच्या खात्याला रुपयात जमा करण्याची सूचना देतात. कारण परदेशातील आयातदार जेव्हा भारतातून माल मागवतो व ते बिल बँकेमार्फत येते तेव्हा परदेशी बँकेला ते पैसे अशा भारतीय रुपयाच्या खात्यातून नावे टाकून काढून घेण्याची अधिकृत बँकेला सूचना देता येते. ज्या कारणासाठीं भारतीय बँका परदेशात विदेशी चलनखातीं ठेवतात त्याच कारणासाठीं परदेशी बँका भारतात रुपयाचे खाते ( त्याचे दृष्टीने विदेशी चलनाचे खातें ) ठेवीत असतात. अशा खात्यावर वरील प्रमाणें बिलाचे किंवा तारबदली, टपालबदली वगैरेचे व्यवहार करणें त्याना सुकर होतें.

अधिकृत व्यवहारीकडे अभारतीय बँकांनी जी खातीं ठेवली असतील त्यातून भारतीय निर्यातदारांना पैसे देताना त्यांना नियंत्रणाला कळवावें लागत नाही. त्याची माहिती जी. आर. / पी. पी. फॉर्मद्वारा दिली जाते. अशा खात्यांतून भारतीय राष्ट्रीयत्वाच्या भारतीय रहिवाशांना रु. वीस हजार पर्यंत रक्कम द्यावयाची असेल तर किंवा अन्यत्र असलेल्या भारतीयानी आपल्या खात्यांस जमा करण्यांस सांगितल्यामुळे काढलेल्या तार किंवा टपाल बदली यासाठीं नियंत्रणाला कळवण्याची जरूरी नसते. मात्र या दोन्ही प्रकारांत रु. वीस हजारपेक्षां जास्त रक्कम द्यायची असेल तर ए फॉर्म भरून ती माहिती द्यावी लागते. तसेच भारतांतील अन्य कुठल्याही बँकेच्या अस्थायिक खात्याला रकमा वर्ग करताना देखील हा फॉर्म भरावा लागतो. या उपरनिर्दिष्ट व्यवहाराखेरीज प्रत्येक व्यवहाराला ए ७ फॉर्म भरून नियंत्रणाची अनुज्ञा घ्यावी लागते. जमेच्याबाबतही त्याचप्रमाणें निर्बंध आहेत. आयात झालेल्या मालाचे प्रदान किंवा अन्य प्रदानासाठीं ज्यावेळ्ला रिझर्व बँकेची पूर्व संमति लागत नाही ते व्यवहार करण्याचेवेळीं अशा खात्यांना ए ७ फॉर्म भरावा लागतो. परिवर्तनीय खात्यांचे देश किंवा सूचित प्रदेश यांतील बँकेच्या खात्यांमधून त्याच विभागांतील अन्य बँकेच्या खातीं रक्कम वर्ग करावयाची असेल तेव्हां किंवा बँक ज्या देशांतील आहे त्याच देशांतील व्यक्तीच्या अस्थायिक खात्यांतून वर्ग करण्यासाठीं ए ७ फॉर्म भरावा लागतो. अस्थायिक बँकेच्या देशांचे चलनविक्रीस परवानगी मिळाली असेल किंवा भारतीय बँकेच्या विदेशी खात्यांतून इंग्लंडमध्ये पौंड स्टर्लिंगची विक्री करायची असेल किंवा नॉनस्टर्लिंग विभागातील बँकांच्या किंवा शाखांच्या खात्यांतून स्टर्लिंग विभागांतील बँक किंवा शाखा यांचे खात्यांत रकमा वर्ग करण्याच्या असतील तर हा फॉर्म भरताना नियंत्रणाची परवानगी लागत नाही. या खेरीज रकमा वर्ग करावयाच्या कुठल्याही व्यवहारासाठीं किंवा भारतीय रहिवाशाकडून करावयाची आयात व पूर्वसंमती लागत नसलेल्या व्यवहाराखेरीज अन्य बाबींसाठीं जर जमा द्यावयाची असेल तर ए ७ फॉर्म अनुज्ञेसाठीं पाठवावा लागतो. या बाबतीतले जास्त खुलासे सर्वसामान्य नागरिकांसाठीं आवश्यक

नसल्यानें येथें केलेले नाहीत. कारण बँकाबँकांमधील व्यवहाराबाबत संबंधित बँकांनाच त्याची संपूर्ण माहिती आवश्यक असते.

### वैयक्तिक व संस्थांचीं अस्थायिक खातीं :

भारतीय राष्ट्रीयत्व असलेल्या व्यक्तींच्या मुदत भरलेल्या किंवा क्लेम आलेल्या विमापॉलिसींचे पैसे, त्याच्या खात्याला भरण्याची परवानगी लाईफ इन्शुअरन्स कॉर्पोरेशनला सर्वसाधारणपणें देण्यांत आलेली आहे. तसेंच या कॉर्पोरेशनला, विमापत्राचा सरक्षणाकार देण्यासही अस्थायिक खात्यांस रकमा नावे पडल्या तरी त्यास मुभा देण्यात आलेली आहे.

अभारतीय बँका, सस्था व व्यक्तींना भारतात, रुपयात खातीं ठेवण्याची सर्वसाधारणपणें परवानगी आहे विशेषत: असे खाते उघडताना जर पहिली रक्कम परदेशातून येणार असेल तर रिझर्व बँकेची आगाऊ अनुमतीही लागत नाहीं. भारतातील रहिवासी काहीं कारणानें जर परदेशी गेला, पण त्याचे भारतात जिंदगीचे देण्याचे वगैरे काहीं व्यवहार असले किंवा त्याचेवर अवलंबून असणारे लोक इथे असले तर त्या नागरिकाला असे अस्थायिक खाते ठेवण्याची जरुर भासते.

जर एखाद्या अभारतीय व्यक्तीने किंवा सस्थेने ( उपर निर्दिष्ट बँका सोडून ) किंवा भारतीय व्यक्ती किंवा सस्था भारताबाहेर असतील, पण त्याचे खातें भारतात असेल तर त्यानीं, भारतातील रहिवाशाला रु. १०० पर्यंत चेक दिला असल्यास त्या धारकाला कुठल्याहि तात्रिक बाबींच्या पूर्तीखेरीज ती रक्कम मिळू शकते.

पण स्टर्लिंग विभागातील बँकाच्या खात्यातून रुपये बीस हजारापेक्षां जास्त रक्कम किंवा अस्थायिकाच्या रुपयाच्या कुठल्याहि ( व्यक्ती, सस्था ) खात्यातून एक हजार रुपयापेक्षा जास्त रक्कम मिळायची असेल तर त्यासाठीं त्या रकमेच्या धारकाला रिझर्व बँकेची समति घ्यावी लागते. अशी रक्कम धारकाला देण्यापूर्वी त्या अधिकृत बँकेला त्याबाबतची सपूर्ण माहिती देणारा अर्ज रिझर्व बँकेकडे करावा लागतो. अभारतीय राष्ट्रीयत्वाच्या व्यक्ती-कडून जेव्हा अशी रक्कम येत असेल तेव्हा ती बहुताशी गुतवणुकीच्या

स्वरूपांत असल्याने व आज ना उद्यां ती परत करण्याचे व अप्रत्यक्षपणें त्यासाठीं परकीय चलन उपलब्ध करण्याचे बंधन पडत असल्याने विशेषतः अशा रकमा वर्ग करतांना असे भांडवल नियंत्रित करणें हाच उद्देश आगाऊ परवानगी घेण्याची अट घालण्यामागें आहे.

जर अभारतीय व्यक्ती किंवा संस्था यांना धंद्यासाठीं, व्यापारासाठीं या अन्य कांही कारणासाठीं अशा रकमा वेळोवेळीं पाठवावयाच्या असतील तर त्या ज्या बँकेमार्फत पाठवल्या जायच्या असतील तिच्याबरोबर रिझर्व-बँकेच्या अनुमतीने तत्संबधी कायमची व्यवस्था करून ठेवता येते. अर्थात तरीही, आंकडेवारीच्या माहितीसाठी अशा प्रत्येक व्यवहाराचे वेळीं योग्य तो फॉर्म हा भरून द्यावा लागेलच.

कुठल्याही भारतीय रहिवाशास स्टर्लिंगची रक्कम १५०० पौंडापेक्षां ( रुपये २०००० ) जास्त मिळावयाची असल्यास त्याला त्याबाबत 'सी' फॉर्म भरून द्यावा लागतो. मात्र एकादा भारतीय राष्ट्रीयत्व असलेला रहिवासी जरी बाहेर रहात असेल पण आपल्या खात्यास जमा करण्यासाठीं किंवा भारतांतील अन्य रहिवाशास पैसे देण्यासाठीं रक्कम पाठवीत असेल तर त्यास हें बंधन नाही; तर ते पैसे जमा करणाऱ्या बँकेला किंवा ते मिळणाऱ्या धारकाला रक्कम वीस हजार रुपयांपेक्षां जास्त असल्यास फक्त ए सेव्हन सी (A 7 C) हा फॉर्म भरून द्यावा लागतो. मात्र अशी रक्कम जमा केल्यावर, ती काढण्याचेवेळीं अस्थायिक खात्याबद्दलचे जे नियम केलेले आहेत त्याला ती पात्र ठरते.

अन्य अभारतीय संस्थांचा भारताशी व्यापारी संबंध असेल किंवा त्यांची भारतांत कचेरी असेल किंवा संबंधित संस्था असेल तर त्यांनाही रुपयांत खाते ठेवणें इष्ट असते. तसेच अनेक भारतीय व्यक्ती जरी बाहेर नोकरीपेशाच्या किंवा धंद्याच्या निमित्तानें रहात असल्या तरी त्यांच्यावर अवलंबून असणारी कुटुंबे भारतांत असल्यानें किंवा त्यांची इस्टेट भारतांत असल्यामुळें अथवा त्यांचा विमा वगैरेही इकडे उतरला असल्यास त्याबा-बतच्या देण्याघेण्यासाठीं अशा व्यक्ती भारतांतील बँकांतून आपले खाते

ठेवू शकतात. मात्र त्याना असे खाते कुठल्याही बॅंकेत ठेवता येत नाहीं, तर विदेशी चलनाचा व्यवहार करू शकणाऱ्या अधिकृत व्यवहारी बँकामध्येंच त्याना आपलें खाते उघडावे लागते. अशा खात्याबद्दलची आवश्यक प्रकारची माहिती वेळोवेळीं त्या बॅंकाना रिझर्व बॅंकेला कळवावी लागते. त्याचप्रमाणें एखादा भारतीय रहिवासी काहीं कारणाने परदेशीं गेल्याचें बॅंकेला कळल्यास किंवा कळवले गेल्यासही त्याचे त्यावेळीं असलेले स्थायिक खाते अस्थायिक झाल्याबद्दलचे त्या बॅंकेला रिझर्व बॅंकेकडे कळवावे लागते.

मात्र एखादा विद्यार्थी जर शिक्षणासाठीं परदेशी गेला असेल, एखादी व्यक्ति थोड्या काळासाठीं ( सुमारे सहा महिन्यापेक्षा कमी ) जर भारताबाहेर असेल किंवा एखादा सरकारी अधिकारी कामासाठीं बाहेर रहात असेल तर त्याची खातीं अस्थायिक समजली जात नाहीत. सर्वसामान्यपणें खातेदार जर दीर्घकाळ भारतातच रहात असेल व इथेंच प्राप्तीकर भरीत असेल तर त्याचे खाते 'स्थायिक' प्रकारचे समजले जाते. याखेरीज अन्य परिस्थिती असल्यास किंवा इतर वेळीही शका असल्यास, ते खाते व खातेदाराबद्दलची माहिती कळवल्यानतर रिझर्व बँक त्या अधिकृत बॅंकेला एखादे खाते स्थायिक समजावयाचे कीं नाहीं याबाबत सूचना देऊ शकते. खाते 'स्थायिक' असेल तर त्याबाबत कुठलीच बधनें नसतात. अशा खात्यात कितीही रकमा भरता येतात व त्यातून कितीही रक्कम काढता येते. पण अस्थायिक खात्यात जमा करण्याच्या वा त्यातून काढण्याच्या रकमाबाबत बरेच नियम आहेत व त्यासाठीं काहीं तात्रिक बाबींची पूर्तताही करणे आवश्यक ठरवले गेले आहे.

वैयक्तिक अशा अस्थायिक खात्यात जमा व नावे व्यवहाराबद्दल थोडक्यात खालील प्रकारची बधने आहेत.

## जमा व्यवहारासाठीं :

भारतीय रहिवाशानी बाहेरून जर या खात्यात जमा करण्यासाठीं रक्कम पाठवली तर ती कितीही पाठवली तरी चालते. मात्र त्यासाठीं भरावयाच्या ए सेव्हन फॉर्मवर ही रक्कम व्याज, नफ्याचा भाग, का उत्पन्न आहे

का भाडवली रक्कम वर्ग होत आहे हे लिहून द्यावे लागते. त्याचप्रमाणें अन्य भारतीय व्यक्तींनी काटलेल्या चेक्सची रक्कम दर महिन्यास जास्तीत जास्त रुपये दोन हजारापर्यंत जमा करता येते. मात्र त्यांतील कुठलीही जमा रक्कम एका वेळेला ७५० रुपयापेक्षा जास्त असता कामा नये. अर्थात अशा जमा-रकमांच्या प्रत्येक व्यवहाराबाबत जरी रिझर्व बँकेची अनुमती आवश्यक नसली तरी योग्य तो 'ए सेव्हन सी' हा फॉर्म भरून द्यावा लागतो. हा फॉर्म त्या खात्यातून पूर्वी भारतीय कर्जरोखे घेतलेले असले व नंतर विकले तर ती रक्कम जमा करतानाही द्यावा लागतो. पण ज्यावेळेला भारतीय कर्जरोख्याचे व्याज किंवा कंपन्यांनीं दिलेली डिव्हिडंडची रक्कम बँका जमा करतात तेव्हा असा फॉर्म भरण्याची आवश्यकता नसते. तसेंच खात्यात रक्कम चुकून जास्त नावें टाकली गेली असेल तर चुकीची दुरुस्ती करण्यासाठीं दिली जाणारी जमा देखील रिझर्व बँकेला कळवावी लागत नाहीं. उपरनिर्दिष्ट चार व्यवहाराखेरीज इतर कुठल्याही रकमा अस्थायिक खात्यास जमा करावयाच्या असल्यास रिझर्व बँकेची पूर्वसमति आवश्यक आहे.

## नांवे व्यवहारासाठीं :

नावे व्यवहारात जेव्हा काहीं रकमा अधिकृत बँक अस्थायिकाच्या सूचनेनुसार पोस्ट खर्च, बँकेचे कमिशन, नोकरचाकराना द्यावयाची किरकोळ रक्कम, क्लबच्या वर्गण्या वगैरेसाठीं रुपये शंभरापेक्षा कमी अशा नावे टाकीत असते, तेव्हा कुठलाही फॉर्म किंवा संमतीची जरूरी नाहीं. तसेंच चुकीच्या जमेची दुरुस्त करण्याच्या नोंदीसही परवानगी लागत नाहीं. त्याचप्रमाणे खालील चार प्रकारच्या व्यवहारात अधिकृत बँकांना पूर्वसमतीशिवाय पण योग्य तो फॉर्म किंवा ए सेव्हन फॉर्म घेऊन रकमा नावे टाकण्याची सवलत आहे.

१ ) ज्या व्यवहारासाठीं कुणालाही परकीय चलन ठराविक मर्यादेपर्यंत विकता येते, अशा व्यवहारासाठीं म्हणजे परदेशी मासिके, क्लब याच्या वर्गणीसाठी, टपालाने करावयाच्या अभ्यासक्रमाच्या खर्चासाठीं वगैरे. मात्र त्यावेळीं योग्य तो ए किंवा एस ए वन फॉर्म घेतला जातो.

२ ) अधिकृत बॅंकेस जो व्यवहार इतरासाठीही करण्याची परवानगी आहे अशा अन्य कुठल्याही मान्य व्यवहारासाठीं.

३ ) खातेदार तात्पुरता भारतांत आला असेल व स्वत:साठीं खात्यातील रक्कम काढीत असेल तेव्हा.

४ ) भारतांतील अन्य रहिवाशाना तो रुपये शभरपेक्षा जास्त पण जास्तीतजास्त रुपये एक हजारापर्यंत चेक देत असेल तेव्हा.

५ ) विम्याचा हप्ता, प्राप्तीकर किंवा भारतांतील आपल्या कुटुंबियासाठीं तो रुपये शंभरपेक्षा जास्त पण कमाल रुपये एक हजारपर्यंत रक्कम देत असेल तर.

६ ) भारतीय कर्जरोख्यात, किंवा पोस्टल सर्टिफिकिटात गुतवणुकीसाठीं रक्कम नावे टाकली जात असेल तर.

७ ) एका खात्यातून फक्त त्याच व्यक्तीच्या दुसऱ्या प्रकारच्या खात्यात म्हणजे चालू खात्यातून बचत खात्यात किंवा बचत खात्यातून मुदतीच्या ठेव खात्यात रक्कम वर्ग होत असेल तर.

याखेरीज कुठलीही रक्कम जर द्यावयाची असेल तर अस्थायिक तेदाराला किंवा त्याच्या बॅंकेला रिझर्व बॅंकेकडे अर्ज करून पूर्वसमति घ्यावी ाते. अस्थायिक खात्यास अधिकृत बॅंक जेव्हा काही रक्कम जमा करते, वेळीं ए सेव्हन फॉर्म जर आवश्यक असेल ( काहीं वेळा पूर्वसमत ाही ) तर तो घेऊन रिझर्व बॅंकेकडे पाठवण्याची जबाबदारी रक्कम जमा गाऱ्या बॅंकेची आहे. म्हणूनच त्या खात्यास जमा करण्यासाठीं जर काही ., ड्राफ्ट आला तर तो चेक ज्या बॅंकेवर काढलेला आहे तिच्याकडे धेकृत बॅंकेकडून तो स्वतंत्रपणें पाठवला जातो व या चेकचे पैसे बॅंकेने गल्या पेरिलपने द्यावेत व सोबत चेक काढणाराने दिलेला ए सेव्हन फॉर्म ाने दिला नसल्यास चेक पास करणाऱ्या बॅंकेने तो भरून द्यावा लागतो ) र असल्यास रिझर्व बॅंकेची पूर्वसंमति घेतलेला असा द्यावा असे अधिकृत कळवते. हीच पद्धत भारतवासीय परकीय नागरिकाच्या खात्याबाबतही लविली जाते.

